योगीश्वर ग्रन्थमाला, पुष्प तिसरें.

त्यागराज

# भगवान गोतम बुद्ध

( पूर्वार्ध, चरित्रभाग )

ग्रंथकारः

**रामचन्द्र गोविंद कोलंगडे**, वकील, हुबळी

सम्पादकः—‘ **योगीश्वर ग्रन्थमाला** ’

व योगीश्वर याज्ञवल्क्य, शुक्ल यजुर्गणिमाला,

याज्ञवल्क्य-दर्शन, इत्यादि ग्रंथांचे कर्ते

व

**केशव आप्पा पाध्ये**, बी. ए., एल्‌एल्. बी.,

अडव्होकेट, मुंबई

मुंबई येथील आन्थ्रापॉलॉजिकल सोसायटीचे व्हाइस प्रेसिडेंट;

मुंबई येथील बुद्ध सोसायटीचे सन्मान्य सेक्रेटरी, व ‘बुद्धप्रभा’

त्रैमासिकाचे संपादक, ‘हेमाद्रि,’ ‘कालिदास सूक्तिमंजूषा’

‘अंताजी कावळे’ इत्यादि ग्रंथांचे कर्ते.



‘असावादित्यो ब्रह्म’

सन १९४[illegible] } मुंबई { शके १८[illegible]

पुस्तक मिळण्याचीं ठिकाणें:—

**जगदीश्वर बुक-डेपो,**
माधवबाग, मुंबई नं. ४

**श्रीसमर्थ बुक-डेपो,**
गिरगांव, मुंबई नं. ४

**परचुरे पुराणिक आणि कं.**
बुकसेलर्स व पब्लिशर्स,
मुंबई नं. ४

**कोलंगडे आणि बंधु,**
किल्ला हुबळी



प्रकाशक:—**माधव रामचंद्र कोलंगडे,**
कोलंगडे आणि बंधु, हुबळी

मुद्रक:—**रा. का. तटणीस,**
श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस,
३३४ ठाकुरद्वार, मुंबई नं. २

# अर्पण-पत्रिका

**डॉ. बिमल चरण लॉ,**

M. A., B., L. Ph. D., D. lit.

रॉयल एशियाटिक सोसायटी ( लंडन ) व तिच्या मुंबई व
कलकत्ता येथील शाखांचे फेलो; बौद्ध व जैन धर्मग्रंथ
व हिंदुधर्मशास्त्र, भरतखंडाचा प्राचीन इतिहास व
भूगोल व अनेक विविध विषय यांवर विद्वत्ताप्रचुर
व संशोधनपूर्ण असे विद्वन्मान्य ग्रंथ लिहून
व सार्वजनिक संस्थांस सढळ हातानें उदार
देणग्या देऊन आपली कीर्ति ज्यांनीं
जगभर सुप्रतिष्ठित करून ठेवली आहे,
अशा दानशूर व विद्वद्रत्नास
हा ग्रंथ

**सादर व सप्रेम**

अर्पण केला आहे.

ग्रंथकर्ते

# डॉ. बिमल चरण लॉ,

एम्. ए., बी. एल्., पीएच्. डी., डी. लिट्.

## ह्यांचा अल्प परिचय

—⋄⋄—

**निसर्ग भिन्ना स्वयमेव संस्थितम् ।**
**यस्मिन् द्वयं श्रीश्च सरस्वतीच ॥** कालिदास

सरस्वतीचा वरदहस्त ज्याच्या मस्तकावर आहे, त्याला चौदा विद्या व चौसष्ट कला ह्यांचे पूर्ण ज्ञान होतें. लक्ष्मी एखाद्यावर प्रसन्न झाली म्हणजे त्याला धनधान्य, संपत्ति ह्यांची कधीहि वाण पडत नाहीं. ह्या दोनहि देवींचा वरदहस्त एकसमयावच्छेदेंकरून एकाच व्यक्तीवर पडेल असा माणूस मात्र विरळा. ह्या सर्वसाधारण नियमास जे अनेक अपवाद दिसून येतात, त्यांपैकीं आमचे चरित्रनायक हे एक होत. बंगाल प्रान्त हा सर्व हिंदुस्तानांत राजकीय व सामाजिक बाबतींत तसेंच आधिभौतिक शास्त्रें व साहित्य ( इंग्रजी व बंगाली ) ह्यांत पुढें सरसावला आहे. हिंदुस्तानांतील इतर प्रान्तापेक्षां बंगालमध्यें इंग्रजी अंमल फार लवकर सुरू झाला. त्यामुळें पाश्चात्य संस्कृतीची छाप त्या प्रान्तावर सर्वांच्या आधी बसली असावी हें सहाजिकच आहे. धार्मिक क्षेत्रांत राममोहन रॅाय, बाबू केशवचंद्र सेन, महर्षि रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद वगैरेंची नांवें प्रामुख्यानें पुढें येतात. राजकीय क्षेत्रांत बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी, डब्ल्यू. सी. बानर्जी, लाल मोहन घोस, सी. आर. दास वगैरे गृहस्थांची नांवें सुप्रसिद्ध आहेत. बंकीमचंद्र, सर अशुतोष बानर्जी, सर मुकर्जी, रवींद्रनाथ टागोर, रामानंद चतर्जी, दासगुप्त, सर रोमेशचंद्र दत्त, इतिहासाचार्य मुकर्जी वगैरे अनेक महाविद्वानांचीं नांवें साहित्य क्षेत्रांत चमकत आहेत. पुरुषाप्रमाणें स्त्री वर्गांतहि सरोजिनी नायडु, कमला देवीचट्टोपाध्याय वगैरेंनीं आंग्लभाषा व आंग्ल कवित्व ह्यावर आपले प्रभुत्व गाजवून इंग्लंड देशांतहि कीर्ति संपादिली आहे.

आमचे चरित्र नायक डॉ. बिमल चरण लॉ हे कलकत्त्यांतील लॉ नांवाच्या प्राचीन जमीनदार घराण्यांत जन्मले. त्यांच्या वडिलांचे नांव अंबिकाचरण लॉ

हें असून, आजाचें नांव जयगोविंद लॉ, सी. आय्. ई असें होतें. बालपणापासून त्यांची बुद्धि कुशाग्र दिसत होती. त्यांच्या वडिलांनीं त्यांच्या विद्याभ्यासाकडे फार लक्ष दिलें होतें. सन १९१४ सालीं ते पाली भाषा घेऊन कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या बी. ए.च्या ऑनर्स परीक्षेंत उत्तीर्ण झाले. त्यांचा अभ्यास कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें पुरा झाला होता. सन १९१६ सालीं संस्कृतात लिहिलेलें बौद्ध वाङ्मय, प्राचीन शिलालेख व भाषातुलनाशास्त्र वगैरे ऐच्छिक विषय घेऊन एम्. ए. च्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत पहिले आले. कायद्याचा अभ्यास करून त्यांतहि ते पदवीधर झाले. सन १९२४ सालीं प्राचीन भरतखंडाचा इतिहास व संस्कृति ह्या विषयांत परीक्षा देऊन डॉक्टर ऑफ फिलॉसॉफी ही पदवी त्यांनीं मिळविली. त्याच वर्षी त्यांनीं कांहीं विषयांत नवीन संशोधन कार्य केल्याबद्दल त्यांस **सर अशुतोष मुकर्जी** सुवर्णपदक देण्यांत आलें. लखनौ युनिव्हर्सिटीनें त्यांना इतिहास ह्या विषयांत असलेल्या त्यांच्या प्रावीण्याबद्दल डी. लिट् ( वाङ्मय विषारद ) ही पदवी दिली असून शिवाय बानर्जी प्राईस अर्पण केलें आहे. कलकत्ता युनिव्हर्सिटीनें त्यांस ग्रिफिथ प्राईस देऊन त्यांचा बहुमान केला आहे. बौद्धधर्म व बौद्धवाङ्मय ह्यांचा सखोल अभ्यास करून ह्यांच्या प्रसारासाठीं त्यांनीं जे अश्रांत श्रम केले, त्याबद्दल आपला आदर व्यक्त करण्याकरितां सिंव्हलद्वीपांतील ( सिलोन ) विद्यालंकार पेरिवन ह्या नांवाच्या विद्यापीठानें या प्रथितयश विद्वद्रत्नास **बुद्धागमशिरोमणि** अशी पदवी अर्पण केली. ह्यासंबंधानें विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, अशा तऱ्हेचा बहुमान सिंहलद्वीपांतील कोणत्याहि विद्यापीठाकडून भारतीयांना अद्याप मिळाला नाहीं. ह्यांचे सालीना उत्पन्न एखाद्या छोटेखानी संस्थानिकाच्या वार्षिक उत्पन्नाच्या बरोबरीनें आहे; परंतु त्यांची राहणी साधी असून त्यांचा स्वभाव फार मनमिळाऊ आहे. बौद्ध व जैन ह्या धर्मांच्या वाङ्मयाचा त्यांनीं दांडगा अभ्यास केला असून त्यावर विद्वत्ताप्रचुर व संशोधनपूर्वक असे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. विशेषतः बौद्ध धर्माच्या प्रसाराकरितां ते फार झटत असतात. "पाली वाङ्मयाचा इतिहास" ह्या विषयावर त्यांनीं एक विस्तृत ग्रंथ लिहिला असून त्याचे दोन भाग आहेत. बौद्धांचा धर्मग्रंथ त्रिपिटक ह्याची समग्र माहिती ह्या ग्रंथांत त्यांनीं शिस्तवारीनें दिली आहे. मराठी भाषेंत "बुद्धचरित्र" ह्या नांवाचा एक विस्तृत ग्रंथ तयार होत आहे, अशी त्यांस माहिती मिळतांच त्यांनीं त्या ग्रंथाचे एक कर्ते

श्रीयुत केशवराव आप्पा पाध्ये ह्याजकडे कागद व छपाई ह्यांची महर्घता लक्षांत आणून ग्रंथ प्रकाशनाच्या मदतीकरितां १५०० रुपयांची उदार देणगी दिली, ह्याबद्दल या पुस्तकाचे ग्रंथकर्ते त्यांचे अत्यंत आभारी आहेत.

डॉ. लॉ, ह्यांनीं भरतखंडाचा प्राचीन इतिहास, त्याची भौगोलिक परिस्थिति, पुराणवस्तुसंशोधन, हिंदु लॉ, बौद्ध, जैन वाङ्मय ह्या व इतर अनेक विषयांवर जे विद्वत्ताप्रचुर विद्वन्मान्य ग्रंथ निर्माण केले आहेत, त्यांमुळें महाराष्ट्र, बंगाल, यू. पी., मद्रास, सिलोन, वगैरे भरतखंडातील विद्वन्मंडळाशीं त्यांचा संबंध जुळून आला आहे. ह्याशिवाय इंग्लंड, जर्मनी व अमेरिका ह्या देशांतील विद्वान लोकांनीं त्यांच्या बुद्धिमत्तेचा व ग्रंथकर्तृत्वाचा फार गौरव केला आहे. त्यांतील कांहीं संस्थांचीं नांवें खाली नमूद करतो :—

कलकत्ता येथील भौगोलिक मंडळाचे व कलकत्ता येथील प्राच्यवाणी मंदीराचे **अध्यक्ष** असून खालील नमूद केलेल्या संस्थांचे ते **उपाध्यक्ष** आहेतः--कलकत्ता येथील शास्त्रीय शोध प्रसारक मंडळ, भारतीय संशोधन मंडळ, बुद्ध सोसायटी मुंबई. ब्रिटिश इंडियन असोसिएशन १९४२–४३ सालचे उपाध्यक्ष, वगैरे.

खालीं नमूद केलेल्या व इतर विद्वन्मंडळाचे व संस्थांचे ते सभासद आहेतः—

( १ ) ग्रेट ब्रिटन व आयर्लंड येथील रॉयल एशिॲटिक सोसायटीचे व त्या संस्थेच्या बंगाल व मुंबई येथील शाखांचे सन्माननीय फेलो. पुणें येथील भांडारकर ओरिएन्टल रिसर्च संस्था, अलाहाबाद येथील गन्नानाथ झा संशोधन संस्था, कलकत्ता येथील स्त्री-शिक्षण मंडळ, शांतिनिकेतन येथील विश्वभारती विद्यापीठ, मुंबई येथील हिस्टॉरिकल सोसायटीच्या इंडॉलॉजी शाखेचे ते सभासद आहेत; व अमेरिकेंतील पौर्वात्य मंडळाचे ते कॉर्पोरेट मेंबर आहेत.

## देणग्या

जगांतील विद्वन्मंडळांत त्यांची लेखक या नात्यानें ख्याति आहे; परंतु त्यांच्या दातृत्वाबद्दल लोकांना फारशी माहिती आहे असें दिसत नाहीं. गुप्त दानाची त्यांस फार आवड असल्यामुळें लोकामध्यें आपल्या दानशूरपणाचा गाजावाज होणें हें त्यांस रुचत नाहीं. त्यांच्याकडून रोजच्या रोज ज्या देणग्या दिल्या जातात त्यांची त्यांच्या अगदीं नजीकच्या मित्रमंडळीस वार्ताही नसते. परंतु ज्या संस्थाना त्यांजकडून गुप्त रीतीनें देणग्या मिळतात व ज्यामुळें त्यांचेंअस्तित्व जगांत

कायम चिरकाल टिकलें जातें त्यांजकडून सदरील देणग्या उजेडांत येतात. भूतदयेनें प्रेरित झाल्यामुळें त्यांजकडून ज्यांना ज्यांना मदत होते त्यांचे क्षेत्र फार विस्तृत आहे. दुर्दैवानें निरनिराळ्या कारणानें जे त्रस्त, पीडित, दुबळे व रुग्ण व हवालदील होतात, त्यांना त्यांजकडून सढळ हातानें मदत मिळते. उच्च ध्येय आपणापुढें ठेऊन व जनताजनार्दनास मदत केल्यानें नर नारायणाची सेवा घडते अशा उदात्त बुद्धीनें व भावनेनें ते सर्व लोकांना मदत करतात. रुग्णालयांत पुष्कळ रोग्यांना तेथें राहून उत्तम औषधोपचार मिळावा अशी त्यांनीं व्यवस्था बऱ्याच रोग्यांकरितां केली आहे. शाळा व कॉलेजमध्यें पुष्कळ विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या दिल्या आहेत. उच्च शिक्षण घेण्याकरितां सवलती मिळाव्या म्हणून त्यांनीं पुष्कळ देणग्या दिल्या आहेत. ज्ञानप्रसाराकरितां ते पुष्कळ मदत करतात. त्यांच्या औदार्याचा प्रवाह गंगौघाप्रमाणें सारखा वाहत असतो. त्यांच्या कांहीं देणग्या विशेष लक्षांत घेण्यासारख्या आहेत. कलकत्ता मेडिकल कॉलेजच्या अँडरसन कॅजुअॅल्टी ब्लॉकला व बादशहांच्या क्षयरोग निवारण फंडाला त्यांनीं फार मोठी मदत केली आहे. ह्याचप्रमाणें त्यांनीं कलकत्ता येथील व बंगाल प्रान्तांतील इतर ठिकाणच्या निरनिराळ्या हॉस्पिटलासहि सढळ हातानें मदत केली आहे, त्यांची यादी विस्तारभयास्तव देतां येत नाहीं. चालू युद्धांत डॉ. लॉ ह्यांनीं सरकारला फार मोठी मदत केल्याबद्दल व्हाइसरॉय लॉर्ड व लेडी लिनलिथगो व बंगालचे व सिलोनचे गव्हर्नर ह्यांजकडून त्यांस अनेक वेळां प्रशंसापत्रें मिळालीं आहेत. चालू युद्धकाळांत त्यांनीं सरकारास दिलेल्या देणग्यांची रक्कम रु. एक लक्ष पन्नास हजार आहे. डॉ. लॉ ह्यांनीं विद्यावृद्धिकरितां ज्या देणग्या दिल्या आहेत, त्यांतील ठळक येणेंप्रमाणें:

( १ ) बंगालच्या रॉयल एशिॲटिक सोसायटीस रु. ११०००; ( २ ) रवींद्रनाथ समितीस रु. ३०००; ( ३ ) कलकत्ता येथील अशुतोष हॉलकरितां रु. ५०००; ( ४ ) चित्तरंजन सेवासदनास आपल्या कै. मुलीच्या स्मरणार्थ रु. ५०००; ( ५ ) आपला आजा जयगोविंद लॉ ह्यांच्या स्मरणार्थ एका हॉस्पिटलास रु. २५००; ( ६ ) मुंबई येथील रॉयल एशिॲटिक सोसायटीस रु. ३०००; ( ७ ) लंडन येथील रॉयल एशिॲटिक सोसायटीस रु. २०००; ( ८ ) कलकत्ता येथील निरनिराळ्या कॉलेजांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां शिष्यवृत्त्या देण्यासाठीं रु. ५०००.

डॉ. बी. सी. लॉ ह्यांची वाङ्मय क्षेत्रांतील कामगिरी बहुमोल असून तिजबद्दल पौर्वात्य व पाश्चिमात्य विद्वानानीं मुक्तकंठानें प्रशंसोद्गार काढले आहेत. ह्या ग्रंथांत डॉ. लॉ ह्यांची जाडी विद्वत्ता व सूक्ष्म संशोधन बुद्धि आढळून येते. डॉ. लॉ ह्यांनीं बौद्धधर्म, जैनधर्म, भरतखंडाचा प्राचीन इतिहास व भूगोल व पुरातन वस्तुसंशोधन-शास्त्र ह्या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले असून ते विद्वन्मान्य झाले आहेत.

( १ ) बुद्धकालीन क्षात्रजाती ह्या पुस्तकांत त्यावेळच्या सर्व क्षत्रियांचा इतिहास मोठ्या मार्मिक व संशोधक बुद्धीनें लिहिला आहे. ( २ ) बौद्ध व जैन ग्रंथांत भरतखंडाचा आलेला इतिहास ह्यांत भरतखंडांतील भौगोलिक क्षेत्रें व दोन्ही वाङ्मयांत भारतीयांच्या सामाजिक, नैतिक, आर्थिक स्थितीचें जें दिग्दर्शन केलें आहे, त्याचा मार्मिक इतिहास लिहिला आहे. तत्कालीन राजेरजवाडे, धनिक. देवघेवीचे प्रकार, चालू नाणीं वगैरेचा त्यांत समावेश केला आहे. सदरील ग्रंथकर्त्यानें बौद्ध वाङ्मयांत उल्लेखिलेल्या खालील शहरांची विस्तृत व मनोवेधक माहिती दिली आहे:- शावस्ती, राजगृह, उज्जैनी, कोसंबी, छत्र वगैरे. सदरील ऐतिहासिक ग्रंथाबद्दल विंटरनिट्झ वगैरे पाश्चिमात्य विद्वानांनीं त्यांची फार तारीफ केली असून अशा तऱ्हेचे प्राचीन इतिहासावर प्रकाश पाडणारे ग्रंथ लिहिल्याबद्दल त्यांचा धन्यवाद गाइला आहे. सदरील ग्रंथकर्त्यानें भरतखंडांतील पवित्र स्थानें ह्या विषयावर एक अमोलिक ग्रंथ लिहिला आहे; त्यांत प्राचीन नद्या, पर्वत, तीर्थें ह्यांचें दुर्मिळ असणारें वर्णन दिलें आहे.

बौद्ध धर्माप्रमाणेंच जैन धर्माचा त्यांनी उत्तम अभ्यास केला असून ते जैनधर्मिय विद्वानांस मान्य झाले आहेत. जैनधर्माच्या संस्थापकांपैकीं एक महावीर ह्याचें चरित्र त्यांनीं सुंदर रीतीनें लिहिलें आहे. बौद्ध धर्मावरील ग्रंथाचा त्यांचा अभ्यास दांडगा असून त्यांतील बुद्धाचें तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र व धर्मशास्त्र, ह्यांचा अभ्यास त्यांनीं सूक्ष्म रीतीनें केलेला आहे.

**पाली वाङ्मयाचा इतिहासः**—ह्या पुस्तकाचे दोन भाग असून त्यांत बौद्ध धर्मग्रंथ ( त्रिपिटक ) ह्याचा सांगोपांग इतिहास डॉ. लॉ ह्यांनीं परिश्रमपूर्वक व समतोलबुद्धीनें लिहिला आहे. त्रिपिटक ग्रंथाचें डॉ. लॉ ह्यांनीं पूर्णपणें कसें अवगाहन केलें आहे ही गोष्ट सदरील ग्रंथाच्या वाचकांना सहज दिसून येईल. फ्रेंच विद्वान गृहस्थ सेनार्ट, जर्मन विद्वान गृहस्थ विंटरनिट्झ ह्यांनीं सदरील ग्रंथाबद्दल त्यांचा फार गौरव केला आहे.

**बुद्ध घोषाचें चरित्र व त्याचे ग्रंथः**—बुद्धघोष ह्या नांवाचा एक थोर ग्रंथकार सिंहलद्वीपांत इ. स. च्या पांचव्या शतकांत होऊन गेला. त्यानें बौद्ध धर्मग्रंथाचें सिंहली भाषेंत पुनरुज्जीवन करून त्याजवर अनेक टीका लिहिल्या. बुद्धघोषाच्या टीका विद्वत्ताप्रचुर असून त्यानें बुद्धधर्मग्रंथांतील कांहीं बिकट प्रश्नावर आपले स्वतंत्र विचार प्रगट केले आहेत; त्यामुळें बुद्धघोषाची बौद्धग्रंथासंबंधीं कामगिरी अत्यंत महत्त्वाची समजली जाते. इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांत सम्राट अशोकानें जसें बौद्धधर्मास महत्त्वाचें चालन दिलें, त्याच मासल्याचें किंबहुना अधिक चालन बुद्धघोषानें इ, स. पांचव्या शतकांत सदरील धर्मास दिलें. डॉ. लॅा ह्यांनीं त्याचें लिहिलेलें चरित्र त्यांच्या नेहमींच्या विद्वत्तेप्रमाणें संशोधनपूर्वक व सांगोपांग माहितीनें भरलें आहे.

डॉ. लॅा ह्यांनीं बौद्धधर्मविषयक आणखी बरेच ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत "बौद्धधर्मांतील स्वर्ग आणि नरक;" "भूतें खेतें;" "बुद्धकालीन स्त्रियांची सामाजिक स्थिति" वगैरे विद्वत्ताप्रचुर ग्रंथ लिहिले आहेत. शेवटच्या ग्रंथांत तत्कालीन स्त्रियांच्या सामाजिक स्थितीचें, त्यांच्या दास्यत्त्वाचें चटकदार वर्णन केलें, आहे.

**Buddhist Concepts ( बौद्धधर्मांतील कांहीं विचार प्रमेयें )**:—ह्या ग्रंथांत ११ प्रमेयांवर ग्रंथकर्त्यानें आपले विचार प्रगट केले आहेत. तसेंच बौद्ध जातककथा ह्याशिवाय बुद्धवंश व चरियापीटक असे त्यांनीं महत्त्वाचे लेख लिहिले आहेत. हे "इंडियन कल्चर" ह्या मासिकाचे संपादक आहेत. "बौद्धवंश व महावस्तु" ह्या ग्रंथांवर त्यानीं टीका लिहिल्या आहेत. पाश्चिमात्य विद्वान रॅपसन आणि जेकोबाय ह्यांना हे ग्रंथ फार आवडले आहेत.

## बंगाली वाङ्मय

बंगाली भाषेंत डॉ. लॅा ह्यांनीं खालील ग्रंथ लिहिले आहेतः—( १ ) गौतमबुद्ध, ( २ ) लिच्छवी जाती, ( ३ ) प्रेततत्त्व, ( ४ ) बौद्धरमणी, ( ५ ) बौद्धयुगभुगोल, ( ६ ) जैन गुरु महावीर चरित्र, ( ७ ) सौंदरानंद काव्य वगैरे.

हिंदुलॅावर दानासंबंधीं प्राचीन कायदा ह्या विषयावर डॉ. लॅानें एक मार्मिक ग्रंथ लिहिला असून त्यामध्यें दानासंबंधानें प्राचीन व अर्वाचीन विचारांचा समन्वय केला आहे. वाङ्मयावरील ग्रंथाप्रमाणेंच सदरील ग्रंथात त्यांची संशोधक बुद्धि

दिसून येते. लंडनमधील रॉयल एशियॅटिक सोसायटी, भांडारकर इन्स्टिटयूट वगैरे संस्थानीं ह्याचे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. हॉलंड येथील कर्न इन्स्टिटयूटच्या संस्थेचे ( Annual Bibliography of Indian Archaeology ) ते संपादक आहेत. ह्यांनीं निरनिराळ्या देशांतील वर्तमानपत्रांत व मासिकांत विद्वत्ताप्रचुर लेख प्रसिद्ध केले आहेत. ह्यावरून ह्यांची कीर्ति जगभर पसरलेली आहे.

डॉ. लॉ ह्यानीं प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांखेरीज त्यांनीं निरनिराळ्या मासिक पुस्तकांत आपले विद्वत्ताप्रचुर लेख प्रसिद्ध केले असून शिवाय अनेक विद्वन्मंडळापुढें मननीय निबंध वाचले आहेत. त्याची समग्र यादी विस्तारभयास्तव देतां येत नाहीं.

डॉ. लॉ ह्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांपैकीं कांहीं ठळक ग्रंथांचीं नांवें:—

( १ ) पाली वाङ्मयाचा इतिहास ( दोन भाग ); ( २ ) बुद्धकालीन क्षात्रजाती; ( ३ ) बुद्धघोषाचें चरित्र; ( ४ ) बौद्धधर्मातील स्वर्ग व नरक ह्यांबद्दलचे विचार ( ५ ) बौद्धधर्मात भूतें व खेतें ह्यांबद्दलचा विचार; ( ६ ) बुद्धकालीन स्त्रियांची सामाजिक स्थिति; (७) बौद्ध धर्मातील तत्त्वज्ञान (Buddhist Thoughts) ( ८ ) महावीर चरित्र; ( ९ ) बुद्धकालीन भरतखंडाचा भौगोलिक इतिहास; ( १० ) हिंदु धर्मशास्त्रांतील दानाबाबतचा प्राचीन कायदा; ( ११ ) भरतखंडाचा प्राचीन इतिहास; ( १२ ) बुद्धवंश व चरियापीटक; ( १३ ) बौद्धधर्मातील ११ प्रमेयें; (१४) बौद्ध धर्मातील पवित्र स्थळांचें वर्णन; ( १५ ) Buddhist Thought.

**केशव आप्पा पाध्ये.**



के. आ. पाध्ये
सम्पादक : बुद्धप्रभा ( मुबई )

# प्रस्तावना

धराबद्ध-पद्मासनस्थांघ्रियष्टिः ।
नियम्यानिलं न्यस्तनासाग्रदृष्टिः ॥
य आस्ते कलौ योगिनां चक्रवर्ती ।
स बुद्धः प्रबुद्धोऽस्तु नश्चित्तवर्ती ॥

श्रीशंकराचार्य

या पुण्यशील भारतमातेच्या पवित्र उदरीं जन्म घेऊन मानवजातीच्या कल्याणार्थ व उद्धारार्थ ज्या थोर विभूतींनी कडक तपश्चर्येचें प्रखर अग्निदिव्य करून सूक्ष्म तत्त्वज्ञानाचीं गूढ बीजें शोधून काढलीं व मानवतेला दिव्य उजळा दिला, अशा त्या महापुरुषांमध्यें ऐतिहासिक काळांत भगवान गोतम बुद्धास अग्रपूजेचा मान दिल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं. भगवान बुद्धाच्या पूर्वी त्रैवर्णिकांच्या उच्च समाजांत प्ररूढ असलेल्या वैदिक धर्मातील तत्त्वज्ञानाचा व नैतिक आचारविचारांचा जो बहुमोल ठेवा होता, त्याचा लाभ आर्येतरांस मिळण्यासारखा नव्हता व वस्तुतः मिळाला नाहीं. पुढें याचा परिणाम असा झाला कीं, वैदिक धर्मास कालगत्या विकृत व हीन स्वरूप प्राप्त होऊन तो सामान्य जनमनातून घसरत व उतरत चालला. तशांतच चार्वाकादि नास्तिक पंथ उदयास येऊन, देशांत सर्वत्र आचारविचाराच्या बाबतींत सावळा गोंधळ माजला व जिकडे तिकडे बेबंदशाही व बजबजपुरी यांस भरती चढली. अशा नास्तिक पंथांत अक्रियावादी, दैववादी, शून्यवादी, अनात्मवादी, उच्छेदवादी, स्याद्वादी असे अनेक पंथाभिमानी लोक असून, त्यांमध्यें मखली गोशाल, अजित केशकंबल, ककुध कात्यायन, पूर्ण काश्यप, नीगंठ नाथपुत्त म्हणजे महावीर, संजय इत्यादि लोक अग्रणी होते. यांशिवाय सांख्यमताचे प्रवर्तक कपिल व वैशेषिक मताचे पुरस्कर्ते कणाद यांनीं अगोदरच आपली तर्कशुद्ध विचारसरणी तत्कालीन विचारी जगापुढें मांडून, वैदिक धर्माच्या बुरुजाला सुरुंग लावून त्याचा कांहीं भाग ढांसळून पाडला होता. यामुळें धार्मिक विचाराची जनमनावरील पकड शिथिल होऊन समाजांत सुरापान, अक्षविद्या ( म्हणजे जुगार ), जारण-मारण, मंत्रविद्या, पिशाच्चविद्या इत्यादि गोष्टींस नसतें प्राधान्य प्राप्त होऊन, देशभर आचारविचारांत सगळी उलथापालथ झाली व बेबंदशाहीस सर्वत्र महापूर लोटला ! !

अशा या अंधःकारमय व धर्मग्लानीच्या हीन युगांत म्हणजे अजमासें अडीच हजार वर्षांपूर्वी नेपाळच्या दक्षिणेस वसलेल्या शाक्यराष्ट्राच्या राजकुलांत एक दिव्य तारा जन्मास आला! तोच या चरित्रग्रंथाचा मुख्य नायक असून, त्यास गोतम बुद्ध असें म्हणतात!! याचें मूळचें नांव सिद्धार्थ. तो जन्मल्यावर सातव्या दिवशीं त्याची आई मायादेवी ही मरण पावल्यामुळें तिची बहीण जी गोतमी तिनें त्यास वाढवून मोठें केलें, म्हणून त्यास गोतम हें नांव प्राप्त झालें. पुढें बोधिवृक्षाखालीं समाधिस्थितींत त्यास संबोधि–म्हणजे सम्यक् ज्ञान–प्राप्त झालें म्हणून त्यास सम्मा सम्बुद्ध अगर बुद्ध म्हणण्याचा प्रघात पडला. असो.

बुद्धाचा जन्मस्वभावच असा कांहीं चमत्कारिक होता कीं त्याला नांवच घ्याव-याचें तर वैराग्य हें अधिक शोभेल. बापाच्या मनांत ही गोष्ट आली, तेव्हां त्यानें आपल्या मुलाचें मन संसाराकडे वळावें व त्यांतच गढून जावें या हेतूनें अनेक उपाय केले. पण सर्व व्यर्थ! त्याचें मन संसारांत लागेना कीं विषयसुखांत रमेना! प्रपंचांत त्याला कोठेंच सुख दिसेना. सर्वत्र दुःखच दुःख दिसूं लागलें! म्हणून भर तारुण्यांतच त्याला जागतिक सुखाची शिसारी आली आणि एके दिवशीं मनाचा निश्चय करून आई-बाप, पत्नी-पुत्र, आप्तइष्ट, दासदासी, राजवैभव इत्यादि सर्व प्रियजनांचा व प्रियवस्तूंचा त्याग करून कोणास कांहीं न सांगतां, न कळवितां रातोरात घोड्यावर स्वार होऊन तो घरांतून बाहेर पडला. आणि दाढीडोकें मुंडून प्रव्रज्या घेऊन तत्कालीन रूढीप्रमाणें जिज्ञासु व मुमुक्षु प्रव्राजक बनला!!

प्रथम त्यानें दोन गुरूजवळ राहून आत्मविद्या व योगविद्या यांचा अभ्यास केला. पण त्यापासून त्याचें व्हावें तसें समाधान झालें नाहीं. म्हणून तेथून पाय काढून स्वतःच्या हिंमतीवर दुःखविमुक्तीचें श्रेष्ठ ज्ञान मिळवावें या हेतूनें खडतर तपश्चर्येस–म्हणजे हठ योगास–प्रारंभ करून त्याप्रमाणें कांहीं दिवस काढले. पण त्यापासून ज्ञानलाभ व मनःशांति न होतां, उलट शरीर मात्र क्षीण होऊन मोडकळीस आलें व प्रकृति तोळामासा झाली! तशा प्रकारची तपश्चर्या–खडतर देहदंडण–हें कांहीं ज्ञानाचें साधन नव्हे, अशी त्याची खात्री पटून तो मार्गहि पुढें त्यानें सोडून दिला. यानंतर त्याचें मन पुनः योगसाधनाकडे वळलें व त्यांतच त्याला समाधान वाटून अखेर श्रेष्ठ समाधि साध्य होऊन, त्या समाधिस्थितींतच त्यास संबोधि प्राप्त झाली! व अखेर सिद्धार्थाचा सम्मा सम्बुद्ध झाला!! त्याला दुःखविमुक्तीचें सम्यग् ज्ञान झालें व भवचक्रांतून त्याची कायमची सुटका झाली!!

पण एवढ्यावरच त्याला स्वस्थ राहवेना. आपल्याप्रमाणेंच इतर जनहि जागतिक दुःखांतून मुक्त होऊन, शाश्वत शांतिसमाधानाचे धनी व्हावेत, ही भूतदया त्याच्यांत जागृत होऊन, त्यास बेचैन करूं लागली. म्हणून गेंड्याप्रमाणें एकटेंच रानावनांत न राहतां गांवोगांव नि देशोदेश फिरून आपल्यास झालेल्या ज्ञानाचा व अनुभवाचा तर्कशुद्ध अशा मधुर व सरळ भाषेंत उपदेश करून, जनमनावर आपल्या तत्त्वज्ञानाची व धर्मनीतीची पकड बसविली व हजारों लोकांना आपले शिष्य व उपासक बनविलें. त्याच्या धर्मपंथांत स्त्री-पुरुष, गरीब-श्रीमंत, लहान-थोर, राव-रंक, अशी सर्व प्रकारची व सर्व दर्जाची मंडळी समाविष्ट झाली. लिंग, वय, जातपात इत्यादि भेदाभेद लक्षांत न घेतां सर्वांना त्यांच्या त्यांच्या योग्यते-प्रमाणें उपदेश करून, त्यांना आपल्या नवपंथात अंतर्भूत करून घेतलें ! हीच बुद्ध भगवंताची अपूर्व व अत्यंत मोठी कामगिरी होय ! आज महाराष्ट्रांत जो वारकरी पंथ आहे त्याचें आद्य जनकत्व बुद्ध भगवंताकडेच येतें असें म्हटल्यास तो सत्याप-लाप होणार नाहीं.

वैशाख शुद्ध पौर्णिमेस रात्रीं सम्बोधि वृक्षाखाली समाधिस्त असतां बुद्धास जें सत्यज्ञान झालें, त्यास आर्यसत्य हें नांव आहे. त्यांत यापुढील गोष्टींचा समावेश होतो. संसार हा दुःखमय आहे, हें पहिलें आर्यसत्य.तें दुःख कां व कसें उत्पन्न होतें, याचें सोपपत्तिक ज्ञान हें दुसरें आर्यसत्य. त्या दुःखाचा नाश केव्हां व कसा होतो, याचें ज्ञान हें तिसरें आर्यसत्य व त्या दुःखाचा नाश करावयाचा मार्ग—यास अष्टां-गिक मार्ग असें म्हणतात—याची क्रमवार माहिती, हें चौथें आर्यसत्य. यांत प्रज्ञा, शील व समाधि या तीहींचा समावेश होतो. दुःखोत्पत्ति व दुःखनिरोध याची तर्क-शुद्ध कार्यकारणपरंपरा दाखविणारें जें तत्त्वज्ञान त्यास प्रतीत्यसमुत्पाद असें नांव असून, तो बुद्धधर्माचा मुख्य आधारस्तंभ आहे. हीं चार आर्यसत्यें व तदुपकारक असें जें प्रतीत्यसमुत्पादनामक तत्त्वज्ञान याचा शोध प्रथम बुद्धानेंच लावून, त्या पायावर पुढें आपल्या धर्माची टोलेजंग इमारत उभी केली !

या धर्माचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे तेथें वैदिकांच्या आत्मवादाला व देवता-वादाला अजीबात फांटा देण्यांत आला आहे. याचें कारण भगवंतानें असें सांगितलें आहे कीं, दुःखविमुक्तीला त्यांचा विचार अगदीं अनवश्यक आहे. फक्त चार आर्य-सत्याचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे कार्यभाग साधतो. दुःखमुक्ति खात्रीनें होऊन निर्वाण लाभतें ! मग अनवश्यक गोष्टींचा विचार करण्याच्या भानगडींत पडा

कशाला ? असा त्याचा कोटिक्रम आहे. अर्थात् बुद्धाचा धर्म साधा, सुटसुटीत व आचरणसुलभ असून, तेथें अंधश्रद्धेला वाव नाहीं. म्हणजे तो अनुभवप्रत्यक्ष धर्म आहे. फक्त बुद्ध हा मार्गदर्शक आहे. त्याच्या हातांत देण्यास निर्वाण नाहीं. तें ज्याचें त्यानेंच आपल्या प्रयत्नानें मिळवावयाचें आहे व मिळविलें पाहिजे.

त्या धर्माचें दुसरें आणखी एक सांगण्यासारखें वैशिष्ट्य म्हणजे विश्वप्रेम हें होय. कोणत्याहि प्राण्याला कसलीहि पीडा, त्रास, दुःख देऊं नये, हें त्या धर्माचें मुख्य पालुपद म्हटलें तरी चालेल. सर्व प्राणिमात्रांवर सारखीच प्रेमदृष्टि ठेवावी, वैऱ्यालाहि त्या कक्षेंत स्थान द्यावें, अशा उदार मानवतेचा तो त्याचा धर्म पुरस्कर्ता असून, त्या शिकवणीचा त्या वेळीं जनमनावर एवढा जबर परिणाम झाला कीं त्यामुळें वैदिकांच्या कर्मकांडाला खणखणीत खो मिळून, हिंसात्मक यज्ञयागाला चांगलाच पायबंद बसला ! अखिल प्राणिकोटीवर प्रेम व स्नेह दृष्टीनें पाहावयास शिकवून जगांत बहुजनहितास व बहुजनसुखास उपकारक अशी विश्वबंधुत्वाची मंगल कल्पना प्रत्यक्ष व्यवहारांत वाढीस लावणारा आद्य महात्मा म्हणजे तो हा भगवान बुद्धदेवच होय !

मात्र येथें एक गोष्ट जरूर लक्षांत ठेवली पाहिजे कीं, वेदग्रंथ जरी प्रमाणभूत मानले नाहींत, तरी त्यांजबद्दल अनादर अगर निषेध त्यानें कोठेंहि व्यक्त केला नाहीं. उलट वेदाविषयीं व वेदपारग ब्राह्मणाविषयीं पूज्यबुद्धिच त्याची ठिकठिकाणीं व्यक्त झालेली दिसून येते. यज्ञांतील हिंसात्मक भाग त्यास मान्य नव्हता ही गोष्ट खरी, पण तेवढा भाग वगळला म्हणजे वैदिक धर्मांतील इतर बहुमोल ज्ञानाचा त्यानें सढळ हातानें आपल्या धर्मांत उपयोग करून घेतला आहे. उदाहरणार्थ, कर्मवाद व पुनर्जन्मवाद हे जसेच्या तसे आपल्या धर्मांत उतरून घेऊन वैदिक सदाचरणावर व औपनिषदिक तत्त्वज्ञानावर आपल्या नवधर्माचा भक्कम पाया रोवून, पर्यायानें त्यानें त्या तेजस्वी धर्माशीं सहकार्यच केलें आहे ! हें कसें तें आम्ही 'बुद्ध-दर्शन' या ग्रंथांत तौलनिक दृष्ट्या स्वच्छ व स्पष्ट दाखविणार आहों. त्यानें उच्छेदवादी, अक्रियावादी, दैववादी, स्याद्वादी, देहात्मवादी इत्यादि अनेक पाखंडी लोकांचा जसा कडकडीत निषेध करून त्यांच्या वाढत्या सामर्थ्यास आळा घातला, तसे वैदिक धर्मावर तुटून पडल्याचें कोठेंच दिसून येत नाहीं, ही गोष्ट वैदिक व बौद्ध या वाङ्मयांच्या तौलनिक अभ्यासानें सरळ व समतोल बुद्धीच्या मनुष्यास पटून आल्याशिवाय राहावयाची नाहीं. असो. हें एवढें बुद्धाच्या धर्माविषयीं झालें.

बुद्धाच्या ह्यातीत त्याच्या धर्माचा प्रसार मगध, कोसल, लिच्छवी, मल्ल, शाक्य इत्यादि राष्ट्रांत चांगला दृढमूल झाला होता. हजारों लोक भिक्षु होऊन त्याच्या भिक्षुसंघांत समाविष्ट होऊन राहिले होते. पुढे त्याच्या परिनिर्वाणानंतर मात्र ही स्थिति राहिली नाहीं. भगवंताच्या पश्चात् त्याच्यासारखा प्रभावशाली हुकमी नेता अगर शास्ता तसा कोणीच न राहिल्यामुळें अगर न झाल्यामुळें, त्याच्या अनुयायांत त्याच्या शिकवणुकीच्या बाबतींत मतभेद वाढून, पुढें त्यांच्यांत रणें माजलीं व संघांत फाटाफूट झाली. पुढें सुमारें दोनशें वर्षांनंतर सम्राट अशोकानें सर्व भिक्षूंची एक महासभा बोलावून त्यांची एकवाक्यता करून सर्वांत समेट घडवून आणला. पण ही गोष्ट फार दिवस टिकली नाहीं. अशोकानंतर पुनः मत-भेदानें उचल खाल्ली व अनेक पंथोपपंथ निर्माण झाले. त्यांतूनच महायान पंथहि उदय पावला. अशोकाच्या काळींच बुद्धधर्माचा भरतखंडाबाहेरील चीन, ब्रह्मदेश लंका, पॅलेस्टाइन, इजिप्त, इत्यादि देशांत प्रसार होण्यास प्रारंभ झाला होता. बुद्धाचीं नीतिवचनें दगडावर कोरून ते स्तंभ निरनिराळ्या प्रदेशांत उमे करण्याचा प्रस्ताव रूढ होत चालला होता. त्यांपैकीं कांहीं अद्यापहि विद्यमान आहेत. शिवाय डोंगरां-तील गुहांत सुंदर विहार खोदून तेथें बुद्धाची शिकवण व चरित्र विस्तारानें कोरून तें अजरामर करून ठेवण्यांत आलें आहे.

वरीलप्रमाणें प्रसरत प्रसरत बुद्धधर्माचा प्रसार सर्व आशियाखंडभर झाला. विशेषतः चीनमध्यें त्याची महती वाढून तेथें त्यास महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. याचा परिणाम पुढें असा झाला कीं, तेथील विद्वानांचें लक्ष हिंदुस्थानाकडे वेधलें व इ. स.च्या तिसऱ्या शतकांत चिनी पंडित फा-इ-हेन् व इट्-सिंग हे व यांच्यासारखे इतर पंडित बौद्धधर्माचा अभ्यास करण्यासाठीं म्हणून हिंदुस्थानांत येऊन सर्व देशभर फिरून त्यांनीं बौद्धधर्माचा अभ्यास व भरतखंडाची माहिती करून घेतली व परत जातांना बौद्धधर्माची अमोल्य ग्रंथसंपत्ति बरोबर नेली. त्यानंतर इ. स.च्या ८ व्या शतकांत त्याच देशांतील महापंडित हु-एन्-च्यांग यानें हिंदुस्थानांत येऊन नालंदा येथें दहा बारा वर्षें राहून बौद्ध धर्माचा सांगोपांग अभ्यास केला. आणि नंतर परत जातांना हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत प्रवास करून तेथील लोकस्थितीचें तत्कालीन वर्णन यथार्थतया लिहून ठेविलें. त्याचा आज इतिहासक्षेत्रांत फार उपयोग करण्यांत येत आहे. असो. याप्रमाणें बुद्धधर्माचा प्रसार होत होत पुढें तो चीन, जपान, ब्रह्मदेश, सयाम, मलाया, सिलोन, जावा,

वगैरे देशांत पक्का दृढमूल होऊन राहिला आणि आजमितीस जगांतील ⅓ लोक त्या धर्माचे अनुयायी आहेत ! व सर्व जग तिकडे सहानुभूतीनें पाहत आहे !

अशोकानंतर बुद्धधर्मांत दोन तट पडून, बुद्धाच्या मूळ शिकवणीस चिकटून राहणाऱ्या पक्षास हीनयान व त्या शिकवणींत विचार प्रगतीप्रमाणें योग्य फेरफार करून त्याप्रमाणें वागणाऱ्या दुसऱ्या पक्षास महायान असें नांव आहे. उत्तर हिंदुस्थान, चीन, तिबेट, जपान इत्यादि देशांत जो धर्म प्रसार पावला तो महायानपंथी असून, दक्षिण हिंदुस्थान, सिलोन, जावा, मलाया, सयाम इत्यादि देशांत जो धर्म रुजला तो हीनयानपंथी आहे. असो. इ. स.च्या आठव्या शतकांत श्रीमच्छंकरार्यांनी बौद्धमताचें खंडण करून, त्याला हिंदुस्थानांतून नामशेष केला असा जो हिंदु लोकांचा सामान्य समज आहे, तो भ्रामक आहे. शंकराचार्यांनंतर पुढें कित्येक वर्षांनीं कनोज येथें शिलादित्य (श्रीहर्ष) या नांवाचा राजा होऊन गेला. तो बौद्धधर्मी असून त्याच्याच कारकीर्दींत उपरिनिर्दिष्ट प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यु-एन्-चॉंग हा हिंदुस्थानांत येऊन सदरहु राजाच्या दरबारीं दीड वर्ष राहिला होता. त्यानें चकचकीत असें लिहून ठेविलें आहे कीं, हिंदुस्थानांच्या बऱ्याच भागांत बौद्धधर्म नांदत असून, तो आपण प्रत्यक्ष डोळ्यानें पाहिला आहे. तेव्हां वरील हिंदूंची समजूत इतिहास–दुष्ट आहे, असें यावरून म्हणावयास हरकत नाहीं. शिवाय इ. स. दहाव्या शतकापर्यंत नालंदा येथें बौद्ध विद्यापीठ भरभराटीनें नांदत होतें हें मशहूर आहेच. महायान पंथाचीं व्यापक तत्त्वें–म्हणजे विश्वबंधुत्व, भूतदया, सर्व मानव मात्रांना लिंगजातिवयादिकांचा भेदाभेद न ठेवितां धर्मज्ञान व धर्माचरण यांच्या सहायानें निर्वाणप्राप्ति–हीं सामान्य जनमनांत दृढमूल झाल्यामुळें, तत्कालीन समाजप्रकृतीस मानवेल असा वैदिक धर्मांत फेरबदल करणें भाग पडून त्याचा परिणाम म्हणजे भक्तिप्रधान वैष्णवपंथाचा उदय हा होय. या घडामोडींत भगवान् बुद्धाला विष्णूच्या नवव्या अवताराचें श्रेष्ठ स्थान मिळून वैदिक व बौद्ध धर्माचा मधुर संगम झाला आणि त्यापासून हा आमचा सांप्रतचा तीस कोटी लोकांचा हिंदु धर्म उदयास आला ! याचा सविस्तर इतिहास आमच्या पुढील 'बुद्ध–दर्शन' ग्रंथांत येणारच आहे. असो

अलीकडे म्हणजे इ. स. १८८९ सालीं सर एड्विन् अर्नोल्ड साहेबानें इंग्रजी भाषेंत ' Light of Asia ' नांवाचें एक सुंदर पद्यमय बुद्धचरित्र लिहून त्याची युरोपखंडांत प्रसिद्धि केली. तेव्हां कोठें पाश्चात्य पंडितांचें बुद्धाकडे व त्याच्या

शिकवणुकीकडे लक्ष वेधलें ! ह्यापूर्वी जीसस ख्राइस्तसारखी जगांत दुसरी थोर विभूति झालीच नाहीं, असा त्यांचा आग्रह होता. तो या चरित्र ग्रंथानें कोलमडून फोल ठरला ! पुढें ऱ्हीस डेविड्स, ओल्डनबर्ग, मॅक्समुल्लर, विंटरनिझ वगैरे पाश्चात्य पंडितांनीं बौद्ध वाङ्मयाचा सखोल अभ्यास करण्यासाठीं 'पाली टेक्स्ट सोसायटी' नांवाची संस्था स्थापन केली व लाखो रुपये खर्च करून, हिंदुस्थान, ब्रह्मदेश, सिंहलद्वीप, सयाम इत्यादि देशांतून पालीपंडित बोलावून घेऊन त्यांच्या मदतीनें बरेंच बौद्ध पाली वाङ्मय इंग्रजी, जर्मन, फ्रेंच भाषेंत रूपांतरित करून घेतलें. त्याच वेळीं सिंहलद्वीपचे अंगारिका धम्मपाल यांनीं भरतखंडांत बौद्धधर्माचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रचंड उद्योग चालवून इंग्लंड व अमेरिका येथें जाऊन तेथून बराच पैसा मिळवून आणला आणि वाराणशीजवळील सारनाथ म्हणजे धर्मचक्रप्रवर्तनाचें मूळ स्थान-येथें भगवान बुद्धाचें एक सुंदर व भव्य मंदीर उभारलें व कलकत्ता येथें महाबोधि सोसायटीची प्राणप्रतिष्ठा केली.

याच सुमारास मुंबईतील सुप्रसिद्ध पॅवेल कंपनीचे मालक व दानशूर गृहस्थ कै. डॉ. आनंदराव नायर यांनीं मुंबई येथें बौद्धधर्माचीं तत्त्वें सामान्य जनतेंत प्रसृत करण्यासाठीं म्हणून इ. स. १९२२ सालीं 'बुद्ध सोसायटी' नांवाची संस्था स्थापन केली. ती चिरस्थाई व्हावी म्हणून 'आनंदविहार' या नांवाचें सुंदर बुद्धमंदीर बांधलें. या सोसायटीमार्फत 'बुद्धप्रभा' नांवाचें इंग्रजी त्रैमासिक प्रसिद्ध होत असून मधून मधून व्याख्यानद्वारा भगवान बुद्धचरित्राची व त्यांच्या धर्मतत्त्वांची लोकांना माहिती देण्यांत येते. युरोपांतल्या पाली सोसायटीच्या प्रचंड उद्योगानें बुद्धचरित्र व बौद्धवाङ्मय यांवर माहितीपूर्ण असे अनेक ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. इ. स. १८८२ सालीं कै. केळुसकर यांनीं तत्कालीन उपलब्ध असलेल्या आधारावर एक लहानसें बुद्धचरित्र लिहिलें आहे. पण संशोधनपूर्वक माहितीपूर्ण असा अद्ययावत् विस्तृत ग्रंथ मात्र महाराष्ट्रांत नांव घेण्यासारखा आतांपर्यंत एकहि नाहीं. ही उणीव अंशतः भरून काढण्याच्या हेतूनें आम्ही अनेक पाली, इंग्रजी व हिंदी प्रसिद्ध ग्रंथांच्या आधारें ऐतिहासिक दृष्ट्या छाननी व संशोधन करून, भगवान बुद्धाचा हा चरित्रग्रंथ सुव्यवस्थित व सुसंगत असा यथाशक्ति व यथामति लिहून, तो आज महाराष्ट्रास सादर करीत आहों. सुज्ञ व भारत इतिहासप्रेमी महाराष्ट्र ही आमची अल्प सेवा गोड मानून घेईल अशी आम्हास पूर्ण आशा आहे.

आतां जातां जातां आणखी एका गोष्टीचा उल्लेख करून ही लांबलेली प्रस्तावना प्रस्तावना आटपती घेतों. ज्या महानुभावाच्या उदार देणगीमुळें हा ग्रंथ छापण्याचा सुयोग आला, त्या दानशूर बौद्ध वाङ्ममविशारद डॉ. बिमल चरण लॉ M.A., B.L., Ph. D., D. Lit. यांचें आम्ही अत्यंत आभारी आहोंत. तसेंच हा ग्रंथ तयार करीत असतांना बौद्ध वाङ्मयावरील अनेक उपयुक्त ग्रंथांची मुंबई येथील बुद्ध-सोसायटीचे ऑ. सेक्रेटरी यांच्या मदतीनें आम्हास वेळोवेळीं जी बहुमोल मदत झाली, त्यासंबंधीं सदरहू सोसायटीचेहि आम्ही अंतःकरणपूर्वक आभार मानतों. शेवटीं बुद्ध भगवंताची सारभूत शिकवण खालील गाथेंत देऊन लांबलेल्या प्रस्तावनेला पूर्णविराम देतों.

सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसम्पदा ।
सचित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥

( धम्मपद १४-५ )

आनंदविहार, मुंबई नं. ८
पौष शुद्ध पौर्णिमा,
शके १८६७
ता. १७-१-४६

ग्रन्थकर्ते.



भूतं भवद्भावि च धर्मजातम् ।
योऽनन्यथा स्वयमबोधि सुबोधिमूले ॥
ज्ञेयोदये सुधिषणावरणानभिज्ञः ।
सम्बुद्ध एव भवतां भवताद्विभूत्यै ॥

स्थविर अनिरुद्धाचार्य.

# अनुक्रमणिका



रा. गो. कोलंगडे

सम्पादक : योगीश्वर ग्रंथमाला ( हुबळी )

PREMIER ART PRINTING WORKS
FORT, BOMBAY

नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स

त्यागराज

# भगवान गौतम बुद्ध

## दिव्य दृष्टांत !

धृत्वा हिमाद्रिधवलं गुरु षड्विषाणं
दानाधिवासितमुखं द्विरदस्य रूपम् ।
शुद्धोदनस्य वसुधाधिपतेर्महिष्याः
कुक्षिं विवेश स जगद्व्यसनक्षयाय ॥

बुद्धचरित्र १-२०
( अश्वघोष )
जातक-अट्ठकथा

पौर्णिमा ! होय, पौर्णिमाच ती ! आषाढ शुद्ध पौर्णिमा ! तशांत रात्रीची प्रशांत व प्रसन्न वेळ ! खरोखर मोठें रमणीय दृश्य ! निसर्ग-रमणीचें नितांत खुललेलें असें एक मनोल्हादकारी सुमधुर सौंदर्य-प्रदर्शनच तें ! ! अहाहा ! ! काय मनोहर देखावा ! ! खरोखर भारीच आकर्षक तो ! अमृतकलानिधि तारानाथ आपल्या सुदिव्य परिवारा-सहित विशाल नभोमंडलांत मोठ्या वैभवानें मिरवीत असलेला ! जिकडे तिकडे त्याच्या सुधाधवल अमृत किरणांचा शीतल सडा सर्वत्र पिठा-सारखा शुभ्र पसरून राहिलेला ! वायुराज मंद पण मधुर असा सुख-कारक वाहत असलेला ! तशांत रात्रीची प्रशांत वेळ ! अखिल जीव-सृष्टि निद्रादेवीच्या सुमधुर साम्राज्यांत संपूर्ण समरस झालेली ! !

अशा सुशांत वेळीं महाराणी मायादेवी ही आपल्या महालांत झोंपी गेली होती. मुद्रा प्रसन्न दिसत होती, तरी मधून मधून विविध विकाराचे बारीक व पुसट छटे चेहऱ्यावर उमटत असल्याचें स्पष्ट दिसत होतें; ती पहा, आतां मध्येंच एकदम दचकली. चेहरा अम्मळ आंबटसा केला. भिवया अम्मळ आंखडून धरल्या. ओंठ थरथरूं लागले. खचित, खचित कसल्या तरी एका विचित्र स्वप्नांत असावी ती; आणि कशाची तरी भीति वाटत असावी तिला; असलें कसलें स्वप्न पडलें असावें कोण जाणे !

आतां पहा, पुनः मुखावर मधुर हास्य झळकलें. पण हें काय ? सांगतां सांगतांच पुनः रंग पालटला कीं ! कपाळावर आंठ्या पडल्या ! आतां तर उजव्या कुशीवर आपला हात तिनें घट्ट दाबून धरिला. अशी कां करीत असेल ती ? कांहीं तरी तिला तेथें बोंचत तर नसेल ना ? तें पहा, हातानें कांहीं तरी ती बाजूला सारल्यासारखें करीत आहे. पुनः त्याच कुशीवर तिचा हात जाऊन घट्ट चिकटला. हां, आतां मात्र चेहरा पूर्वीसारखा पुनः निवळला अं. पाहा, पुनः आनंदाच्या मनोहर छटा विलसूं लागल्या ! ओंठांवर मंद हास्य चमकूं लागलें ! मुखश्री पुनः प्रसन्न झाली आणि महानंदाचा मधुर प्रकाश उजळला ! ! कसल्या तरी सुखसंवेदनाचा गोड अनुभव असावा हा ! ! स्वप्न कांहीं तरी विलक्षण असावें खास ! ! हा प्रकार उत्तर रात्रीं घडून आला.

पुढें लवकरच पहाट झाली. प्रभातकालीन गुलाबी गारव्यानें तिला जाग आली. चटकन् ती उठून बसली. आणि मनांत कसला तरी विचार करून उठून उभी राहून झपझप पावलें टाकीत तडक पतीच्या शयनमंदिरांत शिरली. अजून झोंपलाच होता तो. हातानें हळूच हलवून त्याला जागें केलें. डोळे चोळीत चोळीत तो उठून बसला आणि पाहतो तों मायादेवी पुढें उभी !

'का' तो डोळे चोळीतच म्हणाला, 'आज इतक्या लवकरशी ? आतां कुठें पहाट होते आहे. आज इतकी घाई कां ?

'नाहीं' ती उत्तरली, 'आपली उगीच.'

असें म्हणून त्याच्याकडे पाहत क्षणभर तशीच तेथें उभी राहिली. नंतर ती होऊनच म्हणाली 'आज रात्रीं मला एक स्वप्न पडलं होतं. किती विलक्षण पण !

**राजा:**—विलक्षण म्हणून काय म्हणतेस ? स्वप्नच ना तें ! मग विलक्षण असायचेंच ! स्वप्नं हीं विलक्षणच असतात. मग काय त्यांत एवढं नवल करून सांगायचं.

**मायादेवी :**—त्यांतल्या त्यांत आजचं भारी विलक्षण, बाई ! अगदीं चमत्कारिक हो !

**राजा :**—असं होय. मग सांग तर काय तें.

**मायादेवी :**—मी किनई झोंपलें होतें. चांगला डोळा लागला होता. मला वाटतं, मध्यरात्र उलटून गेली असावी. इतक्यांत पडलं स्वप्न. फारच चमत्कारिक बाई !! अजून अंगावर शहारे येतात त्याची आठ-वण झाली म्हणजे !

**राजा :**—पण सांग तर खरी, काय झालं तें.

**मायादेवी :**—स्वप्नामध्यें मला कोण्यातरी चार दिव्य पुरुषांनीं —दिक्पाल असावेत ते—उचलून एका उंच पर्वतावर नेली.किती सुंदर स्थान होतं तें ! खरोखरचं अति रम्य !! फार सुंदर !!

**राजा :**—पुढं ?

**मायादेवी :**—तिथं एक भव्य सालवृक्ष होता. तिथं नेऊन ठेवलं मला. नंतर देव स्त्रियांनीं येऊन मला सुगंधी जलानं मंगल स्नान घातलं व दिव्य वस्त्रालंकारांनीं सजवून एका पलंगावर आणून पूर्वे-कडे मस्तक करून निजविलं मला तिथं. त्या वेळीं गंधर्व नि अप्सरा सुस्वर गात होतीं.

**राजा :**—ही एक गम्मतच म्हणायची.

**मायादेवी :**—पुढं त्या देवस्त्रिया तेथून आल्या तशा निघून गेल्या.

मी एकटीच राहिलें. इतक्यांत एक बालहत्ती त्या सुवर्ण पर्वत शिखरा-वरून उतरत उतरत खालीं आला. अगदीं माझ्याजवळ. पांढरा शुभ्र होता तो! फार सुंदर नि मोठा गोंडस! पांढरं कमळ धरलं होतं त्यानं आपल्या सोंडींत!

**राजा** :—फारच सुंदर स्वप्न! बरं, पुढं?

**मायादेवी** :—झुलत झुलत तो हळु हळू मजकडेच येऊं लागला. मी दचकलें. घाबरलें. येतां येतां माझ्या अगदीं जवळच आला कीं तो!

**राजा** :—मग तुडवलं कीं काय?

**मायादेवी** :—नाहीं, नाहीं. मला वाटलं कीं तो आतां मला खास तुडविणार. माझा चेंदामेंदा करणार. मी घाबरलें.

**राजा** :—बोलून चालून हत्तीच तो!

**मायादेवी** :—पण बेट्यानं तसं कांहीं नाहीं केलं. जवळ आला, तसा माझ्या शेजारीं येऊन उभा राहिला. आणि मौज ही कीं मला तीन प्रदक्षिणा घातल्या!!

**राजा** :—आं! अरे वा! गम्मतच केली कीं! बरं, पुढं?

**मायादेवी** :—पुढं हळूंच आपली चिमुकली सोंड पुढं करून माझ्या उजव्या कुशीला डिवचूं लागला!

**राजा** :—हें मात्र जरा चमत्कारिक!

**मायादेवी** :—मला तर मोठी भीति वाटूं लागली. मी फार घाबरलें. होय, काय करतोय कुणाला ठाऊक!

**राजा** :—हत्तीसारखा मस्त प्राणी! मग कोण नाहीं घाबरणार?

**मायादेवी** :—पण गम्मत ही कीं त्याचा स्पर्श होतांच–किती गोड होता तो!–माझी भीति सगळी पार निघून गेली! आणि मनाला एक प्रकारचा आनंद झाला! महानंद!!

**राजा** :—महानंद? हें तर भारीच विलक्षण! तूं सांगतेस हें सगळं खरं ना पण?

**मायादेवी** :—खोटं कशाला सांगूं? अगदी खरं.

राजाः—बरं, पुढं मग ?

मायादेवी :—तेंच सांगतें आतां. मी त्याची सोंड धरून हळूंच बाजूला सारली. तरी तो ऐकेना ! पुन: तो आपल्या सोंडेतील कमळानं मला आणखी डिवचूं लागला ! रागानं नव्हे हो, फार लाडिकपणानं ! मूल जसं आईला झोंबतं तसं होतं तें ! कांहीं वेळ आम्हा दोघांचं असंच चाललं. तो हळूंच फुलानं मला डिवची नि मी ती सोंड धरून बाजूस करी.

राजाः—अखेर काय झालं ?

मायादेवीः—पुढं चमत्कार–होय चमत्कारच तो–असा झाला कीं, पुढं होतां होतां त्याचं तें धिप्पाड रूप पालटून सूक्ष्म, अगदीं सूक्ष्म, होत गेलं. आणि शेवटीं तो हत्ती माझ्या उजव्या कुशींत शिरल्याचा भास झाला ! त्या वेळीं मला जो आनंद वाटला, गुदगुल्या झाल्या, समाधान वाटलं, तसं साऱ्या जन्मांत कधीं झालेलं आठवत नाहीं मला ! खरोखर मोठं सुखस्वप्न होतं तें ! फारच गोड नि फारच सुंदर ! !

राजाः—स्वप्न गोड तर खरंच ! तसंच मोठं चमत्कारिकहि पण ! बरं, आतां ब्राह्मणांना बोलावून या बाबतींत त्यांचा सल्ला घेतों. आतां तूं जा आणि लाग आपल्या उद्योगाला.

नंतर मायादेवी तेथून निघून बाहेर आली आणि आपल्या नित्यक्रमास लागली.

---

## राजा शुद्धोदन

जातक–अट्ठकथा

हिमालयाच्या उतरणीवर नेपाळच्या दक्षिणेस शाक्य लोकांचें महाजनसत्ताक असें एक छोटेंसें राष्ट्र होतें. हे शाक्य लोक मूळचे अनार्य; पण पुढें त्यांनीं वैदिक आर्यांची संस्कृति उचलली होती; तरी पण आर्यांत त्यांचा व्हावा तसा एकजीव झालेला नव्हता. या

शाक्याप्रमाणेंच आणखी कांहीं अनार्य जमाती होत्या. त्यांत कोळी, नाग, नंद, शिशुनाक, लिच्छवी, मौर्य, व मल्ल अशा अनेक जाती प्रसिद्ध असून त्यांचीं लहान लहान राष्ट्रेंहि पण होतीं. हे लोकही अनार्यच, पण शाक्यांप्रमाणेंच यांनींहि आर्य संस्कृतीचा थोडाबहुत स्वीकार केला होता. पण त्यांची वैदिक धर्मावर असावी तशी पूर्ण व भरीव श्रद्धा नव्हती, ही गोष्ट मात्र विसरून चालणार नाहीं.

चरित्र काळीं शाक्यांचा शुद्धोदन नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचें राज्य लहानच; पण तें एकतंत्री नसून, प्रजासत्तात्मक होतें. शाक्यांच्या शेजारींच कोळ्यांचेंहि राज्य असून दोहोंच्यामध्यें रोहिणी नांवाची नदी वाहत होती. यांच्या निर्वाहाचें मुख्य साधन म्हणजे शेती. शेतीवरच त्यांची बहुतेक उपजीविका होत असे. राजा शुद्धोदन स्वतः फार उद्योगी, उदार, सद्गुणी व मोठा धार्मिक होता आणि त्यामुळें लोक त्यास फार मान देत असत.

या शाक्य राजांचा मूळ पुरुष म्हणजे सुजात. त्याचा मुलगा ओपुर. ओपुरचा मुलगा निपुर. निपुरचा मुलगा उल्कमुख. त्याचा मुलगा जयसेन. जयसेनाला सिंहहनु नांवाचा मुलगा व यशोधरा नांवाची मुलगी होती. ही कोलीय राजा राम याच्या अंजन नांवाच्या मुलास दिली होती, व अंजनाची बहीण कंचना ही सिंहहनूस घेतली होती. सिंहहनूला कंचनेपासून चार मुलगे व दोन मुली झाल्या. त्यांचीं नांवें शुद्धोदन, धौतोदन, शुक्लोदन व अमृतोदन हे असे चार मुलगे व अमिता व प्रमिता या दोन मुली मिळून सहा अपत्यें त्यास झालीं.

इकडे अंजनाला यशोधरेपासून सुपरबुद्ध व दंडपाणी असे दोन मुलगे व माया व गोतमी अशा दोन सुंदर कन्या झाल्या. त्यांत मायादेवी वडील असून गोतमी ही तिच्यापेक्षां वर्षानें लहान होती. या दोन्ही कन्या सिंहहनूचा ज्येष्ठ मुलगा जो शुद्धोदन त्यास दिल्या होत्या. पुढें या शुद्धोदनाला मायादेवीपासून सिद्धार्थ उर्फ गौतम व

प्रजापती गोतमीपासून नंद नांवाचा मुलगा झाला. शुद्धोदनाची बहीण अमिता ही यशोधरेचा मुलगा जो सुपरबुद्ध त्यास दिली असून तिच्यापोटीं देवदत्त नांवाचा मुलगा झाला. दंडपाणीला एक मुलगी होती. तिचें नांव गोपा ऊर्फ यशोधरा. शुद्धोदनाचा भाऊ जो शुक्लोद्न त्याला आनंद व देवदत्त नांवाचे दोन मुलगे झाले. तिसरा भाऊ जो अमृतोदन त्याला महानाम व अनिरुद्ध असे दोन मुलगे व रोहिणी नांवाची एक कन्या झाली. धौतोदनाचा मुलगा भद्रक. शुद्धोदनानंतर महानामा राजा झाला व त्याच्या पश्चात् हा भद्रक गादीवर आला. असा हा थोडक्यांत शाक्य राजकुलाचा एकंदरींत इतिहास आहे.

शाक्य हें पूर्वी स्वतंत्र राष्ट्र म्हणून गणलें जात होतें. पण बुद्धकाळीं त्याचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्याची गणना कोसल राज्यांत केली जात होती. अर्थात् शुद्धोदन हा स्वतंत्र राजा नसून महाकोसलाधिपति प्रसेनजित्चा मांडलीक म्हणून राज्यकारभार पाहात होता. तथापि तेथील अंतर्गत शांतता व सुव्यवस्था राखण्याचें काम पूर्वीप्रमाणेंच महाजन मंडळाकडेच होतें. शाक्यांची लोकसंख्या त्या वेळीं जवळजवळ ऐंशी हजार असून राज्याचा विस्तार पंधराशें चौरस मैल होता.

शाक्यांचा मुख्य धंदा म्हणजे शेती असें नुकतेंच वर सांगण्यांत आलें आहे. अर्थात् शेतीवरच त्यांचा सर्व भर होता, हें निराळें सांगावयास नकोच. म्हणून मेघांचा राजा जो इंद्र त्याचे ते मोठे उपासक असत. प्रत्येक वर्षी आषाढी पौर्णिमेस ते त्याच्याप्रीत्यर्थ 'मधुमहोत्सव' नांवाचा एक मोठा उत्सव करीत. तो सारखा सात दिवस चाले. त्या उत्सवांत गरीबश्रीमंत, लहान-थोर, बायका-पुरुष-अर्थात् प्रत्येक शाक्य कुटुंब मोठ्या भक्तीनें, आनंदानें व उत्साहानें भाग घेई. भारतीयांच्या हौसी व खेळाडू वृत्तीला अनसरून या उत्सवांत लोक ठीकठिकाणीं जमून नाचरंग, खाणेंपिणें, खेळ, तमाशे, यांची रेलचेल करीत, हा शाक्यांचा राष्ट्रीय महोत्सव असे. ( पुष्परक्त जातक १४७ ).

अशा प्रकारचा उत्सव सांप्रत तेथें चालू होता. लोक सगळे आनंदांत, आरामांत, खुशींत, चैनींत, खेळांत व तमाशांत गढून गेले होते. पण एक माणूस–शुद्धोदनाची पट्टराणी मायादेवी–मात्र याला अपवाद होती. ती या आनंदोत्सवापासून अगदीं अलिप्त होती. होय, करणार काय बिचारी! वय पंचेचाळीस वर्षांचें पण पोटीं ना मूल ना बाळ! अपत्यभाग्य तिच्या नशिबीं लिहिलें नव्हतें! केवढें दुर्दैव तिचें! पण त्याला कोण काय करणार? या उणीवीमुळें ती मनांतल्या मनांत अत्यंत हिरमुसलेली झाली असून, तिला कशाची म्हणून हौस व कसला म्हणून उत्साह राहिला नव्हता. सदान् कदा उदासीन वृत्ति! अर्थात् चारचौघांत मिळून मिसळून खेळीमेळीनें वागणें, त्यांच्यांत उठणें-बसणें, बोलणें-चालणें, हंसणें-खिदळणें असल्या गोष्टींचा तिला मनापासून तिटकारा वाटे. मात्र देवकार्यांत तिचें लक्ष नव्हतें असें नव्हे. उत्सवांतील इतरकार्यक्रमांत–म्हणजे मनोरंजक व करमणुकीच्या बाबतींत–ती उदासीन दिसत असली, तरी देवकार्यांत मात्र ती सदैव दक्ष व तत्पर असे. तेथें कधींहि खोटी व्हावयाची नाहीं. इतर वेळीं ती गैरहजर राही, पण तो वेळ ती एकांतात राहून देवकार्यांत व धर्मकृत्यांत घालवीत असे.

आजच्या पौर्णिमेच्या दिवशीं देखील तिनें तोच क्रम पाळला. उत्सवांतील देवकार्य आटपल्यावर राहिलेला वेळ दानधर्मांत व धर्मकथा श्रवणांत घालवून रात्रीं अल्पोपहार करून, ती आपल्या शयनमंदिरांत जाऊन बिछान्यावर पडली व पुढें थोड्याच वेळांत तिचा डोळा लागला. मध्यरात्र उलटून गेल्यावर उत्तररात्रीं तिला झोंपेंत ग्रंथारंभीं सांगितल्याप्रमाणें एक विचित्र स्वप्न पडलें.

ती स्वप्नांतील हकीकत दुसरें दिवशीं सकाळीं शुद्धोदनास सांगितल्यावर त्यालाहि तें ऐकून मोठा अचंबा वाटला. नंतर त्यानें वाड्यांत ब्राह्मणांस आमंत्रण करून त्यांस भोजन वगैरे घालून संतुष्ट केल्यावर

रात्रीं घडलेली मायादेवीच्या स्वप्नाची हकीकत कळवून त्याचा अर्थ व फलश्रुति यांचा खुलासा विचारला,

ब्राह्मणांनी—एकंदर आठ होते ते—. तें स्वप्न पूर्ण व साद्यंत ऐकून घेतलें व एकांतांत जाऊन त्याचा नीट विचार केला. नंतर राजास हांक मारून सांगितलें की 'राजा ! चिंता करण्याचें कारण नाहीं. उलट आनंदाचीच गोष्ट आहे. तुझ्या मायादेवीच्या पोटीं पौर्णिमेच्या रात्रीं गर्भ राहिला आहे ! व तो पुत्र आहे ! कन्या नव्हे—सुपुत्र आहे ! राजा, लवकरच तुला पुत्रदर्शन घडेल आणि मायादेवीच्या डोळ्यांचें पारणें फिटेल ! !

---

## तारा चमकला !

( जातक—अट्ठकथा )

मायादेवीचा आतां कोण आनंद ! केवढा संभ्रम ! नि काय उल्हास ! ती आतां गर्भवती असून लवकरच लहानग्या राजस राण्याची प्रेमळ माता होणार ! ! अहाहा ! केवढें मधुर भविष्य तें ! ! या सुवार्तेनें अपत्यदर्शनासाठीं हपापलेलें स्त्रीहृदय आनंदानें व उत्साहानें उचंबळणार आणि उफाळणार नाहीं, तर काय होईल ? घरांत केवढीहि संपत्ति असो, सुखसाधनांची ही रास पडो, फार काय, राहावयास कुबेराचा वाडा नि भोगावयास स्वर्गांतील सर्व सुखविलास मनमुराद लाभोत, पण त्यानें स्त्रीहृदयाची खरी तहान भागली नि अंतरंगाची टोंचणी राहिली, असें मात्र समजूं नये.

अपत्यलाभ हा निसर्गदेवतेनें स्त्रीजातीला दिलेला एक महान दिव्य वर असून, तो महाप्रसाद ज्या स्त्रीच्या पदरांत पडला नाहीं, त्या स्त्रीचें सर्व कांहीं जिणें व्यर्थ—अगदीं व्यर्थ—म्हटलें तर तो प्रमाद होईल काय ? स्त्रीजन्माचें—नव्हे स्त्रीहृदयाचें—नितांत सुखनिधान म्हणजेच तिच्या कुशींत जन्म घेऊन तिच्या मांडीवर निजून चिमकुले हातपाय

नाचवीत व उडवीत हंसऱ्या मुखानें तिच्या तोंडाकडे टक लावून पाहणारा तो लहान गोंडस राजहंस! तिच्या आनंदसागरास भरती आणणारा—अंतःकरणास गुदगुल्या करून थै थै नाचविणारा—तो पौर्णिमेचा पूर्णचंद्र!!! मग मायादेवी तें मंगल भविष्य ऐकून आनंदानें फुलून भान विसरली असल्यास त्यांत नवल तें काय?

दिवसामागें दिवस जाऊं लागले आणि मायादेवीची कांति उजळत चालली. मुखश्री प्रसन्न दिसूं लागली व शरीरांत नवचैतन्य खेळूं लागलें. दिवसेंदिवस मनोवृत्ति उचंबळत चालली आणि अंतःकरणांत नवोत्साह उफाळूं लागला! याप्रमाणें होतां होतां आठवा महिना लागला. अर्थात् शरीरांत आतां सुस्ताई वाढूं लागली. प्रकृति नरम पडत चालली. आणि दैनिक व्यवहारांत शैथिल्य डोकावूं लागलें. याप्रमाणें होतां होतां आठवा महिनाहि गेला. नवव्यास सुरुवात झाली.

तुम्ही कांहींही म्हणा, स्त्रियांना माहेरचें वेड नि ओढ म्हणजे अत्यंत भारी. तशांत गरवारपणीं तर त्यांना त्याचा सारखा ध्यासच लागलेला असतो. गोष्ट खरी आहे. गरवारपणीं स्त्रीचें मन एकापरी अस्वस्थ असतें. तशांत प्रथम प्रसूति-प्रसंगीं तर तें अगदींच अधीर व बेचैन बनतें. म्हणून त्या नाजुक अडचणीच्या प्रसंगीं मायेच्या माणसांत जाऊन पडण्याची त्यांना तीव्र इच्छा होणें हें स्वाभाविकच आहे. मग मायादेवी तरी या सर्वमान्य नियमाला अपवाद कशी असणार? नऊ महिनेहि भरले. दहावा प्रारंभ झाला. तेव्हां तिनें आपला मनोदय पतीस कळविला. होय ना करतां करतां अखेर तिची तीव्र इच्छा व आग्रह पाहून शुद्धोदनानें तिला शेवटीं परवानगी दिली.

मायादेवीचें माहेर म्हणजे शेजारच्या कोळीय राजाची देवदह नगरी. तिच्यांत व कपिलवस्तूंत अवघें दहाबारा मैलांचें अंतर. आज उद्यां म्हणतां म्हणतां दहावा महिनाहि संपुष्टांत आला. भर दिवसांची गरवारशी ती. आतां विलंब करण्यांत अर्थ नाहीं

असा विचार करून अखेर वैशाखी पौर्णिमेचा दिवस प्रयाणास मुकरर करण्यांत आला. त्या दिवशीं पहाटेस मायादेवी ही आपल्या परिवारासह माहेरीं जाण्यास मेण्यांत बसून वाड्यांतून बाहेर पडली.

कपिलवस्तू व देवदह यांचें दरम्यान वाटेंत लुंबिनी नांवाचें एक सुंदर उपवन होतें. तेथें सालवृक्षांची सुंदर राई होती. या वेळीं त्या वृक्षांना फुलांचा मोठा विलक्षण बहर आला असून तो देखावा पाहण्यास मोठा मनोहर दिसत होता. सूर्यनारायणाचीं सुवर्ण किरणें आसमंतांतील पर्वतशिखरांवर व वृक्षराजीवर पडल्यामुळें तेथील वनश्रीला अपूर्व शोभा आली होती. जिकडे तिकडे विविध फुलांचा गोड परिमळ दरवळून राहिला होता. गार वाऱ्याची मंद झोत मनाला उल्हसवीत होती. पक्षिगणांच्या मधुर किलकिलाटानें, मधुन मधून निघणाऱ्या मोरांच्या केकांनीं व कोकिलांच्या सुस्वर कूजनांनीं तो सभोंवतालचा प्रदेश खुलून गेला होता.

दिवस दोन तास चढला असेल नसेल, तों इतक्यांत मायादेवी तेथें पोंचली. तेथें आल्यावर ती वनशोभा पाहून तिच्या मनाला एक प्रकारचा आनंद वाटला व तेथें खालीं उतरून क्षणभर फिरून ती मौज व शोभा पाहण्याची लहर आली. मग विलंब कसला? लागलीच मेणा उभा केला व आंतून उतरून चटकन ती बाहेर आली व ती प्रसन्न वनशोभा पाहत पाहत व हळुहळूं गमत गमत इकडे तिकडे फिरूं लागली. स्थान मोठें रमणीय ! व वेळहि तशीच प्रशांत ! त्यामुळें तिला तेथें मोठा उत्साह व उल्हास वाटला हें स्वाभाविकच आहे.

ती आतां जेथें उभी होती तेथें शेजारींच एक सालवृक्ष सुंदर मोहरांनीं नखशिखांत बहरलेला होता. त्याची एक फांदी अगदीं हातास लागण्यासारखी असून ती फुलांनीं भरगच्च भरून गेली होती. ती धरून तोडून घेण्याचा मोह तिला अनावर झाला व म्हणून ती त्या फांदीजवळ जाऊन ती धरण्यास तिनें हात वर केला.

पण तेवढ्यानें ती हातास लागेना. चारसहा बोटें वर राहिली. आणखी जरा उंच हात करून ती पकडावी या उद्देशानें ती टांचेवर उभी राहिली व जरा अंग मोडून हात लांब करून ती फांदी पकडून जोरानें खालीं ओढली. पण यामुळें कमरेंत एकदम सळक भरली आणि पोटांत एक जोराची कळ उठली.

त्यासरशी ती धरलेली फांदी जशीच्या तशीच सोडून देऊन पोट घट्ट दाबून धरून ती क्षणभर स्तब्ध उभी राहिली. पुन: इतक्यांत आणखी एक कळ आली. तिच्या मागोमाग पुन: एक आली. याप्रमाणें कळा मागून कळा येऊं लागल्या. खरें सांगावयाचें म्हणजे त्या कळा सामान्य कळा नसून, प्रसव वेदना होत्या.

दासींनी तो प्रकार ताडला, व क्षणाचाहि विलंब न करतां तिच्या सभोंवतीं त्या सालवृक्षाखालींच कनात लाऊन अडोसा केला. पुढें लवकरच वेदनांवर वेदना येऊन मायादेवी ही उभ्या उभीच प्रसूत झाली ! दिव्य पुत्ररत्न होतें तें ! अत्यंत सुंदर नि अत्यंत पाणीदार ! ! तिच्या डोळ्यांचें पारणे फिटलें व आनंद शेषाच्या टाळूस जाऊन भिडला ! वैशाख शुद्ध पौर्णिमा असून सकाळचा सुमंगल पहिला प्रहर होता तो ! वार शुक्रवार नि विशाखा नक्षत्र ! !

बाळ जन्मल्याबरोबर चमत्कार असा झाला कीं तेथें झगझगीत प्रकाश उजळला व आकाशांतून दोन शीतोष्णोदकाच्या धारा खालीं उतरल्या. त्या जलानें बाळ व बाळंतीण यांस स्वच्छ व शुद्ध करून घेण्यांत आलें. इतक्यांत ब्रह्मलोकांतून ब्रह्मदेव खालीं उतरून मायादेवीजवळ येऊन तिला म्हणाला, ' देवि ! हा तुझा पुत्र जगाचा उद्धार करणारा महात्मा आहे ! म्हणून धन्य आहेस तूं ! ! '

इतकें बोलून तो तेथून निघून गेला व ही वातमी कपिलवस्तूस कळविण्यासाठीं एक स्वार ताबडतोब पाठविण्यांत आला.

# भविष्य-कथन

निदान, जातक-अट्ठकथा

कपिल-वस्तूंत आज केवढा आनंद ! शुद्धोदनाला सुंदर पुत्ररत्न लाभलें ! शाक्यराष्ट्राला युवराजाची प्राप्ति झाली ! प्रजेचा केवढा आनंद ! मायादेवी प्रसूत झाली व तिला पुत्र झाला ही बातमी कपिलवस्तूंत प्रसिद्ध होतांच जिकडे तिकडे आनंदोत्साहाची एकच लाट उसळली. वेशीवर चौघडे झडूं लागले ! नगारे निनादूं लागले. मधूनमधून तुताऱ्या, शिंगें गर्जूं लागलीं ! वेद शाळेंत मंत्र घोष सुरू झाला ! खरोखर कपिलवस्तूंचा आनंद म्हणजे आज वर्णनातीत होता. खरा स्वर्गानंद ! !

मायादेवी लुंबिनी वनांत प्रसूत झाल्याची वार्ता एका घोडेस्वारानें दौडत येऊन राजवाड्यांत शुद्धोदनास प्रथम जाहीर केली. ती ऐकून राजास मोठा आनंद झाला. नंतर कांहीं निवडक स्वार बरोबर घेऊन विलंब न करतां राजा घोड्यावर बसून वनाकडे निघाला. तेथें गेल्यावर मुलाचें दर्शन घेतलें. बाळबाळंतीण यांना पुढें देवदहास पाठविण्याचा बेत रहित करून त्यांना परत गांवाकडे घेऊन येण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें त्यानें व्यवस्था केली आणि पुढें उशीर न करतां तावडतोब गांवचा रस्ता धरला. राजाला पुत्र झाल्याची बातमी राजधानींत वाऱ्याप्रमाणें हां हां म्हणतां सर्वत्र पसरली.

मग आतां सांगावयाचें काय ? मुख्य राजरस्ता तोरणें, पुष्पमालादिकांनीं ताबडतोब श्रृंगारण्यांत आला ! वेशीवर मंगल वाद्यें आळवूं लागलीं ! लोक रस्त्यावर तेथें तेथें जमून आनंदघोष करूं लागले ! चौकाचौकांवर ध्वजपताका फडकूं लागल्या. शहरांत सर्वत्र आनंद नि उत्साह यांची एकच लाट उसळली !

इतक्यांत बाळबाळंतिणीसहित राजा वेशीजवळ आला. तेथून वाजत गाजत मोठ्या थाटांत राजवाड्याकडे त्यांची मिरवणूक निघाली.

बाळ व बाळंतीण मेण्यांत असून तो पुष्पहारांनीं व मौक्तिक माळांनी श्रृंगारलेला होता. वर छत्र चामरें धरण्यांत आलीं होतीं.

रस्त्यावरून मेणा हळुहळू चालला होता. स्त्रिया माडीवर व गच्चीवर चढून रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं बाळबाळंतिणीवर पुष्पवृष्टि करीत होत्या. रस्त्यावर जमलेले लोक आनंदघोष करीत होते. याप्रमाणें व अशा थाटानें मिरवीत मायादेवी बाळासहित अखेर राजवाड्यांत येऊन सुखरूप दाखल झाली.

पुढें पांचवा दिवस उजाडला. शाक्यांच्या पद्धतीप्रमाणें नामकरणाचा दिवस होता तो. म्हणून त्या दिवशीं सकाळीं बाळ व बाळंतीण यांस न्हाऊं घालण्यांत आलें. दुपारीं ब्राह्मण भोजन झालें. त्यानंतर पान-सुपारी दक्षिणा वगैरे झाल्यावर राजानें ब्राह्मणांस बाळाचीं लक्षणें पाहून तो पुढें कसा होईल याचें भविष्य वर्तविण्याची विनंती केली.

ब्राह्मणांनी आंत जाऊन बाळाची सर्व गात्रें नीट पाहून घेतलीं. त्याचे हात, पाय, डोळे, नाक, कान, तोंड, जीभ, ऊर, डोकें कम्मर, केंस, वगैरे सर्व अवयव बारकाईनें व शांतपणें तपासून नंतर बाहेर आल्यावर एका खोलींत जाऊन एकांतांत ते कांहीं वेळ विचार करीत बसले.

पुढें कांहीं वेळानें विचार करून बाहेर येऊन राजास हाक मारून म्हणाले राजा, ऐक तुझ्या मुलाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. तुझा कुमार बत्तीस लक्षणांनी युक्त आहे.

राजाः—तीं कोणतीं, महाराज ?

ब्राह्मणः—तीं हीं. (१) हा बालक सुप्रतिष्ठितपाद आहे. (२) त्याच्या पादतळीं सहस्र आरे नेमि व नाभि यांनीं युक्त अशीं संपूर्ण चक्रें आहेत. (३) त्याच्या टांचा लांब आहेत. (४) बोटें लांब (५) हात व पाय मृदु व कोमल आहेत (६) व ते जाळ्यासारखे आहेत. (७) पायाचे घोटे शंखाप्रमाणें वर्तुलाकार आहेत. (८)

त्याच्या जंघा हरिणीसारख्या भरींव आहेत. ( ९ ) उभा राहून आणि न वांकतांच हाताच्या तळव्यांनीं त्याला आपल्या गुडघ्यास स्पर्श करतां येतो. ( १० ) त्याचें गुह्य कोशानें झांकलेले आहे. ( ११ ) त्याचा वर्ण सोन्यासारखा आहे. ( १२ ) कातडी अत्यंत सूक्ष्म असून त्याला धूळ लागण्यासारखी नाहीं ( १३ ) त्याच्या रोमकूपांत एकेकच केंस उगवलेला आहे. ( १४ ) त्याचे केंस उर्ध्वाग्र, नील अंजन वर्ण व कुरळे असून ते उजव्या बाजूला वळलेले आहेत. ( १५ ) त्याचीं गात्रें ताठ व सरळ आहेत. ( १६ ) त्याच्या शरीरावर वर आलेले सात भाग आहेत. ( १७ ) त्याच्या शरीराचा पुढचा अर्धा भाग सिंहाच्या पुढच्या भागासारखा आहे. ( १८ ) त्याच्या खांद्यामधील प्रदेश भरीव आहे. ( १९ ) तो निग्रोधाप्रमाणें वर्तुलाकार आहे. ( २० ) त्याचे खांदे सारखे वळलेले आहेत. ( २१ ) त्याची रसना फार तीक्ष्ण आहे. ( २२ ) हनुवटी सिंहासारखी आहे. ( २३) त्याला चाळीस दांत आहेत. ( २४ ) ते सारखे आहेत ( २५ ) त्यांत विवरें नाहींत. ( २६ ) त्याच्या दाढा शुभ्र आहेत. ( २७ ) त्याची जीभ लांब आहे. ( २७ ) त्याचा ब्रह्मस्वर आहे. (२८ ) तो करवीक पक्ष्याप्रमाणें मंजूळ आहे.(२९) त्याचे नेत्र निळे आहेत. (३०) पापण्या गाईच्या पापण्यासारख्या आहेत. ( ३१ ) भुवयांमध्यें कापसाच्या तंतूप्रमाणें पांढरी लव उगवलेली आहे व ( ३२ ) त्याच्या डोक्यावर उष्णीष आहे. ( म्हणजे डोकें मध्यें जरा उंच आहे. ) अशीं हीं तुझ्या मुलाचीं लक्षणें आहेत.

राजाः—म्हणजे त्यावरून मी काय समजावे ?

ब्राह्मणः—राजा, हीं सामान्य लक्षणें नाहींत; तीं महापुरुष लक्षणें होत.

राजाः—म्हणजे ?

ब्राह्मणः—म्हणजे असें; याचे दोन पर्याय आहेत; एक हा कुमार लौकिकांत पडला तर मोठा चक्रवर्ति होईल !

राजा:—आणि दुसरा ?

ब्राह्मण:—दुसरा पर्याय असा कीं हा जर संसारनिवृत्त होऊन धर्मविचारांत शिरला तर मोठा धर्मसंस्थापक होईल ! ! एकूण, राजा ! हा बालक पुढें महापुरुष होणार हें खास !!

या ब्राह्मणांत कौण्डिण्य नांवाचा एक तरुण पण महाविद्वान ब्राह्मण होता. त्यानें मात्र एकच बोट दाखवून चक्क सांगितलें कीं 'राजा ! हा चक्रवर्ति न होता बुद्धच होणार !' मुलाचें हें भविष्य ऐकून शुद्धोदनास प्रथम विस्मय वाटला व त्याबरोबरच महानंदहि झाला हें काय आतां निराळें सांगावयास पाहिजे ?

नंतर रात्रीं त्याचा नामकरणविधि होऊन त्याचें नांव सिद्धार्थ असें ठेवण्यांत आलें. अर्थ म्हणजे शुद्धोदनाची पुत्रेच्छा आणि ती सिद्ध म्हणजे पूर्ण झाली—सफल झाली—म्हणून सिद्धार्थ हें नांव ठेवण्यांत आलें आणि तें युक्तच होतें. याप्रमाणें हा पांचव्या दिवसाचा नामकरण समारंभ मोठ्या थाटांत व उत्सवांत साजरा करण्यांत आला.

---

## विधीची विचित्र लीला !

ललितविस्तर

पांचव्या दिवशीं रात्रीं नामकरण झाल्यावर जमलेल्या बायका व इतर माणसें हळू हळू तेथून निघून गेलीं. नंतर मायादेवी ही रात्रीचें जेवणखाण आटपून, आपल्या शय्येवर जाऊन निजली. पुढें काय झालें कोण जाणें; कांहीं वेळानें तिच्या अंगांत कणकण वाटून, ताप भरला. आयासानें आला असेल असें समजून,ती कोणाला कांहींच न सांगतां रात्रीं तशीच निजली.

पुढें उजाडलें न उजाडलें तों तापाचें मान वाढून अंग विस्तवासारखें कढत झालें. आणि मनस्वी अशक्तता आली. ही बातमी ताबडतोब

शुद्धोदनास कळविण्यांत आली, व लागलीच राजवैद्य आले व प्रकृति तपासल्यावर त्यांनीं विलंब न करतां औषधोपचाराची योजना केली.

दुपारीं मायादेवीची प्रकृति अधिकच बिघडली. ताप मनस्वी चढला. पोटांत काहील सुरू झाली. डोकें जडशीळ बनलें. डोळे लालबुंद दिसूं लागले. अंगाचा दाह होऊं लागला. वैद्यराजांनीं शिकस्त केली. काढे, मात्रा, भस्में, गुटिका, चूर्णें जेवढीं म्हणून अमोल्य व अमोघ गणिलीं जात होतीं, त्या सर्वांचा उपयोग करून पाहण्यांत आला. पण गुणाच्या नांवानें सर्व दगडच ठरले !

संध्याकाळ झाली. प्रकृतींत कांहीं आराम नाहीं. उलट अधिकाधिक ती बिघडतच चालली. ताप तर सारखा फणफणत होता. गोतमी जवळच बसली होती. मायादेवीनें मध्येंच डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें आणि मानेनें तिला जवळ येण्यास खुणविलें.

त्याप्रमाणें गोतमी उठून तिच्याजवळ गेली. देवीही कशीबशी उठून बसली. आणि गोतमीला पदर पसरण्यास सांगून जवळचें तें चिमुकलें बाळ उचलून तिच्या पदरांत घालून, हलक्या स्वरांत म्हणाली, 'गोतमी, हें बाळ आजपासून तुझं बरं का? माझं नव्हे ! त्याचा नीट संभाळ कर !' इतकें बोलून डोळ्यांतून अश्रु काढले ! !

गोतमीचाहि कंठ दाटून आला व ती पदरांत बाळ घेऊन हुंदके देऊं लागली ! तिलाहि दुःखाचा आवंढा आला व जीव खालींवर होऊं लागला ! बहिणीची ती दीन अवस्था पाहून तिला ब्रह्मांड आठवलें व डोळे पाण्यानें डबडबून आले ! !

गोतमी बाळ पदरांत घेऊन खालीं बसली. मायादेवी पुनः पूर्ववत् अंथरुणावर लवंडली. पुढें घटिका गेली न गेली तोंच तिला सन्निपात झाला ! आणि अंगावरची खबर चुकली ! ! आतां मात्र शुद्धोदन घाबरला व त्याचे तोंडचें पाणी पळालें. सर्वांनीं सबंध रात्र जागून काढिली.

सर्व वैद्यकीय उपायांची व मंत्रतंत्रांची शिकस्त करण्यांत आली. पण गुणाच्या नांवानें सगळीच निराशा ! !

सातवा दिवस उजाडला; मायादेवी डोळे मिटून स्वस्थ पडून होती. हां नाहीं, हूं नाहीं. ताप उतरला होता. नाडी मंद वाहत होती. शरीर पायाकडून थंड पडत चाललें होतें. श्वास गळ्यांत घरघरत होता. गोतमी बाळाला घेऊन जवळ बसली होती. शुद्धोदन उशाशीं उभा होता. वैद्यराज हात धरून नाडी पाहत होते. सर्वांचीं तोंडें म्लान व चिन्ताग्रस्त दिसत होतीं. सर्वत्र औदासीन्यतेचें निराशाजनक वातावरण पसरून राहिलें होतें !

झालें. लहानशी एक उचकी आली व मायादेवींचा सर्व कारभार आटपला ! वाड्यांत एकच आकांत माजला ! ! सात दिवसांच्या कोंवळ्या अर्भकाला टाकून माउली इहलोक सोडून परलोकीं निघून गेली ! ! बाळ रडूं लागलें आणि माउली निघून गेली ! ! हाय रे विधात्या ! किती निष्ठुर तूं ! ! !

---

## प्राचीन भारतीय राजवटि

दीघनिकाय

बुद्धकाळीं भरतखंडांतील राजकीय परिस्थिति कशी होती, याविषयीं थोडासा खुलासा केल्यास तो अप्रासंगिक होणार नाहीं. म्हणून त्याचा परामर्श घेतों. बुद्धकाळीं एकंदर तेरा एकतंत्री राज्यें व तीन लोकशाही राज्यें होतीं असें तत्कालीन बौद्ध व इतर वाङ्मयावरून दिसून येतें. तीं कोणतीं व कोठें होतीं याची माहिती थोडक्यांत म्हणजे अशी आहे.

१ कोसलः—( हल्लींचा अयोध्या व नेपाळ प्रांत ) हें राज्य त्या वेळीं मोठें प्रबळ असून, फार प्रसिद्ध होतें. तें एकसत्ताक राज्य

असून, त्याची राजधानी श्रावस्ती ( सावत्ती ) ही होती. ही अचिरावती ( राक्षी ) नदीच्या तीरावर वसली असून, तेथें त्या वेळीं प्रसेनजित् नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याचें राज्य मोठें असून तें एकसत्ताक होतें. या राज्याची पूर्व सीमा गंडकी असून दक्षिणेस गंगानदी वाहत होती. हा राजा वैदिक धर्माचा अनुयायी व अभिमानी होता.तरी तो इतर धर्मांचाहि परामर्श घेत असे. पुढें बुद्धाला व त्याच्या संघाला श्रावस्ती यथें जेतवन नांवाचा प्रसिद्ध विहार बांधून देणारा उदार महात्मा अनाथपिंडक नांवाचा श्रेष्ठी हा या श्रावस्तीचाच राहणारा होय.

२ **मगधः**—(हल्लींचा बिहार प्रांत) कोसल राज्याच्या एवढेंच महत्त्वाचें राज्य म्हणजे मगधांचें होय. येथील राजा बिंबसार हा असून त्याला प्रसेनजितची बहीण कोसलादेवी ही दिली होती. त्याची राजधानी राजगृह या नांवाची होती. हें राज्य झालें तरी एकसत्ताकच होतें. तथापि कोसलाधिपति काय किंवा मगधाधिपति काय, दोघेहि उदार, सदाचरणी व धर्मनिष्ठ असून त्यांच्या सुराज्यांत सुखसमृद्धि व शांतिसमाधान हीं मूर्तिमंत नांदत होतीं. प्रजा स्वकर्मनिरत, धार्मिक, संतुष्ट व आनंदी असे. बिंबसार झाला तरी वैदिक धर्माचा चाहता व अनुयायी होता.नंतर पुढें बुद्धाचा उपदेश घेऊन तो बौद्ध उपासक झाला. त्यानें भगवान बुद्धाकरितां व बौद्ध भिक्षूंकरितां म्हणून राजगृहाशेजारीं वेळुवन नांवाचें एक सुंदर उद्यान दान देऊन बौद्ध धर्मप्रसारास चांगली मदत केली. शिवाय तो इतर श्रमणांचाहि योग्य आदरातिथ्य व मानसन्मान करीत असे.

३ **अंवतीः**—येथील राजा चंडप्रद्योत हा असून त्याची राजधानी उज्जयिनी ही होती. हेंही एकतंत्री राज्य होतें. येथें बुद्ध आल्याचें व उपदेश केल्याचें दिसून येत नाहीं.

४ **वत्सः**—हें राज्य यमुना तटाकीं होतें. त्याची राजधानी

कौशांबी ही असून तें तत्कालीन व्यापाराचें एक मोठें केंद्र होतें. त्याचा राजा अजय वत्सराज उदयन हा असून, त्यानें अवंतीच्या प्रद्योत राजाची कन्या वासवदत्ता इच्याशीं विवाह केला होता. कोशांबी येथें बुद्धाला व बुद्धभिक्षूंना राहण्यासाठीं बुद्ध शिष्यांनीं तीन विहार बांधून दिले होते. उदयनराजाची प्रमुख राणी सामावती –बिंबसाराची मुलगी–ही भगवान बुद्धाची प्रमुख उपासिका होती. हें एकसत्ताक राज्य असून तेथें वैदिक धर्माचें प्राबल्य होतें.

५ **कासीः**—या राज्याची राजधानी वाराणसी ही होती. तेथील राजाला ब्रह्मदत्त असें म्हणत असत. हा ब्रह्मदत्त मोठा उदारधी राजा असून तो वैदिक धर्माचा अनुयायी होता. वाराणसी ही नगरी कलाकौशल्यांत फार नांवाजलेली असून, तेथें व्यापारहि मोठ्या प्रमाणांत चालत असे. या वाराणसींतील अश्वसेन राजाच्या 'वामा' नांवाच्या राणीच्या उदरीं पार्श्वनाथ–जैनांचा तेवीसावा तीर्थंकर–जन्मला होता असें म्हणतात. परंतु बुद्धकालीं त्या देशाचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्याची गणना कोशल साम्राज्यांत झाली होती.

६ **अंगः**—हें राज्य बुद्ध काळीं मगधच्या बिंबसार राजानें आपल्या राज्याला जोडलें होतें. त्याची राजधानी चंपा, म्हणजे हल्लींचें भागलपूर नजीकचें चंपानगर. तेथें एक सरोवर असून त्याच्या सभोंवतीं पांढऱ्या चंपकाचीं सुवासिक फुलझाडें लागलीं होतीं. बुद्ध जेव्हां धर्मोपदेशार्थ इकडे येत, तेव्हां त्यांचा मुक्काम या तलावाच्या कांठींच होत असे.

७ **गांधारः**—हा देश हल्लीं पूर्व अफगाणांत मोडतो. येथें बुद्धकाळीं पुक्कसाति नांवाचा राजा राज्य करीत होता. तो पुढें बुद्धाचा उपदेश घेऊन त्यांच्या भिक्षुसंघांत येऊन दाखल झाला. त्याची राजधानी तक्षशिला. तेथें त्या वेळीं फार मोठें विद्यापीठ होतें. हजारों विद्यार्थी दूर दूर प्रांतांतून येऊन तेथें विविध विद्या व कला शिकत असत. कोणी

वेदाध्ययन करीत. कोणी शिल्पकलेचें शिक्षण घेत. कोणी ज्योतिष शास्त्र पढत. याप्रमाणें तक्षशिला ही नगरी विद्येत फार नांवाजलेली व पुढारलेली होती. राजगृह येथील विख्यात आयुर्वेदविशारद राजवैद्य जीवककुमार यानें आयुर्वेदाचा अभ्यास येथेंच येऊन केला होता.

८ **कांबोजः**—हें राज्य हल्लीं जेथें कच्छ काठेवाड आहे, तेथें होतें. येथील राजधानी द्वारका. येथील लोकांची जंगली घोडे पकडण्याची फार प्रसिद्धि होती. हे लोक जंगली घोडे पकडून ते घोडयांच्या व्यापाऱ्यांना विकत, व ते व्यापारी मध्यदेशांत जाऊन तेथें त्यांचा व्यापार करीत. काठेवाडी घोडयांची आजही सर्वत्र प्रसिद्धि आहे.

९ **मत्स्यः**—हा देश यमुनेच्या पश्चिमेस असून कुरूच्या दक्षिणेस होता. तें एक लहानसें राष्ट्र होतें. हें बुद्धकाळीं फारसें प्रसिद्ध नव्हतें.

१० **पांचालः**—हें राष्ट्र कुरु व गंगानदी यांच्या पूर्वेस असून त्याची राजधानी कंपिला ही होती.

११ **कुरुः**—हें राष्ट्र बुद्धकाळीं फार लहान असून, त्याला म्हणण्यासारखें राजकीय महत्त्व नव्हतें. त्याची राजधानी इंद्रप्रस्थ ही असून, तेथें बुद्धकाळीं कौरव्य नांवाचा राजा राज्य करीत होता. येथें वैदिक धर्माचें प्राबल्य असल्यामुळें बुद्धाची येथें फारशी डाळ शिजली नाहीं. येथें भगवंताचा एकहि विहार नव्हता. हें एकसत्ताक राज्य असून विस्तार बेताचा होता.

१२ **शूरसेनः**—येथें अवंतिपुत्र नांवाचा राजा राज्य करीत होता. याची राजधानी मथुरा. येथें बुद्ध आल्याचें फारसें दिसत नाहीं.

१३ **अश्मकः**—हें राज्य दक्षिणेंत गोदावरी नदीच्या आसपास वसलेलें होतें. यासंबंधीं अधिक माहिती उपलब्ध नाहीं.

याप्रमाणें हीं तेरा राज्यें बुद्धकाळीं हयात असून तीं सर्व एकसत्ताक होतीं. याशिवाय हिमालयाच्या पायथ्याशीं व शेजारीं कांहीं

गणसत्ताक म्हणजे लोकशाही राष्ट्रेंहि नांदत होतीं. त्यांतील कांहींचा उल्लेख करतों. बुद्धकाळीं या महाजनसत्ताक राष्ट्रांपैकीं फक्त दोनतीन राष्ट्रेंच काय तीं स्वतंत्र असून बाकीच्यांचा समावेश कोसल व मगध राज्यांत झालेला होता. त्यांत वज्जीचें राष्ट्र प्रमुख होतें.

१४ **वज्जीः**—हें वज्जीचें राष्ट्र त्या वेळीं बलाढ्य व महत्त्वाचें असें होतें. त्याची राजधानी वैशाली. येथील लोकांना लिच्छवी असें म्हणत. हे मूळचे अनार्य असून त्यांच्यावर थोडाबहुत वैदिक संस्कृतीचा संस्कार झाला होता. या लिच्छवी कुळांतच जैन धर्म-संस्थापक महावीर याचा जन्म झाला. हे लिच्छवी लोक त्या काळीं व्रात्य क्षत्रियांत गणले जात होते.

१५ **मल्लः**—वज्जीच्या खालोखाल मल्लाचें राष्ट्र. हें राष्ट्र वज्जीच्या पूर्वेस व कोसलच्या पश्चिमेस होतें. हेंही वज्जीप्रमाणेंच महाजनसत्ताक राष्ट्र होतें. या मल्लाचे बुद्धकाळीं दोन भाग झाले होते. एकाची राजधानी पावा व दुसऱ्याची कुशीनारा ही होती. बुद्ध भगवंताचें या देशांत फार वर्चस्व होतें. या दोन्ही राज्यांत त्याचा शिष्यपरिवार फार मोठा होता. बुद्धाचें शेवटचें भोजन पावानगरींत चुंद लोहाराच्या घरीं झालें व परिनिब्बाण कुशिनारा येथें झालें. याची हकीकत सगळी सविस्तर पुढें येणारच आहे.

१६ **शाक्यः**—हें प्रजासत्ताक राष्ट्र असलें तरी तें स्वतंत्र नव्हतें. प्रसेनजित्च्या कोसल राज्यांत त्याची गणना होत होती. येथील राजा शुद्धोदन हा असून त्याची राजधानी कपिलवस्तु ही होती. या शुद्धोदन राजाच्या पोटींच भगवान बुद्धाचा जन्म झाला. हे शाक्य झाले तरी व्रात्य क्षत्रियांतच गणले जात असत.

१७ **कोळीः**—हें राज्य शाक्यांच्या शेजारीं असून दोहोंच्यामध्यें रोहिणी नदी वाहत होती. बुद्धाची आई मायादेवी ही या कोळीय घराण्यांतील असून ती शुद्धोदनास दिली होती. शाक्य व कोळी

यांचा शरीरसंबंध अत्यंत निकटचा होता. याची राजधानी देवदह असून ती कपिलवस्तूहून फार लांब नव्हती. हें राष्ट्र लहान पण प्रजासत्ताक होतें.

हा असा बुद्धकालीन भरतखंडाचा थोडक्यांत भौगोलिक व राजकीय इतिहास आहे.

---

## विद्यासाधन

निदान ( जातक-अट्ठकथा )

सिद्धार्थ वाढतां वाढतां आतां आठ वर्षांचा झाला. त्याचा भाऊ नंद हाही त्याच्यापेक्षां चारपांच महिन्यांनींच लहान. तेव्हां शुद्धोदनानें या दोघांस एकदमच विद्या शिकण्यासाठीं म्हणून तेथील प्रसिद्ध विश्वामित्र उपाध्यायाकडे नेऊन ठेविलें. त्या वेळीं विद्या शिकावयाची म्हणजे गुरुगृहीं राहूनच ती शिकावी लागत असे. त्या पद्धतीला अनुसरून दोघेहि राजपुत्र गुरुगृहीं जाऊन राहिले.

सिद्धार्थाची बुद्धि तीक्ष्ण व चुरक असल्यामुळें त्याची प्रगति झपझप होऊं लागली. लवकरच त्यानें अक्षर ओळख करून घेऊन वेद शिकण्यास प्रारंभ केला. वेद शिकून झाल्यावर निरुक्त, छंद, इतिहास, पुराण यांचा अभ्यास चालविला आणि नंतर सांख्य, योग, न्याय, व्याकरण इत्यादि शास्त्रांचें अध्ययन करून त्यांत पारंगतता मिळविली. मधून मधून मल्ल, धनु, शस्त्र, अस्त्र इत्यादि क्षात्रविद्यांचे धडेहि घेऊन त्यांतहि तो तरबेज झाला. याप्रमाणें सर्व विद्या शिकून झाल्यावर तेथून निघून शाक्य अर्जुन गुरूजवळ राहून त्याच्याकडून गणित शास्त्राचेंहि अध्ययन केलें. याप्रमाणें तो एकोणीस वीस वर्षांचा झाला, तेव्हां सर्व विद्या पारंगत होऊन तो ज्ञानतेजानें सूर्याप्रमाणें चमकूं लागला !

सिद्धार्थ हा सर्व विद्येंत तेवढ्या लहान वयांतच अत्यंत निष्णात झाला हें पाहून शुद्धोदनास अत्यानंद झाला हें साहजिकच आहे. पण एक गोष्ट मात्र त्याला भेडसावीत होती. ती म्हणजे त्याची तीक्ष्ण वैराग्यवृत्ति. सिद्धार्थाचा कल दिवसेंदिवस जागतिक विषय सुखाकडे हटत जाऊन, तो वैराग्याकडे अधिकाधिक झुकत चालला होता. नेहमी एकांतवासाची त्याला चटक लागत चालली होती.

कोणाशीं फार बोलावयाचें नाहीं, हंसावयाचें नाहीं, खेळावयाचें नाहीं, गप्पागोष्टी मारावयाच्या नाहींत, चारचौघांत जाऊन बसणें उठणें तर नाहींच नाहीं. नेहमीं कावळ्याप्रमाणें एकलकोंडें राहून कसल्या तरी विचारांत गर्क होऊन बसावयाचें. या त्याच्या चमत्कारिक वर्तनामुळें शुद्धोदनास पांचव्या दिवशीं केलेल्या ब्राह्मणांच्या भविष्य-वाणीचें वारंवार स्मरण होऊन, त्याचें मन मधून मधून अस्थिर व अस्वस्थ होई.

शुद्धोदनानें आपल्या लाडक्या सिद्धार्थासाठीं म्हणून तीन सुंदर मंदिरें बांधून ठेविलीं होतीं. त्यांचीं नांवें आराम, सुराम व सुभट अशीं असून, उन्हाळ्यासाठीं आराम मंदीर, पावसाळ्यासाठीं सुराम मंदीर व हिंवाळ्यासाठीं सुभट मंदीर अशी त्यांची योजना होती. प्रत्येक मंदीर ऐषआरामाच्या सर्व सुखसाधनांनीं सुसज्ज असून करमणुकीच्या सर्व करणोपकरणांनीं सुसमृद्ध होतें. विद्याध्ययन संपल्यावर राजानें त्याला या मंदिरांत आणून ठेवून प्रपंचाकडे लक्ष लागेल व त्यांत रमेल अशी सुंदर व्यवस्था ठेविली.

सिद्धार्थाला आतां संसारांत गुंतवावें म्हणजे त्याच्या स्वभावांत व वृत्तींत पालट घडून येईल, असा विचार करून राजानें त्याला अनुरूप अशी वधू शोधून काढण्याचा आंतून प्रयत्न चालविला. त्याच्या मनांत शोधतां शोधतां पुष्कळ मुली येऊन गेल्या. पण त्या सर्व कांहीं ना कांहीं कारणामुळें पसंत पडल्या नाहींत.

शेवटीं एक स्थळ मात्र त्याला दिसलें व पटलें. तें म्हणजे कोळीय राजाचें घराणें. तेथील दंडपाणि राजाला गोपा नांवाची एक सुंदर, सुस्वरूप व सुबुद्ध अशी कन्या होती. तिला यशोधरा असेंहि म्हणत. ही मुलगी अत्यंत सुंदर व सालस असून चांगली उपवर होती. शिवाय ती जवळच्या नात्यांतील होती.

ही गोपा शुद्धोदनाच्या पसंतीला उतरली व त्याप्रमाणें त्यानें दंडपाणीकडे मागणीहि घातली. पण दंडपाणीनें सांगून पाठविलें कीं ती तशी द्यावयाची नसून तिचें स्वयंवर लावावयाचें आहे. या उत्तरानें शुद्धोदनाचा निरुपाय झाला व त्याचें मन किंचित् अस्वस्थ झालें.

सिद्धार्थाची बुद्धि तीक्ष्ण होती म्हणून वर सांगितलेंच आहे. घरीं आल्यावर देखील त्यानें आपला विद्याव्यासंग तसाच पुढें चालू ठेविला. अधून मधून तो घोड्यावर बसून फेरफटका करीत असे आणि केव्हां केव्हां धनुर्बाण घेऊन नेम मारण्याचा क्रमहि त्याचा चालूच होता. तो त्याचा नेम पशुपक्ष्यांवर नसून भिंतीवरील खुणांवर अगर झाडाला कांहीं तरी टांगून त्यावर रोखला जाई. लहर आल्यास तालमेत जाऊन मल्लांबरोबर कुस्त्याहि खेळत असे. पण हें नेहमीच नाहीं. मध्येंमध्यें केव्हां तरी लहरीप्रमाणें.

एकूण काय शरीर, मन व बुद्धि यांच्या विकासाला ज्या गोष्टी अनुकूल व उपकारक असत, त्या सर्व तो कसोशीनें व दक्षतेनें करीत असे, आणि यामुळें तो लहान वयांतच चांगला सुबुद्ध, सुदृढ व सुवृत्त बनून लोकादरास पात्र झाला.

---

# सिद्धार्थाचें अपूर्व कौशल्य

अट्ठकथा

कपिलवस्तूंत दरवर्षी खेळाचे सामने व विद्येच्या परीक्षा होत असत. हे सामने व परीक्षा मिळून सात दिवस चालत असत. त्यांत पहिले पांच दिवस शारीरिक व शस्त्रास्त्रांचे सामने होऊन, शेवटचे दिवस बौद्धिक व शास्त्रीय विषयांसाठीं राखून ठेविलेले असत. यांत शाक्य व कोळीय तरुण मोठ्या उत्साहानें व चुरशीनें भाग घेत. या सामन्यांचे दिवस आतां जवळ आले होते आणि या खेपेस त्यांत कोळीय राजपुत्र देवदत्त व शाक्य राजपुत्र सिद्धार्थ या दोघांनीं भाग घेण्याचें ठरविल्या-मुळें त्या सामन्यांस एक प्रकारचें अपूर्व महत्त्व प्राप्त झालें.

ही गोष्ट दंडपाणीला कळतांच ही संधि गोपेच्या स्वयंवराला योग्य व अनुकूल आहे असा मनांत विचार करून, त्यानें या सामन्यांत जो विजयी होईल त्याला आपल्या मुलीचें स्वयंवर करून देऊं, असें जाहीर केलें.

पुढें सामन्याचा दिवस उजाडला. लोक हळूहळू मैदानावर जमूं लागले. सामन्यांत भाग घेणाऱ्या तरुणांचा घोळकाही आस्ते आस्ते फुगत चालला. लोकांत जिकडे तिकडे अपूर्व उत्साहाची भर पडली. इतक्यांत आचार्य विश्वामित्र, आचार्य अर्जुन व राजा शुद्धोदन या तिघांच्या नजरेखालीं सामन्याच्या खेळांना शिंग फुंकून प्रारंभ करण्यांत आला.

पहिला सामना वेध मारण्याचा होता. रुप्याच्या तारेनें तीन चित्रें लोंबकळत ठेऊन त्यांच्यापुढें लोखंडी पत्रा ठेऊन तीं झांकण्यांत आलीं होतीं. फक्त ती तार तेवढीच दिसेल अशा बेतानें त्यांना बद-काच्या चोंचीएवढीं तीन भोंकें पाडलीं होतीं. त्यातून बाण मारून जो ती तार तोडून चित्रें खालीं पाडील, त्यानें तो सामना जिंकला असें

ठरविण्यांत आलें. जवळ जवळ द्रौपदी स्वयंवरांतील मत्स्यभेदासारखीच ही एक युक्ति होती. असो. प्रत्येकाला तीन बाण मारण्याची सवलत देण्यांत येऊन, चित्राची जागा व नेम मारण्याचें स्थान या दोहोंत चौसष्ट हातांचें अंतर राखण्यांत आलें होतें. या सामन्यांत एकंदर ४८० तरुणांनीं भाग घेतला होता. त्यांत फक्त दोघेच उत्तीर्ण झाले. एक सिद्धार्थ व दुसरा देवदत्त !

सिद्धार्थाची पाळी अखेर होती व त्याचे तीनही नेम अगदीं यशस्वी झाले ! प्रत्येक बाणानें अचूक अशी एकेक तार तोडली !! तिसरा नेम मारून तिसऱ्या बाहुलीचा वेध करतांच तेथील प्रेक्षक-वृंदानें टाळ्यांचा प्रचंड गजर करून, त्याचें हार्दिक अभिनंदन केलें ! यशोधरा हें पाहत आपल्या बापाच्या बाजूला उभी होती. अर्थात् सिद्धार्थाचें हें अपूर्व अस्त्रकौशल्य पाहून ती मनांत फार आनंदली व त्याची साक्ष म्हणून चेहऱ्यावर मधुर स्मित हास्य झळकलें !

दुसऱ्या दिवशीं कुस्त्यांचे सामने झाले. ते पाहावयास लोकांची प्रचंड गर्दी झाली होती. शेवटचा सामना देवदत्त व सिद्धार्थ यांच्यांत झाला. पण दोघेही मल्लविद्येंत अत्यंत प्रवीण असल्यामुळें, अखेरपर्यंत ते झुंजत राहिले. कोणीही पडला नाहीं व पडण्याचा रंगहि दिसला नाहीं. अर्थात् हा सामना शेवटीं अनिर्णित झाला.

तिसऱ्या दिवशीं दांडपट्ट्याचे सामने लागले. यांत सिद्धार्थानें भाग घेतला नाहीं. त्याला हे सामने रानटीपणाचे वाटले म्हणून तो अलिप्त राहिला. चौथ्या दिवशीं सात मैलांची घोड्याची शर्यत लागली. त्यांत सिद्धार्थानें भाग घेऊन आपल्या कंथक घोड्यावर बसून आपलें लोकोत्तर अश्वारोहणकौशल्य जगाला दाखविलें. यांत ८० लोकांनीं भाग घेतला होता. त्यांत सिद्धार्थ हा पहिला येऊन विजयी झाला ! व याबद्दल त्याला एक सोन्याची घोडेस्वाराची सुंदर प्रतिमा बक्षीस मिळाली !! व यशोधरेनें तें उल्हसित अंतःकरणानें व प्रेमपूर्ण दृष्टीनें पाहिलें !!

पांचव्या दिवशीं रथाची शर्यत जुंपली. यांत चौसष्ट रथींनीं भाग घेतला होता. यांतहि सिद्धार्थाचीच सरशी झाली. तो सर्वांत पुढें आला! हें पाहून प्रेक्षकांनीं टाळ्यांच्या कडकडाटांत सिद्धार्थाचा प्रचंड जयघोष केला!! या सामन्यांत त्याला एक सुवर्णाचा सुंदर रथ बक्षीस मिळाला!! वरील दोन्ही सामन्यांत देवदत्त मागें पडला हें निराळें सांगावयास नकोच.

याप्रमाणें पांच दिवस मैदानी व मर्दानी खेळांचे विविध सामने व खेळ झाल्यावर पुढें सहाव्या दिवशीं नगरमंदिरांत काव्य व गायन या विषयांत स्पर्धा सुरू झाली. यांत ९६ लोकांनीं भाग घेतला होता. त्यांतहि सिद्धार्थच उच्चांक मिळविता झाला. या काव्यगायन–प्रावीण्याबद्दल त्याला एक सोन्याची सरस्वतीची प्रतिमा नजर करण्यांत आली.

सातव्या दिवशीं म्हणजे शेवटच्या दिवशीं न्याय, गणित व नीति इत्यादि विषयांत परीक्षा घेण्यांत येऊन त्यांत सिद्धार्थ व देवदत्त हे दोघेजण शेवटपर्यंत टिकाव धरून राहिले. बाकीच्यांनीं मध्येंच माघार घेऊन मागचा रस्ता सुधारला. तर्कशास्त्रांत मात्र देवदत्तानें मात केली. पण अक्षर-वळणांत सिद्धार्थानें त्याचें उट्टें काढलें. देवदत्त येथें हरला. शेवटीं नीतिशास्त्रावर दोघांचीं भाषणें होऊन त्यांत सिद्धार्थानें अखेर मारली!!

याप्रमाणें सामन्यांचा शेवट होऊन त्यांत सिद्धार्थ हा सर्वविजयी ठरला!! विश्वमित्र आचार्यानें ही गोष्ट सभेला जाहीर करतांच जिकडे तिकडे सिद्धार्थाच्या नांवाचा प्रचंड जयघोष निनादला आणि टाळ्यांवर टाळ्या पडून त्यांच्या कडकडाटानें सर्व सभामंदीर दुमदुमून गेलें!! या जयजयकारांत व टाळ्यांच्या कडकडाटांत त्याला एक आचार्यांची सुवर्णप्रतिमा अर्पण करण्यांत आली!!

इतक्यांत चौघडे वाजूं लागले आणि गोपा (यशोधरा) सुंदर व उंची वस्त्रालंकारानें विभूषित होऊन हातांत पुष्पहार घेऊन सखीजनांसह

तेथें उपस्थित झाली ! तेथें जमलेल्या तरुण वृंदाकडे पाहत पाहत, हळू हळू पुढें पाऊल टाकीत टाकीत, येतां येतां देवदत्ताजवळ आली. तेथें थोडा वेळ थांबून त्याकडे एक नेत्रकटाक्ष टाकला. देवदत्ताचा चेहरा प्रफुल्ल झाला व शरीर हर्षरोमांचित झालें ! आपल्यालाच ती खास माळ घालून धन्य करणार, असा त्याचा समज झाला. लोकांचें लक्ष त्याकडे खिळलें. कांहींनीं टाळ्यासुद्धां वाजविल्या, तों इतक्यांत तिचा पाय पुढें सरकला व देवदत्तावरील दृष्टि उठून त्याच्या शेजारीं बसलेल्या सिद्धार्थाकडे वळली.

तिचें आणखी एक पाऊल पुढें सरकलें आणि त्याची व तिची मधुर दृष्टादृष्ट झाली ! दोन पावलें झपकन् पुढें टाकून ती सिद्धार्थासमोर येऊन उभी राहिली. आणि निमिषार्धांत त्याचा कंठ पुष्पमालेनें विभूषित झाला ! यशोधरा धन्य झाली ! ! आणि सिद्धार्थाला सुंदर स्त्रीरत्न लाभलें ! !

लोकांनीं तो मधुर संगम पाहून आनंदानें पुन्हा टाळ्यांचा गजर करून त्या नूतन जोडप्याचें हार्दिक स्वागत व अभिनंदन केलें ! राजा शुद्धोदनाच्या डोळ्यांचें पारणें फिटलें ! ! दंडपाणीची काळजी दूर झाली ! ! यशोधरेचें भाग्य उदयाला आलें ! ! आणि सिद्धार्थाचा जन्म सफल झाला ! !

गळ्यांत यशोधरेची माळ पडतांच सिद्धार्थ चटकन् उभा राहिला व आपल्या बोटांतील रत्नखचित आंगठी काढून, ती यशोधरेचा डावा हात धरून तिच्या बोटांत घातली, तोंच दोघांचे नेत्र एकमेकांना भिडले ! यशोधरा लाजून बाजूला सरकली व सिद्धार्थ तिच्याकडे पाहून हसला !!

त्या सामन्याचा असा हा स्वयंवरांत गोड शेवट होऊन तेथील प्रेक्षकवृन्दाला सिद्धार्थ व यशोधरा यांच्या मुधुर मीलनाचा गोड प्रसंग पाहण्याचें भाग्य लाधलें ! ! त्या वेळीं देवांचा स्वर्ग तेथें मूर्तिमंत उतरला होता असें सांगितलें तर ती अतिशयोक्ति होईल काय ?

सिद्धार्थ व यशोधरा यांचें अनुरूप जोडपें पाहून 'सामानयन् तुल्यगुणं वधूवरं चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः' या कविकुलश्रेष्ठ कालिदासोक्तीची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं.

---

## आरामोद्यानांत.

अट्ठकथा

उन्हाळ्याचे दिवस होते ते. एके दिवशीं पहाटेस उठून सिद्धार्थ व यशोधरा दोघें मिळून बाहेर फिरावयास निघालीं होतीं. कांहीं वेळ फिरून झाल्यावर शेवटीं तें जोडपें आरामोद्यानांतील सरोवराच्या कांठावर आलें.

सकाळची वेळ. सूर्य नुकताच वर उगवत होता. शीतल वायूच्या मंद लहरी मनाला सुखवीत होत्या. आकाशांत शुभ्र प्रकाश उजळला असून हिमराजाचीं उत्तुंग बर्फाच्छादित शिखरें बालरवीच्या आरक्त किरणांनीं प्रतिबिंबित होऊन सुवर्णराशीप्रमाणें चमकत होतीं. जिकडे तिकडे सृष्टीमध्यें नवचैतन्य संचारून ती उल्हसित दिसत होती ! !

अशा सुप्रसन्न समयीं त्या सरोवराच्या कांठावर आल्यावर यशोधरा तेथील संगमरवरी फर्शीवर थोडीशी आडवी झाली. अर्थात् सिद्धार्थहि तेथेंच तिच्याशेजारीं बसला. सरोवरांतील कमळें प्रफुल्ल फुललीं असून त्यांच्याशीं भ्रमरांचा मधुर विलास चालला होता. यशोधरेचें लक्ष त्या भ्रमरांकडे वेधलें, व सिद्धार्थ आकाशाकडे पाहूं लागला.

त्या वेळीं रानटी पारव्यांचा एक तांडा आकाशांतून उडत चालला होता. तिकडे त्याची नजर गेली. त्या पारव्यांकडे पाहत असतां त्यांपैकीं एक पारवा–काय झालें कोणास ठाऊक–एकदम धडपडत सिद्धार्थ बसला होता त्याच्या शेजारीं धपकन् येऊन पडला, व जमिनीवर फडफड पंख वाजवीत धडपडूं लागला !

सिद्धार्थाची नजर त्याच्याकडे वळली. तो जमिनीवर पडून धडपडूं लागला, पंख फडफडूं लागले, वर उडण्याचा प्रयत्न करी, पण त्याला उडतां येईना. हात दोन हात वर उडे, आणि पुन: धपकन् खालीं पडे. हा काय प्रकार आहे हें पाहण्यासाठीं सिद्धार्थ तेथून उठून हळूच त्या पाखराजवळ आला.

तेथें येऊन पाहतो तों त्या पाखराच्या शुभ्र शरीरांतून रक्त गळत असून एक बाण त्याच्या शरीरांत शिरून बसल्याचें त्याला दिसलें. त्या पाखराची ती प्राणांतिक वेदना व धडपड पाहून त्याचें कोमल अंतः-करण कळवळलें! चटकन् त्यानें त्या पाखराला हातांत उचलून घेतलें. अजून तो प्राणी जिवंत होता. पण फार घायाळ झाला होता. सिद्धार्थानें त्याच्या शरीरांतील रुतलेला बाण हळूच उपसून काढला, व त्याचें शरीर सरोवरांत नेऊन स्वच्छ धुऊन काढलें.

नंतर त्याला त्या फर्शीवर उन्हांत ठेविलें. शरीरांत बाण रुतला तर कसें होतें हें पाहवें म्हणून त्यानें त्या बाणाचें तीक्ष्ण टोंक हळूच आपल्या बोटांत टोंचून घेतलें. अर्थात् त्याला त्यापासून तीव्र वेदना झाल्या. त्या गरीब पाखराच्या कोमल शरीरांतील जखम पाहून त्याला फार दुःख झालें.

यशोधरा उठून त्या पाखराच्या पाठीवरून आपला मृदु हात कुरवाळीत त्याकडे करुणारव मुद्रेनें पाहूं लागली व सिद्धार्थ आपल्या ओंजळीत पाणी धरून त्याला तें पाजण्याचा प्रयत्न करूं लागला. तों इतक्यांत देवदत्त तेथें आला आणि म्हणालाः-तो पक्षी माझ्याकडे दे. सिद्धार्थ म्हणाला—कां?

**देवदत्तः**—तो माझा आहे.

**सिद्धार्थः**—कसा?

**देवदत्तः**—माझ्या बाणानें तो खालीं पडला म्हणून.

**सिद्धार्थः—नाहीं, देवदत्ता, तो तुझा नाहीं.**

**देवदत्तः**—तर मग कोणाचा ?

**सिद्धार्थः**—तो माझा.

**देवदत्तः**—तो तुझा कसा ? शिकारीचे नियम तुला ठाऊक नाहींत काय ?

**सिद्धार्थः**—ती गोष्ट तूं बोलूं नकोस. तुझ्या बाणानें तो मरून पडता तर तो तुझा झाला असता. पण हा मेला नाहीं. जिवंत आहे. मीं त्याला वांचविला आहे. सबब तो माझाच झाला ! तुला मिळणार नाहीं ! !

**देवदत्तः**—सिद्धार्था ! तूं फक्त सुखविलासांत व स्त्रीसहवासांत राहून स्त्रैण झाला आहेस ! तुझें मन बायकी झालें आहे. क्षत्रियाची मृगया म्हणजे काय, त्याच्या रीतिभाती काय हें तूं क्षत्रिय असूनहि जाणत नाहींस ही मोठ्या शरमेची गोष्ट होय ! जो जातिवंत क्षत्रिय असतो, तो आपण केलेली शिकार दुसऱ्याला कदापि देणार नाहीं. तो त्याचा अपमान आहे ! त्याच्या स्वाभिमानाला कलंक आहे तो ! लक्षांत घे. तो आपला प्राण देईल, पण शिकार सोडणार नाहीं !!

**सिद्धार्थः**— तुला इतकं बोलायचं कारण काय ? येऊन जाऊन तूं त्याला अखेर मारून खाणारच कीं नाहीं ? मी म्हणतों तुझ्या घरीं कोंबडीं, हरीण वगैरे काय थोडे आहेत ? मग हा गरीब प्राणीच तुला कशाला हवा ? जा, मी नाहीं देत !

**देवदत्तः**— नेहमीं बायकांच्या सहवासांत राहून तुझं मन बायकीच झालं आहे. यशोधरेच्या संगतींत रंगून स्वारी चांगली भागुबाई बनली आहे कीं !

हें भाषण ऐकून यशोधरा जरा मनांत लाजल्यासारखी झाली व तिचा चेहरा गोरामोरा झाला.

' बरं, तूं बऱ्या बोलानं नाहीं देत ? ' देवदत्त म्हणाला, ' तर मग हा प्रश्न मी पंचायतींत ठेऊन याचा निर्णय लावून घेईन.'

असें म्हणून तो तेथून तावातावानें निघून गेला.

पुढें देवदत्तानें हा प्रश्न पंचायतीत ठेवला. पंचांनी दोघांचें म्हणणें नीट ऐकून घेतलें व शेवटीं निकाल दिला कीं सिद्धार्थाचें म्हणणेंच बरोबर आहे!

तेव्हांपासून देवदत्ताचा दांत सिद्धार्थावर बसला. मागें सामन्यांत पराभव पावला तेव्हांच त्याला सिद्धार्थाचा हेवा वाटत असे. तशांत यशोधराहि आपली निराशा करून सिद्धार्थाला जाऊन मिळाली आणि आतां हा तिसरा मार! मग त्यानें सिद्धार्थावर दांत धरूं नये तर काय करावें? मत्सरी लोकांचें ब्रीदच हें!

---

## नगरनिरीक्षण

दीघनिकाय सुत्त १४ व जातक

शुद्धोदन राजानें युवराज सिद्धार्थाच्या विविध भोग-विलासार्थ प्रमोद भुवनांत सर्व सुखसाधनांची जय्यत तयारी ठेविली होती. कशाला म्हणून कांहींही कमी नव्हतें. एकापेक्षां एक सुंदर महावस्त्रें, विविध अलंकार, नानातऱ्हेचीं खाद्यपेयें, अनेक क्रीडास्थळें, सुंदर सुंदर बागबगीचे, हरीण, सारंग, मोर, पोपट इत्यादि मनोहर पशुपक्षी, रमणीय कारंजे व जलाशयें, मधुर गीतवाद्यें, असे एक का दोन, असंख्य सुखसाधनांनीं व विलासोपकरणांनीं तें प्रमोद-भुवन आंतून व बाहेरून सुसज्ज व समृद्ध करून ठेविलें होतें. कोठेंहि कशाची सुद्धां वाण म्हणून भासत नव्हती. जवळ जवळ इंद्रभुवनच होता तो प्रमोद-प्रासाद!

तशांत रूपयौवनशालिनी यशोधरा–सिद्धार्थाची सहधर्मचारिणी –हास्यमुग्ध प्रेमरमणी–होतीच त्याच्या सेवेला हजर. एकटी यशोधराच काय, तिच्या जोडीला नृत्य व गीत कलेंत अत्यंत प्रवीण असलेल्या

विविध ललित कलाकुशल रूपलावण्यसंपन्न दिव्यांगनांचाहि फार मोठा परिवार ! मग आतां पंचविशीच्या जवान तरुणाला आणखी काय पाहिजे ? 'खा, पी, चैन कर,' यापेक्षां त्या वयांत पुरुषाला अधिक सुचण्यासारखें असें आणखी काय असतें ? खरोखर, असा पुरुष महाभाग्यशालीच होय ! सिद्धार्थाची गणना त्यांतच करावी लागेल. पण...

नियमाला अपवाद असतो, नाहीं का ? आतां खरें सांगावयाचें म्हणजे त्याला नियमांत घालण्यापेक्षां अपवादांत ओढणें हेंच अधिक वस्तुस्थितीला धरून होईल. शुद्धोदनानें त्याला सर्व प्रकारच्या सुखोपभोगांत घालून घोळून मुरत ठेवण्याचा भगीरथ प्रयत्न केला होता, हें खरें. पण गोतमाच्या–म्हणजे सिद्धार्थाच्या–नशिबीं तें सुख लिहिलें नव्हतें, याला कोण काय करणार ?

विषयसंगतींत त्याचें मन रमत नव्हतें, हीच तर पंचाइत. एकांतवास त्याला अधिक आवडे. दूर एकटाच झाडाखालीं, अगर तलावाच्या कांठावर जाऊन बसून एकांतांत गंभीर विचार करणें यांत त्याला स्वर्ग दिसत होता. कुलानें राजपुत्र होता तरी ब्राह्मणाची त्याग व वैराग्य वृत्तिच त्याला विशेष प्रिय व पसंत होती.

अधून मधून तो केव्हा केव्हा यशोधरेच्या सहवासांत करमणुकीचा मार्ग काढी. तिच्याशीं केव्हा केव्हा थट्टामस्करी, हास्यविनोद, खेळचाळे करी. तिला बरोबर घेऊन बागेंत हिंडे फिरे व लतामंदिरांत बसून गप्पागोष्टी करी; या सर्व गोष्टी खऱ्या. पण हें सर्व अपवाद म्हणून. नित्य नियम म्हणून नव्हे.

विवाह झाल्यापासून सिद्धार्थ हा बहुतेक प्रमोद भुवनांतच राहत असे. बाहेर फारसा हिंडत फिरत नसे. गेलाच तर केव्हां तरी राजवाड्यांत. यापलीकडे त्याला जग म्हणजे असें फारसें माहीत नव्हतें. त्याचा सोबती म्हणजे एक सारथी छन्न व मित्र म्हणजे

घोडा ‘ कंथक ’ ! झालें. यापलीकडे त्याला जग जवळ जवळ नव्हतेंच, म्हटलें तरी चालेल.

शुद्धोदनालाहि हेंच हवें होतें. गोतमाला जगाची ओळख करून देणें म्हणजे त्याच्या सहवासाला मुकणें असाच त्यानें अर्थ लाविला होता. आणि तो जवळ जवळ बरोबर होता.

काय झालें कोण जाणें, गोतमाला–हें सिद्धार्थाचें दुसरें नांव–नगर-निरीक्षण करण्याची एकदम लहर आली. तेव्हां त्यानें शुद्धोदनाजवळ जाऊन आपला मनोदय कळविला व शुद्धोदनानें त्याला मोठ्या आनंदानें रुकार दिला.

त्याला वाटलें कीं गोतमाला आतां राजकारणाची आवड उत्पन्न झाली. कारण नेहमीं एकांतांत राहून गंभीर विचार करण्यांत मग्न असलेला सिद्धार्थ आज नगरनिरीक्षणाची इच्छा दर्शवीत आहे. या-वरून त्याच्या मनांत पालट होऊन तो निवळणीला लागला आहे असा त्याचा ग्रह झाला. आणि निराशेनें बेचैन झालेल्या त्याच्या मनाला किंचित् हायसें वाटलें.

सिद्धार्थ बापाची सम्मति घेऊन निघून गेल्यावर राजानें ताबडतोब नगरदूतांना बोलावून घेऊन, त्यांना मुलाची हकीकत कळवून सर्व नगर झाडून लोटून, शिंपडून सारवून, सजवून श्रृंगारून अत्यंत प्रेक्षणीय करण्याबद्दल हुकुम दिला.

प्रत्यक्ष राजाज्ञाच ती ! मग काय विचारतां ? रात्रंदिवस शहर-सफाईचें व शृंगारण्याचें काम धूमधडाक्यानें चालू झालें. नागरिकांना आपापलीं घरें सारवून, रंगवून सुशोभित करण्याचे हुकूम सुटले. रस्त्यावर म्हातारेकोतारे, दरिद्री-भिकारी, आंधळे-पांगळे, रोगी-कुष्ठी, बुवा-बैरागी इत्यादि लोकांना फिरण्याची सक्त मनाई करण्यांत आली. पौरजनांना सुंदर वस्त्राभरणांनी भूषित होऊन शहरांत फिरण्याची

आग्रहाची सूचना देण्यांत आली. याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर राजानें सिद्धार्थाला नगराची पाहणी करण्यास निरोप पाठविला.

एकंदर चार दिवसांचा नगर-निरीक्षणाचा कार्यक्रम ठरविण्यांत आला. एकेका दिवशीं एकेका भागाची पाहणी करण्याची व्यवस्था झाली. जाण्याचा दिवस मुकरर ठरला. त्या दिवशीं कपिलवस्तूला अपूर्व सौंदर्य प्राप्त झालें होतें. रस्ते व बाजूचीं दुतर्फा घरें झाडून-पुसून, रंगूनसारवून, तोरण-पताकादिकांनीं शोभिवंत करण्यांत नगरदूतांनीं व पौरजनांनीं शिकस्त केली होती.

ठरलेल्या वेळीं सिद्धार्थ हा उत्तम शृंगारलेल्या चार घोड्यांच्या रत्न-खचित सुवर्णरथांत बसून शहरनिरीक्षणार्थ प्रमोद भुवनांतून मोठ्या थाटानें बाहेर पडला. पौरजन युवराजाला पाहण्यास म्हणून रस्त्यावर, माडीवर, गच्चीवर, जेथें जागा सांपडेल तेथें वस्त्रालंकारभूषित होऊन थव्याथव्यानें उभे व बसले होते.

गांवांत आल्यावर रथ हळूहळू रस्त्यावरून चालूं लागला. दुतर्फा जमलेल्या लोकांनी त्याला पाहून टाळ्यांचा गजर व त्याच्या नांवाचा जयघोष करून त्याचें प्रेमादरपूर्वक सुस्वागत केलें. माडीवर व गच्चीवर बसलेल्या स्त्रीवर्गानें त्याच्यावर पुष्पवृष्टि केली !

याप्रमाणें रथ हळू हळू रस्त्यावरून चालला असतां सिद्धार्थाची दृष्टि अकस्मात एका माणसाकडे गेली. म्हातारा होता तो. अगदीं जख्खड म्हातारा. जवळ जवळ नव्वद वर्षांचा थकलेला म्हातारा ! हातांत काठी होती. कम्मर वांकली होती. मान हलत होती. पाय लटपटत होते. डोळ्याला दिसत नव्हतें. कान बुजले होते. दांत पडले होते. केंस पिकले होते. कातडें लोंबकळत होतें. तोंडांतून लाळ गळत होती. शरीरावर सुरकुत्या पडून तें थरथर कांपत होतें !

या विचित्र प्राण्याला पाहतांच त्यानें सारथीस रथ तेथेंच अम्मळ उभा करण्यास सांगितलें व क्षणभर त्या म्हाताऱ्यावर दृष्टि रोखून

त्याच्या सर्वांगाचें लक्षपूर्वक निरीक्षण केलें. झालें ! त्याच्या मनांत एकदम क्रांति झाली ! रथ पुनः हळूहळू चालू झाला.

पुढें कांहीं अंतर गेल्यावर तो सारथीस म्हणाला, सारथे ! तो मनुष्य कोण ? त्याचें डोकें सगळें पिठाप्रमाणें पांढरें शुभ्र झालें आहे. कमर वांकली आहे. मान हलती आहे. पाय लटपटत आहेत. त्याला धड पाऊल सुद्धां ठेवितां येत नाहीं ! काय बिचाऱ्याची अवस्था ही ! !

**सारथी** :—युवराज ! म्हातारा झाला आहे तो. म्हातारपणीं तशी अवस्था होतेच माणसाची.

**सिद्धार्थ** :—म्हणजे ?

**सारथी** :—मनुष्याच्या वयांत उतार पडत गेला म्हणजे कोणाची झाली तरी तशी स्थिति होतेच.

**सिद्धार्थ** :—म्हातारा झालों म्हणजे मीहि तसाच होईन. खरं ना ?

**सारथी** :—हो. आपणही व्हाल. कोणीही होईल.

**सिद्धार्थ** :—शिव शिव ! काय कठीण अवस्था ही !

**सारथी** :—होय. प्रत्येकाला वृद्धपण हें सुटलेलें नाहीं. हाच म्हातारा मागें एकदा बाल होता, मग तो युवक झाला. नंतर आपल्या-प्रमाणेंच तरुण बनला. आतां तो विलासी तरुणच म्हातारा—जख्खड म्हातारा—झाला आहे !

**सिद्धार्थ** :—अरेरे ! केवढें दुःखदायक हें म्हातारपण ! छन्ना ! मीही पुढें म्हातारा झालों म्हणजे माझीहि तीच गत होईल, खरं ना ?

**सारथी** :—होय, युवराज ! आपलीहि तशीच अवस्था होईल !

**सिद्धार्थ**:—देवा ! देवा ! नको रे हें म्हातारपण ! केवढें हें दुःख ! काय ही दुर्दशा ! केवढे कष्ट नि कोण हाल ! सारथे, आतां पुढें जाणें नको. फिरव रथ मागें. मला चैन नाहीं. लवकर घरीं नेऊन

सोड. मनुष्याला मागेंपुढें केव्हां तरी जरा येऊन पछाडणार हें निश्चित असतां तो सुखी अगर आनंदी कसा राहणार? छे, ही गोष्ट शक्यंच नाहीं!! छन्ना! फिरव माझा रथ मागें आणि सोड मला घरीं नेऊन एकदां.

आज्ञेप्रमाणें सारथीनें रथ परत फिरवून युवराजाला प्रमोद-भुवनांत आणून सोडलें. अशा रीतीनें पहिल्या दिवसाचा कार्यक्रम समाप्त झाला.

दुसऱ्या दिवशीं पुनः तो रथांत बसून नगरशोभा पाहावयास निघाला. अर्थात् आजची दुसरी बाजू होती. त्या भागातून जातां जातां मध्येंच त्याला एक आजारी रोगी रस्त्यावर कण्हत पडलेला दिसला. त्याला पाहून सिद्धार्थाचें मन कळवळलें. थोडेंसें पुढें गेल्यावर तो सारथीला म्हणाला, छन्ना! तो मनुष्य तेथें तसा कां पडून आहे?

**सारथी** :—तो आजारी आहे.

**सिद्धार्थ** :—काय झालंय?

**सारथी** :—त्याचें प्रकृतिस्वास्थ्य बिघडलें आहे. त्याच्या शरीरांतील धातु क्षीण झाल्या आहेत. अर्थात् तो आजारी व रोगग्रस्त आहे. रोगग्रस्त माणसाची अशीच दशा होत असते. तो गरीब असो, श्रीमान असो, लहान असो, मोठा असो, मूर्ख असो वा पंडित असो, असा कोणी जरी असला तरी त्याचें स्वास्थ्य बिघडलें म्हणजे त्याची अशी दैन्यावस्था व्हावयाचीच!

**सिद्धार्थ** :—मलाहि अशी बाधा मागंपुढं केव्हां तरी होईल का?

**सारथी** :—हो, हो. कां नाहीं होणार? ज्याला ज्याला शरीर म्हणून आहे, त्याला त्याला ही रोगबाधा सुटलेली नाहीं!

**सिद्धार्थ** :—छन्ना! केवढें रे हें दुःख! तो मनुष्य कसा कण्हत होता हें तूं पाहिलेंस ना? काय त्याचें कुंथणें नि काय त्याचें विव्हळणें! देवा! देवा! नको तें पाहणें! हा संसार खरोखर

किती दुःखमय व क्लेशमय आहे बरें !! असें असून सुद्धां, लोक–हे मूढ जन–त्यांतच आनंद मानून हंसत रमत आयुष्य काढतात ! काय म्हणावें या त्यांच्या मूर्खपणाला !! असो. आतां असं कर. आजचा हा कार्यक्रम येवढ्यावरच आटप. मला पुढें जावेंसें वाटत नाहीं. फिरव, बाबा, रथ माझा मागें.

त्या दिवसाचा कार्यक्रमहि पुरा न होतां अर्ध्यावरच विराम पावला. सारथीनें रथ मागें वळविला व हां हां म्हणतां तो प्रमोद–भुवनाच्या दारापाशीं येऊन थडकला. सिद्धार्थाची मुद्रा सचिंत दिसत होती. तो कसल्या तरी गंभीर विचारांत गढला होता. रथ दारापाशीं येऊन उभा राहिला तरी त्याला त्याचें भानहि नव्हतें. सारथीनें त्याला खालीं उतरण्यास एकदोन वेळां सूचना केली, तेव्हां कोठें त्यानें शुद्धीवर येऊन रथांतून उतरून, खिन्न अंतःकरणानें मंदिरांत प्रवेश केला.

तिसरा दिवस उजाडला. त्या दिवशीं ठरल्याप्रमाणें कार्यक्रमास सुरुवात झाली. आजचा शहरचा तिसरा भाग होता तो. रस्त्यावरून जातां जातां शेवटीं त्याला चार माणसें खांद्यावरून कांहीं तरी वाहून नेत असल्याचें दिसलें. त्यानें तें डोळ्यानें नीट निरखून पाहिलें. थोडेंसें पुढें गेल्यावर तो सारथीला म्हणाला, छन्ना ! काय रे तें ? तीं माणसें खांद्यावरून वाहून नेतात, तें प्रेत नव्हे का ?

**सारथीः**—होय, युवराज ! कोणी तरी मेलें आहे. जाळण्यासाठीं लोक त्याला खांद्यावरून स्मशानाकडे नेत आहेत.

**सिद्धार्थः**—छन्ना, हें मरण सर्वांनाच आहे, नव्हे ?

**सारथीः**—हें काय विचारायचें, युवराज ! हें मरण कोणालाहि चुकलेलें नाहीं. जो जन्मला तो केव्हां तरी मरणारच !

**सिद्धार्थः**—मलासुद्धां मागंपुढं केव्हां तरी तें येणारच !

**सारथीः**—सर्वांना तें लागू आहे. मृत्यूच्या पाशांतून कोणीहि सुटला नाहीं ! व पुढें सुटणार नाहीं !

**सिद्धार्थः**—मग माझीहि तीच अवस्था होणार ! असेंच ना ?

**सारथीः**—तो सृष्टीचा नियमच आहे. त्याला अपवाद कोठून असणार ? जसा जन्म तसें मरण !

**सिद्धार्थः**—खरें, छन्ना ! तूं म्हणतोस तें खरें. अरे मर्त्य मानवा ! केवढा तुझा हा मिथ्या संसार ! काय हंसतोस ! काय उड्या मारतोस ! पण हें सर्व बेट्या, तुझें अगदीं व्यर्थ आहे ! कोणाचें घर ! कोणाची बायको ! कोणाचा पुत्र ! कोणाचे आप्त ! कोणाचे मित्र ! कोणाचे कोण ! हें शरीरसुद्धां इथलें इथेंच पडतें ! मग बाकीचे तरी कोणाचे कोण ! ! इतकें असूनहि हा मूढ प्राणी—प्रेमवेडा मूर्ख जीव—शुद्धीवर येत नाहीं हें केवढें आश्चर्य ! ! 'मी—मी, माझें माझें' हा महामंत्र त्याचा सारखा सुरूच असतो. केवढा संसारमोह हा ! छन्ना ! पुरे झालें हें फिरणें. वळीव माझा रथ मागें.

सारथीनें त्याप्रमाणें केलें व सिद्धार्थ पुनः आपल्या प्रासादांत शिरला. आतां त्याचें मन अगदींच अस्वस्थ व खिन्न झालें होतें. मनुष्याला वृद्धपण येतें, त्याचें प्रकृतिस्वास्थ्य बिघडतें, तो आजारी पडतो, रोगी बनतो, दुःखकष्ट भोगतो, आणि अखेर मरून जातो ! या विचाराची छाप त्याच्या कोमल व सात्विक मनावर आतां पक्की उमटून बसली. जरा दुःखकारक आहे, मरण हेंही दुःखकारक, रोग, ताप, पीडा ही ही दुःखकारकच. मग मनुष्याला सुख मानण्यासारखें संसारांत असें काय आहे ? मग अशा दुःखमय संसारांत मनुष्यानें काय म्हणून पडावें ? त्यांत आनंद मानणारा मनुष्य खरोखर मूर्खच म्हटला पाहिजे ! मला तर त्यांत कांहीं तथ्य दिसत नाहीं. जरा-मरण कसें चुकेल, चुकवितां येईल हा मार्ग मनुष्याला सांपडल्यास काय बरें सोनें होईल ! पण तो सांपडणार कसा ? घरांत राहून तो सांपडण्याची आशा नाहीं.

आणि मला तर तो शोधून काढला पाहिजे. त्याशिवाय मला शांति लाभावयाची नाहीं. चैन पडावयाची नाहीं. समाधान व्हावयाचें नाहीं! मग मी आतां काय करावें? कोठें जावें? अशा विचारानें त्याचें मन त्या रात्रीं गोंधळून व भणागून गेलें! सबंध रात्र त्याला झोंप नाहीं कीं चैन नाहीं. सारखी तळमळ तळमळ लागून राहिली.

इतक्यांत चौथा दिवस उजाडला. सकाळीं नित्याप्रमाणें उठून शौच-मुखमार्जनादि करून तो बागेंत फिरावयास गेला. पहांटेची वेळ, गार वारा, गोड सुवास, अरुणकांति, नवचैतन्य, मंजुळ किलकिलाट, एकूण सर्वत्र प्रसन्न वातावरण! यामुळें त्याच्या मनाला थोडासा आराम वाटून तें प्रसन्न बनलें. बावरलेली बुद्धि ताळ्यावर आली. खळबळणारें अंतःकरण सुशांत झालें. एकंदरींत सांगावयाचें तात्पर्य म्हणजे पुनः त्यास हुशारी येऊन तो पूर्वीप्रमाणें शांत व स्वस्थचित्त बनला.

नंतर तो घरीं परतला. दारांत रथ जोडून तयार होताच. तेथें आल्यावर रथाजवळ जाऊन चटकन् वर चढून बसला व छन्नानें घोडयांचा लगाम ओढतांच रथ चालू झाला व इष्ट मार्गाला लागला.

नगरांत प्रवेश केल्यावर त्याची गति मंद झाली व सावकाश तो चालूं लागला. त्या भागाची चांगली पाहणी झाली. तेथून तो पुढें राजोद्यानाकडे जात असतां रस्त्यावर एका बाजूला जांभुळाच्या झाडा-खालीं त्याला एक विचित्र माणूस दिसलें. त्याच्याकडे बोट करून तो छन्नाला म्हणाला, 'छन्ना! तें तेथें जंबुवृक्षाखालीं उभें असलेलें माणूस कोण रे? त्याचा असा विलक्षण पेहराव कां आहे? त्यानें डोकें मुंड-लेलें दिसतें. असें कां?

**सारथी**:—युवराज, तो प्रव्राजक आहे.

**सिद्धार्थ**:—म्हणजे?

**सारथी**:—तो संसारनिवृत्त झाला आहे, तो पुढें गेलेला आहे. अर्थात् तो प्रव्राजक आहे.

**सिद्धार्थः**—पुढें जाणें म्हणजे काय रे ?

**सारथीः**—पुढें जाणें म्हणजे सर्वसंग परित्याग करून पुण्याचरण करीत शांतरीतीनें धर्मचिंतनांत आयुष्य कंठणें. कोणाची हिंसा न करतां सर्वत्र व सर्व प्राण्यांवर प्रेमदयाबुद्धि ठेऊन सर्वभूतहित करीत सन्मार्गानें जीवन कंठणें. याला प्रव्रज्या म्हणतात.

**सिद्धार्थः**—फार छान ! फार छान गोष्ट बघ ही ! प्रव्रज्या ही फार उत्तम गोष्ट आहे ! प्रव्राजक हा खरोखर अत्यंत पुण्यवान प्राणी खरा ! जरा माझा रथ तिकडे हाक पाहूं. त्याचें दर्शन घेऊं दे मला.

सारथीनें रथ त्या प्रव्राजकाजवळ नेऊन उभा केला. सिद्धार्थानें त्याला विचारलें, हे महाभागा ! तुझें डोकें आमच्यासारखें कां नाहीं ? तुझा पोषाख इतराप्रमाणें कां नाहीं ? डोकें मुंडलें आहेस व भगव्रीं वस्त्रें धारण केलीं आहेस, याचें कारण काय ?

प्रव्राजक उत्तरला–युवराज ! मी सन्यासी आहें. प्रव्राजक आहें.

**सिद्धार्थः**—म्हणजे काय ?

**प्रव्राजकः**—मी घरदार, बायकापोरें, शेतीवाडी सर्व सोडून देऊन धर्मचिंतनांत, भूतहित साधण्यांत, जन्म, जरा, मरणादि दुःखाचा परिहार करून शाश्वत शांतिसुखाचा मार्ग शोधण्यांत काळ कंठीत आहें. मी सन्यासी आहें आणि हें माझें ध्येय आहे !

**सिद्धार्थः**—महाराज, मी आपणास असें विचारतों कीं प्रपंचांत राहून मनुष्याला चिरशांति लाभेल काय ? मला तर संसारांत खरा आनंद दिसत नाहीं. आणि या विषयसुखाला तर मी फार कंटाळलों आहें ! विटलों आहें ! वैतागलों आहें ! मला येथें चैन नाहीं. जीव बेजारला आहे व तो मला आतां जड झाला आहे ! ! यांतून मुक्त व्हावें म्हणतो. त्याला मार्ग आहे काय ?

**प्रव्राजकः**—युवराजा, आहे. पण तो तुला अवघड वाटेल.

आणि वर अज्ञानांधकाराचा नाश करणाऱ्या व अमृतत्त्व प्राप्त करून देऊन शाश्वत आनंदाचा दिव्य मार्ग दाखविणाऱ्या तेजस्वी ज्ञानसूर्यावर बोटें मोडावयाचीं, हा कोठला न्याय? प्रापंचिक सुखाला सोकावलेल्या मूढ मनुष्याची ही तऱ्हा अत्यंत विलक्षण व गर्हणीय नव्हे काय?

सिद्धार्थानें त्या प्रव्राजकाचें हें सर्व सुंदर भाषण मन लाऊन ऐकलें व त्याच्या अंतरंगांत नवचैतन्य तेजाळलें!

---

## पुत्र-दर्शन

जातक-अट्ठकथा, (निदान)

त्या विरक्त साधूचें सुंदर भाषण श्रवण करून गोतमाचें अंतःकरण आनंदानें उचंबळू लागलें. तसा आनंद त्याला साऱ्या जन्मांत कधीं झाला नव्हता. त्याला ज्या गोष्टीचा ध्यास लागला होता, तीच गोष्ट-नेमकी तीच गोष्ट-त्या साधूनें त्याला स्पष्ट व सुटसुटीत शब्दांत चांगली बिंबवून सांगितली होती. पुढें तो साधु तेथून निघून गेल्यावर गोतमानें आपला रथ प्रमोदभुवनाकडे न नेतां राजोद्यानाकडे हांकण्यास सांगितलें व सारथीनें त्याप्रमाणें करून तो रथ राजोद्यानांत आणून सोडला.

गोतम रथांतून खाली उतरला व उद्यानांत जाऊन बागेंत शिरला. तेथें कांहीं वेळ आपल्याशींच कांहीं विचार करीत इकडे तिकडे थोडें हिंडल्यावर तेथील संगमरवरी दगडाच्या सुंदर पुष्करणी वर येऊन तेथें त्यानें गार पाण्यानें स्नान केलें व वर येऊन अंग पुसून घेऊन कपडे करीत असतां राजवाड्यांतून वर्दी आली कीं यशोधरेला पुत्र झाला!!

अर्थातच या सुवार्तेनें त्याला मोठा आनंद झाला. पण तो फार वेळ टिकला नाहीं. त्याला एकापरीनें समाधान वाटलें हें खरें; पण तें पुत्र-दर्शन म्हणजे संसारत्याग संकल्परूपी चंद्राला ग्रासणारा तो एक राहुच जन्मला असें त्याला वाटलें. असो. नंतर तो रथांत बसून राजवाड्याकडे निघाला. राजमार्गावरून जात असतां कृष्णा गौतमी नांवाची एक सुंदर तरुणी आपल्या महालाच्या कोठयावर बसली होती, तिनें त्याला रथातून जातांना पाहिलें.

त्याला पाहून ती मनांत फार हर्षली व तोंडांतून आनंदोद्गार निघाले कीं अहाहा ! धन्य तो पिता ! धन्य ती माता कीं जिनें अशा सुंदर नररत्नाला जन्म दिला ! आणि धन्य धन्य ती रमणी कीं जिला असला मदनासारखा प्राणवल्लभ लाभला ! !

जातां जातां हे तिचे उद्गार गोतमाच्या कानावर पडले, त्यानें लगेच आपला रथ तेथें उभा केला व हंसून तिला म्हटलें, "हे सुंदरी, धन्य आहे तो कीं ज्याचा रागद्वेष शांत झाला आहे ! धन्य आहे तो कीं ज्यानें दोष, मोह व अहंकार यांवर जय मिळविला आहे ! धन्य आहे तो कीं जो या जन्मांतच निर्वाण प्राप्त करून घेईल ! भद्रे ! तुझें भाषण मीं ऐकिलें. पण मी आतां प्रपंचत्याग करून निर्वाणपथाचा लवकरच पाइक होऊं पाहत आहें !

असें म्हणून आपल्या गळ्यांतील सुंदर रत्नहार काढून त्यानें तिला तो मोठ्या आदरानें बहाल केला. कृष्णेनें मंदस्मित करून हात पुढें करून तो घेतला व त्याचें औदार्य पाहून ती मनांत अत्यंत हर्षनिर्भर झाली.

नंतर पुढें रथ चालू झाला. राजवाड्यांत जाऊन, त्यानें पुत्रदर्शन घेतलें. अर्थात् पुत्रमुख पाहतांच त्याचा आत्मा आनंदला व मन प्रसन्न झालें हें निराळें सांगावयास नकोच.

---

# पिताजी ! मी संसार-निवृत्त होतों.

अश्वघोष ५-२५ ते ३८

राजवाड्यांत आज केवढा उत्सव ! तो सुंदर राजवाडा आज आनंदोत्सवानें खुलून गेला होता. कर्दलीस्तंभ, तोरण, पताका इत्यादि मंगल चिन्हालंकारांनीं त्याला अपूर्व शोभा आली होती. चौघड्याच्या व सनईच्या मधुर नादानें व आलापानें सर्व वातावरण मोहरून गेलें होतें. वस्त्रालंकारविभूषित नवयुवतींची एकच गर्दी उसळली होती! युवराज सिद्धार्थाच्या नूतनबालकाचा पुत्रोत्सव होता तो! आज पांचवा दिवस! राजा शुद्धोदनाला पौत्रदर्शन व सिद्धार्थाला पुत्रलाभ !! केवढा भाग्याचा दिवस तो! भारतीयांच्या जीवनांतील तो एक अत्यंत महत्त्वाचा व आनंदाचा महादिवस !! मग तेथें प्रत्यक्ष स्वर्गच खालीं उतरत असला तर नवल काय? खरोखर मानवी जीवनांतील एक धन्य दिवस तो!

शाक्य लोकांत पांचव्या दिवशीं नामकरण करण्याचा परिपाठ असे. त्या रूढीला धरून आज बालकाच्या नामकरणविधीचा महोत्सव! मग तेथील आनंद, हर्ष, संभ्रम, उल्हास यांचें वर्णन काय व किती करावें! आणि करून तें कळणार नि संपणार कसें? छे, त्या भरीस न पडणें हेंच अधिक शहाणपणाचें !!

तेथील शृंगार, सौंदर्य व आनंद नि उत्साह यांच्या तपशिलांत न पडतां फक्त एवढेंच सांगतों कीं त्या राजवाड्यांत आज प्रत्यक्ष इंद्राचा स्वर्ग उतरला होता व दिव्यांगनांची एकच गर्दी उसळली होती! हास्य, आनंद, नि उल्हास यांनीं तेथील मधुर वातावरण अत्यंत बहरून गेलें होतें! असो. बालाचें नांव राहुल असें ठेवण्यांत येऊन तो मंगलविधि मोठ्या थाटानें उरकण्यांत आला.

राजवाड्यांत याप्रमाणें आनंद सोहाळा चालला होता, तरी

गोतमाची मनःस्थिति कांहीं निराळ्या प्रकारची होती. त्या साधूचें तें भाषण ऐकिल्यापासून त्याच्या मनांत नवीन प्रकाश उजळून तेथें विचाराची मोठी खळबळ उडून राहिली होती. त्याचें मन आतां संसारांतून पूर्ण उठलें होतें. तें राजवैभव व ते सुखोपभोग यांचा त्याला पूर्ण वीट आला होता. अनेक सुखविलास व कामिनीलीला हीं त्याला नकोशीं झालीं होतीं. वाड्यांत पुत्रजन्मोत्सव मोठ्या उत्साहानें व धूमधडाक्यानें चालला होता. पण हें सगळें त्याच्या सुखानंदास कारण न होतां उलट खेद व औदासीन्य यांसच पोषक व उपकारक ठरलें. त्याची शांति ढळली व उमेद मावळली. ना चैन ना उत्साह ! गंभीर एकांत व गहन विचार ! त्या दिवशीं रात्रीं तर त्याचा मुळींच डोळा लागला नाहीं. अखेर त्याच्या मनाचा कसला तरी निश्चय ठरला.

सहावा दिवस उजाडला. नित्याप्रमाणें मुखमार्जनादि प्रातर्विधि आटपून छन्नास हाक मारून त्यास रथ जोडावयास सांगून तो बागेंत फिरावयास गेला. घटकाभर इकडे तिकडे फिरून पुनः परत प्रमोद-भुवनाकडे आला. रथ जोडून तयार होताच. चटकन् त्यांत चढून बसून सारथीस राजवाड्याकडे तो हाकण्यास त्यानें सांगितलें व त्याप्रमाणें रथ चालू झाला.

राजवाड्याजवळ येतांच रथ थांबला. सिद्धार्थ त्यांतून उतरून झपझप पावलें टाकीत शुद्धोदनाच्या महालांत आला. शुद्धोदनानें त्यास आपल्याकडे येतांना लांबूनच पाहिलें व जवळ आल्यावर थोडेंसें हंसून त्याला म्हटलें: “सिद्धार्था ! आज अगदी लवकरसा ? अगदीं अनपेक्षित भेट ही तुझी. कांहीं निकडीचं कामबीम आहे काय ?”

**सिद्धार्थः**—होय, पिताजी ! तसं निकडीचं काम आहे.

**शुद्धोदनः**—काय बरें तें ?

**सिद्धार्थः**—पिताजीस एक विनंति आहे माझी. ती निवेदन

करण्यास आलों आहें मी. अर्थात् आपणास भेटण्याची ही नित्याची वेळ नव्हे हें खरं. पण आलं मनांत. आलो झालं.

**शुद्धोदनः**—विनंति ? ती काय ?

**सिद्धार्थः**—आतां आपणास पौत्र झाला. आपला वंश वाढीस लागला. पुढं चालू झाला.

**शुद्धोदनः**—होय, सिद्धार्था ! माझे डोळे धन्य झाले !

**सिद्धार्थः**—आणि माझें कर्तव्य संपलं, मी पितृऋणांतून मुक्त झालों.

**शुद्धोदनः**—होय, तूंही धन्य झालास.

**सिद्धार्थः**—मग आतां ?

**शुद्धोदनः**—आतां काय ?

**सिद्धार्थः**—आतां मला परवानगी पाहिजे.

**शुद्धोदनः**—परवानगी ! ती कसली ?

**सिद्धार्थः**—कसली म्हणजे ? गृहत्याग करण्याची !

**शुद्धोदनः**—म्हणजे ? मला नाहीं कळला अर्थ तुझा. स्पष्टच सांग ना ?

**सिद्धार्थः**—घर सोडून संसारनिवृत्त होण्याची परवानगी पाहिजे मला.

**शुद्धोदनः**—आं ! संसारनिवृत्त होण्याची ! परवानगी पाहिजे तुला ! ! सिद्धार्था ! तूं हें काय बोलत आहेस ? तुझें वय का संसार-निवृत्त होण्याचें ?

**सिद्धार्थः**—पिताजी ! मी आतां खरं सांगतों कीं माझं मन आताशा संसारांत रमेनासं झालं आहे. मला हा गृहवास अडचणीचा व कंटाळवाणा वाटत आहे. मला इथं करमत नाहीं. मी इथून जातों. परवानगी द्या मला.

**शुद्धोदनः**—या वयांत, या तरुण वयांतच संसारनिवृत्त होणार

तूं ? आम्हां सर्वांना सोडून ! राज्य वैभव टाकून ! यशोधरेला धिक्कारून ! बाळ राहुलला झिडकारून ! कपिलवस्तूला रामराम ठोकून ! शाक्य राष्ट्राला अनाथ करून ! आम्हा सर्वांना विरहाग्नींत–दुःखसागरांत–लोटून संसारनिवृत्त होणार तूं ! तूं सिद्धार्था ! ! या वृद्ध पित्याचा, या जरठ राजाचा, राज्यभार मग कोण शिरावर घेणार ?

**सिद्धार्थः**—पिताजी, मला इथं राहायचा आतां अगदीं कंटाळा आला आहे. मला परवानगी द्या. म्हणजे बाहेर पडून मी सुखाचा मार्ग शोधून काढीन.

**शुद्धोदनः**—तुला इथं काय कमी आहे म्हणून तूं सुखार्थ बाहेर जात आहेस ? स्वर्गच तुझ्या स्वाधीन केला आहे ना मीं ?

**सिद्धार्थः**—त्या दृष्टीनं, पिताजी, मी आपल्या कृपानुग्रहानं मोठा भाग्यवान आहें. मला कशाची उणीव नाहीं, सर्व कांहीं यथेष्ट आहे. हें सारं खरं; पण पिताजी ! जगांतील जन्म, जरा, दुःख, मरण, क्लेश, व्याधि हे सर्व पाहून माझं मन भ्रांत व व्याकुळ झालं आहे ! मला चैन ना हौस ! या सर्व दुःखांतून मुक्त होऊन निर्वाण प्राप्त करून घेण्याचा मला ध्यास लागला आहे ! म्हणून म्हणतों कीं मला गृहत्यागाची परवानगी द्या !

सिद्धार्थाचें हें भाषण ऐकून शुद्धोदन आश्चर्यानें क्षणभर स्तंभितच झाला ! त्याची बोबडी वळली व अंतःकरण दुःखानें व्यथित झालें ! सिद्धार्थ इतक्या लवकर गृहत्याग करील याची त्याला कल्पना नव्हती. सिद्धार्थाचें हें आजचें भाषण म्हणजे त्याच्या मनोराज्यांतील मुख्य मनोऱ्यावर एक मोठा बाँबगोळाच ! त्याचा कंठ एकदम गहिंवरून आला व तो त्याला गदगदित स्वरांत म्हणाला, " सिद्धार्था ! हें तूं काय म्हणत आहेस ! आतां कोठें तुझा संसार मोहरूं लागला आहे. अशा वेळीं गृहत्यागाचं वेड घेणं म्हणजे माझ्या सर्व संसाराचा व आशाआकांक्षांचा चक्काचूर करणं होय ! आम्हा सर्वांना सोडून

गृहत्याग करण्यासारखं तुला इथं कसलं दुःख आहे? कोणत्या गोष्टीची उणीव आहे? सांग सिद्धार्था, सांग. अतुल ऐश्वर्याचा तूं स्वामी असतां, शेकडो दासदासी तुझ्या सेवेला तत्पर असतां, गुणवती व रूपवती अशी विदुषी यशोधरा तुझी सहचारिणी असतां, सुंदर सुंदर कलावंत स्त्रिया गायनवादनानें नित्य तुझी करमणूक करीत असतां, प्रमोदभुवनासारखा इंद्रमहाल तुझ्या सुखोपभोगार्थ सुसज्ज असतां, कशासाठीं तूं गृहत्यागाची इच्छा करीत आहेस? सिद्धार्था, कशासाठीं तूं गृहत्याग करीत आहेस?

**सिद्धार्थः**—पिताजी! आपल्या या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. मला इथं कशाला कांही कमी नाहीं, हें मला मान्य आहे. पण—

**शुद्धोदनः**—आतां हें 'पण' नको. सिद्धार्था! तूं आमचा प्राण आहेस! तुझ्या जिवावर मी सुखी आहें! आम्हाला सोडून तूं जाऊं नकोस! तुला काय करावयाचं व साधावयाचं तें इथं राहूनच कर. व इथं राहूनच साध.

**सिद्धार्थः**—पिताजी! आपण जर या चार गोष्टी मला द्यावयास तयार असलां, तर मी गृहत्यागाचा आग्रह धरणार नाहीं. त्या गोष्टी मला आपण द्याल का?

**शुद्धोदन** :—त्या कोणत्या, सिद्धार्था?

**सिद्धार्थ** :—मला केव्हांहि मरण येऊं नये, मी म्हातारा होऊं नये, मला रोग शिवूं नये व दारिद्र्य गांठूं नये! या चार गोष्टी आपण मला देत असाल, तर मी गृहत्यागाची हौस व आग्रह धरणार नाहीं.

**शुद्धोदन** :—हा तुझा आग्रह कोण पुरवूं शकेल? या सर्व प्राकृतिक गोष्टी असून तेथें मनुष्याचें कांहीं एक चालणार नाहीं! मनुष्यमात्रांना त्या गोष्टी चुकवूं म्हणजे चुकवितां येणार नाहींत! मरण कोणाला चुकलें आहे? म्हातारपण हा प्रकृतीचा स्वभावच आहे. अन्न

खाण्याऱ्या प्राण्याला रोग-व्याधि या सुटलेल्या नाहींत. दारिद्र्य हा दैवाचा खेळ आहे. मुला, हें भलतेंच वेड तूं डोक्यांत घेऊन बसला आहेस, याला मी काय म्हणूं? मनुष्यानें सदैव सुखी व संतुष्ट राहण्याचा प्रयत्न करावा. दुःख नको म्हणून टळणार नाहीं. हें तुझें वरील मागणें पुरविणें मनुष्याच्या हातीं नाहीं. तेव्हां तो नाद तूं सोडून द्यावास.

सिद्धार्थ :—तें कांहीं नाहीं. पिताजी, हें आपणास शक्य नसेल तर माझा आग्रह नाहीं. पण मी मात्र इथं राहणार नाहीं! जरा-मरण चुकविण्याचं ज्ञान मी प्राप्त करून घेऊन, तद्वारा जरा-मरण-व्याधि-दुःख यांनीं पोळलेल्या जिवांना दुःख मुक्त करून जगाचा उद्धार करीन. आपण मला आतां अडवूं नये.

'बहुजनहिताचा व बहुजनसुखाचा मंगल मार्ग शोधून काढल्याशिवाय मला आतां चैन पडावयाची नाहीं; म्हणून माझं अवशेष जीवित मीं आतां तिकडे वेंचण्याचा निर्धार केला आहे. आपण त्याला आड येऊं नये.'

इतकें स्पष्ट व निर्धारपूर्वक बोलून दाखवून सिद्धार्थ तेथून परतला.

---

## महाभिनिष्क्रमण !

—जातक अट्ठकथा (निदान) अश्वघोषः ५

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आपला निर्धार स्पष्ट शब्दांत पिताजीस श्रुत करून सिद्धार्थ तेथून चटकन् निघून गेला. पण त्या त्याच्या शब्दानें शुद्धोदनाला मात्र जबर धक्का बसला. अशा तरुण व विलासी वयांत सिद्धार्थानें गृहत्यागाचा नसता छंद उराशीं कवटाळून घेऊन मानव जन्माचें मातेरें करावयास उद्युक्त व्हावें याचा त्याला अत्यंत विषाद वाटला. उतार वयांत आपला भार मुलानें

उचलून घेऊन आपणांस विश्रांति द्यावी, अशी प्रत्येक बापाची स्वाभाविक इच्छा; पण ती येथें सत्यसृष्टींत न उतरतां केवळ कल्पना सृष्टींतच विरून जाणार हें पाहून शुद्धोदनास मनस्वी दुःख व खेद झाला असल्यास त्यांत नवल तें काय?

होय, मनांत तो फार हळहळला! चडफडला! नि तळमळला! जवळ जवळ त्याचें अवसानच गेल्यासारखें झालें!! मुलाचे ते निश्चयपूर्वक व निराशाजनक बोल ऐकून त्याचे हातपाय गळले व काळीज थरथरूं लागलें! सिद्धार्थ आतां आपणास लवकरच दगा देणार हा विचार त्याच्या मनांत पक्का रुजून बसला, नि आंतून वियोगदुःखाचे काळजाला चटके देऊं लागला!

बिचारा शुद्धोदन! खरोखरच मोठी करुणास्पद स्थिति झाली त्याची! त्या म्हाताऱ्या शुद्धोदनाची!

असो. सिद्धार्थ निघून गेल्यावर शुद्धोदन हलके हलके पाऊल टाकीत आपल्या महालांत जाऊन बसला. व मुलाला स्वीकृत कार्यापासून कसें परावृत्त करतां येईल याचा विचार करूं लागला. अजून त्याची अशी समजूत होती कीं सिद्धार्थ हा आणखी प्रयत्न केल्यास कदाचित् मार्गावर आला तर येईल. म्हणून त्यानें त्याला अधिक मोहपाशांत गुंतवून ठेवण्याचा विचार करून त्याप्रमाणें पुढील तयारीस लागला. या विचारांत तो दिवस गेला व पुढें दुसरा उजाडला!

बाळ राहुलाच्या जन्मोत्सवाचा सातवा दिवस होता तो. त्या दिवशीं रात्रीं राजवाड्यांत सिद्धार्थाच्या महालांत निवडक कलावंतिणींच्या मनोहर नृत्यगायनाची खास व्यवस्था करण्यांत आली. हेतु हा कीं त्या दिवशीं रात्रीं तरी त्यानें गृहत्याग करूं नये. दिवस उजाडल्यावर पुनः आणखी त्याचें मन वळविण्याचे प्रयत्न करून पाहावे, असा विचार करून राजानें तो घाट घातला.

त्या दिवशीं रात्रीं युवराजाच्या महालांत केवढा थाटमाट ! जिकडे तिकडे अत्तराच्या दिव्यांचा लखलखाटच लखलखाट ! आणि विविध परिमळ-द्रव्यांचा मधुर असा एकच घमघमाट ! तशांतच सुंदर वस्त्राभरणांनीं विभूषित अशा नृत्यगायनकुशल दिव्यांगनांचा एक मोहक मेळावा ! जवळ जवळ सुरम्य स्त्रीसौंदर्याचें तें एक अपूर्व प्रदर्शनच का म्हणाना ! !

सिद्धार्थ हा नित्याप्रमाणें रात्रीं जेऊन खाऊन विश्रांतीस्तव आज वाड्यांतील आपल्या महालांत आला. आणि पाहतो तों हा प्रचंड थाटमाट ! नेहमीच गाणेंबजावणें असे. पण आजचा रंग कांहीं और होता ! तेथें आज स्वर्गातल्या परीच खालीं उतरल्या आहेत कीं काय असा भास होत होता. इतका मोहक होता तो तेथील सुहास्यरमणींचा मधुर मेळावा !

सिद्धार्थ महालांत आल्यावर आपल्या रत्नखचित सुवर्णमंचकावर जाऊन स्थानापन्न झाला. त्यासरशी तंबोऱ्याची तार छेडली गेली व तबल्यावर हात खेळूं लागला. तों इतक्यांत एका अप्सरेचा सारंगीसारखा मधुर स्वर खुलून त्यांत जाऊन मिसळला. झालें. गायनाला मोठ्या उत्साहानें सुरुवात झाली. आणि लवकरच मोठा रंग चढला त्याला. दोन तीन उत्तमोत्तम चिजा म्हणून झाल्यावर संगीताबरोबर नृत्यहि सुरू करण्यांत आलें. आतां दुधांत साखर पडली ! मधुर गायन व मंजुळ नृत्य ! ! खरोखर मोठें मोहक दृश्य होतें तें ! !

याप्रमाणें होतां होतां मध्यरात्रीचा सुमार झाला. गाण्याचा मधुर आलाप व नृत्याचा मंजुळ ध्वनि यांनीं तो महाल खुलून व घुमून गेला. त्या गानकोकिल गणिकांनीं व नृत्यनिपुण कलावंतिणींनीं आपल्या गानकौशल्याची व नृत्यनैपुण्याची मोठी बहार करून सोडली ! कसलाहि पुरुष असला तरी तो त्या वेळेला बेहद्द खूष होऊन आनंदानें बेहोष होऊन जातां ! !

पण ? पण काय ? सिद्धार्थाची स्थिति तशी झाली काय ? तो त्या सुहास्य रमणींच्या घोळक्यांत व शृंगारमय हावभावांत रमला काय ? छे ! नांव कशाला ? त्याचे डोळे त्या नृत्याकडे होते. पण वेडें मन मात्र जाग्यावर नव्हतें. कोठें भरकटलें होतें कोणास ठाऊक !

याप्रमाणें हा कार्यक्रम जवळ जवळ प्रहरभर चालला. पण सिद्धार्थाला त्यापासून हर्ष, आनंद, उल्हास असा कांहींच वाटला नाहीं. उलट तो सर्व प्रकार–गान व नृत्य–हावभाव नि शृंगार-चेष्टा–पाहून त्याचें मन उद्विग्न व विषण्ण झालें. पुढें पुढें तर तो त्या बैठकीला अत्यंत कंटाळून डोळे मिटून ध्यानस्थासारखा स्वस्थ बसला. त्यांत त्याला कांहींच गोड व मनोरंजक वाटलें नाहीं.

याप्रमाणें तो जेव्हां डोळे मिटून स्वस्थ बसला, तेव्हां त्या स्त्रियाहि पुढें थोडा वेळ आपला कार्यक्रम चालवून, आपली कांहीं मोहिनी सिद्धार्थावर चालूं शकत नाहीं असें पाहून, मग त्याहि थंड झाल्या. रात्र जवळ जवळ मध्यावर आली होती. गाऊन व नाचून त्याहि थकल्या भागल्या होत्या. अर्थात्च त्यांना विश्रांति हवी होती. ती घेण्यास्तव त्याहि तेथेंच जमिनीवर पसरतात न पसरतात तोंच निद्रादेवीनें त्यांच्यावर आपली मोहिनी घातली, व पुढें क्षणार्धांत तेथें सगळें सामसूम झालें !

हा सर्व प्रकार झाल्यावर पुढें कांहीं वेळानें सिद्धार्थानें डोळे उघडून तेथील देखाव्यावर एकवार नजर फिरविली. काय तें दृश्य ! किती अमंगल ! किती अभद्र ! खरोखरच मोठें चमत्कारिक होतें तें ! क्षणापूर्वीं ज्या अप्सरांसारख्या मोहक व मादक दिसत असून मोठ्या ऐटींत नाचत व ठुमकत होत्या, त्या तशा आतां होत्या काय ? त्या तशा आतां दिसल्या काय ?

त्यांत एकीनें तोंड आ वासलें होतें. एकीच्या तोंडातून लाळ गळत होती. कोणी मोठ्यानें घोरत होत्या, तर कोणी कटकटां दांत खात

होत्या. कोणी कांहींच्या बाहींच बडबडत होत्या, तर कोणी गडबडा लोळत होत्या. कोणाची छाति उघडी पडली होती, तर कोणाचें वस्त्र सरकून लज्जाअंग बाहेर दिसत होतें. याप्रमाणें तो त्या दिव्यांगनांचा पूर्वींचा मोहक देखावा आतां खरोखर मनांत किळस उत्पन्न करणारा झाला.

सिद्धार्थानें त्या सर्व विचित्र देखाव्यावर एकवार संपूर्ण नजर फिरवून पुढें तो आपणाशींच म्हणाला, अरेरे ! काय हा पुरुषाचा भ्रम ! केवढा हा स्त्रियांचा मोह ! सटव्या नटतात काय, मुरडतात काय ! नाचतात काय-ठुबकतात काय ! पण त्यांचें हें हिडिस व किळसवाणें स्वरूप अजून कोणालाच कळत नाहीं हें केवढें आश्चर्य ! ! जागृत असतांना केवढा त्यांचा श्रृंगार ! काय तो थाटमाट ! काय ती वेषभूषा नि कोण तो नखरा ! ! जणूं स्त्री म्हणजे रूपसौंदर्याची एक दिव्य पुतळीच ! ! पण तें त्यांचें खरें स्वरूप—अभद्र व अमंगल स्वरूप—पाहावयाचें तर त्या निद्रावश असतात तेव्हांच ! त्या वेळीं त्यांच्या रूपावरून व शरीरावरून नजर फिरविली तर कोण शाहणा त्यांना जवळ घेण्यास —प्रेमानें कवटाळण्यास—तयार होईल ? नको रे बावा ! नको हा स्त्रियांचा छंद ! नको त्यांचें प्रेम ! नको त्यांचा सहवास ! त्यांचें दर्शनसुद्धां नको मला आतां इतःपर ! ! अगदीं अमंगल नि अभद्र जात ! !

हा ताप ! हा कष्ट ! हा शोक ! नको आतां हा संसार ! नको हा महाल ! हा सुखविलास ! नि हा नाचरंग—गायनवादन—लखलखाट नि घमघमाट ! मला यांतलें आतां कांहीं एक नको ! गृहत्याग करून वनवासांत जाईन तेव्हांच हा माझा घाबरलेला व गुदमरलेला जीव खालीं पडेल. तेव्हांच मला शांति मिळेल. नि मी पूर्ण सुखी होईन. तोंपर्यंत ही तळमळ—ही भगभग—आतां थांबावयाची नाहीं. सिद्धार्था ! चल, ऊठ येथून नि पड बाहेर ! ! असें म्हणून तो तेथून उठला व झपझप पाउलें टाकीत दारापाशीं आला.

दार उघडून बाहेर आला. तेथें एक माणूस झोंपी गेलें होतें. त्याला हातानें हलवून 'कोण आहे रे' असा प्रश्न करतांच 'मी छन्न आहें, आर्यपुत्र' असा त्या माणसानें उठून जबाब दिला.

'छन्ना, तूं काय, ठीक' सिद्धार्थ म्हणाला. 'आतां माझी एक कामगिरी केली पाहिजे तुला.'

'ती काय, आर्यपुत्र?' असें छन्नानें प्रश्निलें.

'ती म्हणजे हीच कीं' सिद्धार्थ उत्तरला, 'आतांच्या आतां पागेंत जाऊन माझा घोडा तयार कर. लांब जावयाचें आहे मला. फार लांब. ही एवढी कामगिरी केलीच पाहिजे तुला, छन्ना!

'बरें, देवा!' असें म्हणून तो तेथून निघून अश्वशालेकडे आला. अर्थात् सिद्धार्थाचा घोडा म्हणजे ठरलेला. कंथक हें त्याचें नांव. तोच तेवढ्या त्याच्या मर्जीतला. खरोखर मोठा उमदा प्राणी. अत्यंत देखणा नि भव्यहि पण तसाच. मोठा चपल नि फार हुशार. अत्यंत प्रामाणिक नि मोठा साहसी. खरा अश्वराज होता तो! तो कंथक!! छन्न त्याच्याजवळ जाऊन पुढील तयारीला लागला.

छन्न तेथून निघून गेल्यावर सिद्धार्थाला राहुलची आठवण झाली. जातां जातां बाळाचें एकवार डोळे भरून दर्शन घेऊन डोळ्यांचें पारणें फेडावें अशी त्याला इच्छा झाल्यावरून तो तेथून बाळंतिणीच्या खोलीजवळ आला.

दरवाजा बंद होता; पण आंतून कडी नव्हती. तो नुसताच मिटून ठेविला होता. दरवाजा उघडून तो हलक्या पायानें आंत बाळंतिणी-जवळ गेला. तेथें एका समईंत अत्तराचा दिवा संथपणें जळत होता. त्या प्रकाशांत त्यानें त्या नूतन राजहंसावर दृष्टि फेकली.

किती सुंदर बाळ तें! किती कोमल! किती नाजूक! किती मोहक! त्या राजस राण्याला उचलून हातांत घ्यावें व एक गोड

मुका घ्यावा, असें त्याच्या मनांत आलें. पण त्याच्यासभोंवतीं मातेच्या बाहूंचा विळखा पडला होता. तें तिच्या कुशींत छातीला अगदी बिलगून डोळे मिटून स्वस्थ निजलें होतें. यामुळें त्याचा चेहरा स्पष्ट दिसावा तसा दिसत नव्हता. हळूच तो बाळावरचा तिचा हात आपल्या हातानें धरून बाजूला सारून बाळाचें एकदां स्पष्ट दर्शन घ्यावें असें त्यांच्या मनांत भरलें व हात त्यासाठीं पुढें सरकालाहि.

पण त्याबरोबरच हाही विचार चमकला कीं, न जाणो आपल्या हाताच्या स्पर्शानें ती जागी झाली तर !

आपण करावयास जाऊं एक नि मग होईल भलतेंच ! यशोधरा जागी झाली तर मग कसें ? आपली तेथून सुटका कशी होणार ? यशोधरा तशी आपणास मुकाट्यानें जाऊं देईल काय ? छे, तें शक्य नाहीं. ती आपल्या मार्गांत नसता अडथळा उत्पन्न करील नि आपलें सर्वच कांहीं फिसकटून जाईल, आतां बाळाचें दर्शन घेणें नको नि मधेंच विघ्न उपस्थित होणें नको. पुढें माझा कार्यभाग झाल्यावर पाहतां येईल. आतां हा मोह नको. अगदीं नको. माझ्या मार्गांत विघ्न उत्पन्न करणारा हा पुत्रमोह व स्त्रीमोह आवरून, येथून पाय काढणें हेंच चांगलें असा विचार करून, तेथें निजलेल्या बाळाचा व त्याच्या मातेचा–आपल्या सहचारिणी यशोधरेचा–मोह आवरून, अधिक गडबड न करतां आला तसाच हलक्या पावलानें तो परत चालता झाला.

तेथून निघून झपझप पावलें टाकीत तो बाहेर आला. अंगणांत घोडा तयार होताच. त्याच्याजवळ जाऊन, त्याला प्रेमानें थोपटून चटकन् त्यावर चढून स्वार झाला. छन्नाला घोड्याचें शेपूट धरून येण्यास सांगून पुनः एकदा वाड्याकडे वळून त्याचें अखेरचें दर्शन घेतलें आणि घोड्याला टांच मारली. त्यासरशी कंथक एकदम उसळी मारून तेथून वाऱ्याप्रमाणें धांवत सुटला.

आषाढ शुद्ध पौर्णिमेची रात्र होती ती. रविवारचा दिवस नि उत्तराषाढा नक्षत्र. नुकतीच मध्यरात्र उलटून गेली होती. अकाश किंचित अभ्राच्छादित दिसत असल्यामुळें चांदणें पुसट पडलें होतें, वाराहि मंदमंद वाहत होता. कपिलवस्तु सगळी निद्रावश झाली होती. सर्वत्र अगदीं सामसूम. कोठें खट् नाहीं कीं फट् नाहीं. अगदीं नितांत शांतता व स्तब्धता !

अशा सुशांत वेळीं सिद्धार्थ—तो प्रपंचाला विटलेला जीव—तत्त्वशोधनार्थ उतावीळ झालेला जिज्ञासु—धनसुतदारादि प्रियवस्तूंचा परित्याग करून, कंथकावर स्वार होऊन वयाच्या एकूणतिसाव्या वर्षीं—म्हणजे भर ज्वानींत—वाड्याबाहेर पडला आणि मानवी दुःखनिरोधाचा अचूक मार्ग शोधून काढण्यासाठीं कपिलवस्तूच्या राजरस्त्यावरून दौडत दौडत वेशीच्या बाहेर आला. तेथून थोडें अंतर पुढें गेल्यावर कंथकाला थांबवून मागें वळून कपिलवस्तूचें फिरून एकदां दर्शन घेऊन पुनः घोड्याला टांच मारली. या वेळीं त्याच्या तोंडांतून हे पुढील उद्गार निघाले, 'जननमरणयोरदृष्टपारो न पुनरहं कपिलाव्हयं प्रविष्टा'....जननमरणाचें परतीर पाहिल्याशिवाय मी पुनः कपिलवस्तूंत पदार्पण करणार नाहीं !

या वेळीं त्याची मनःस्थिति कशी होती हें आम्ही आमच्या पदरच्या शब्दांनीं न सांगतां खुद्द त्याच्याच तोंडून निघालेल्या शब्दांत सांगतों, म्हणजे झालें. याविषयीं महासच्चकसुत्त व बोधिराज कुमारसुत्त या दोन ठिकाणीं त्याचे विचार स्फुटित झाले आहेत ते असेः....'सम्बाधो घरावासो रजापथो अब्भोकासो पब्बज्जा नयिदं सुकरं अगारं अज्झावसता एकन्तपरिपुण्णं एकन्तपरिसुद्धं सङ्खलिखितं ब्रम्हचयं चरितुम्' (मज्झिमनिकाय ३६-८) याच विषयावर बोधिराजकुमारसुत्तांत पुढील मजकूर आढळतोः....'न खो सुखेन सुखं अधिगन्तब्बं, दुक्खेन सुखं अधिगन्तब्बं' ति। सो खो अहं, राजकुमार, अपरेन समयेन दहरोव

समणो सुसु काळकेसो भद्रेन योब्बनेन समन्नागतो पठमेन वयसा अकामकानं मतापितुन्नं अस्सुमुखानं रुदन्तानं केसमस्सुं ओहारेत्वा कासायानिं वत्थानि अच्छादेत्वा अगारस्मा अनगारियं पब्बजिंज ( मज्झिमनिकाय ८५-४ ) भावार्थ :—हे कन्दरका ! मला बोधि होण्यापूर्वी म्हणजे बोधिसत्व अवस्थेंत असतांना असें झालें कीं गृहवास हा जंजाल असून--मैलाचा--घाणीचा मार्ग आहे; प्रव्रज्या म्हणजे मैदानासारखी खुली व प्रशस्त जागा आहे. एकांत परिपूर्ण, सर्वथा परिशुद्ध, स्वच्छ केलेल्या शुभ्रशंखाप्रमाणें उज्ज्वल असें ब्रह्मचर्य घरांत राहून म्हणजे प्रपंचांत राहून पालन करणें हें सुकर नाहीं. तसेंच सुखाने सुख मिळत नाहीं तर तें दुःखानेच मिळतें, असें मला वाटल्यावरून मी त्या वेळीं अत्यंत तरुण असतांना, केस काळे कुळकुळीत असतांना, प्रथम वयांतच माझे आईबाप नको नको म्हणत अश्रु ढाळीत असतां, रडत असतां, केस व स्मश्रु काढून, काषाय वस्त्रें परिधान करून घरांतून बाहेर पडून प्रव्रज्या घेतली. वरील पालीवचनांचा हा असा समुदायार्थ आहे. असो.

या उद्गारावरून सिद्धार्थ हा प्रपंचाला कसा व किती विटला होता, ज्ञानार्जनासाठीं त्याला किती व कशी ओढ लागली होती, याची सहज कल्पना करतां येणार आहे. ' घर ही अडचणीची व केरकचऱ्यानें भरलेली गलिच्छ जागा असून प्रव्रज्या ही खुल्या मैदानासारखी स्वच्छ व मोकळी जागा आहे ( ' संबाधो घरावासो रजापथो, अब्भोकासो पब्बज्जा ' ) हे त्याचे त्यावेळचे उद्गार तत्त्वजिज्ञासूंना मननीय नाहींत असें कोण म्हणेल ? तसेंच सुखानें सुख मिळत नसतें तर तें दुःखानेंच मिळत असतें (' न खो सुखेन सुखं अधिगन्तब्बं, दुक्खेन सुखं अधिगन्तब्बं ' ) हें वचनहि तितकेंच मननीय आहे. ज्याला खरें सुख, अविनाशी सुख पाहिजे आहे त्याला कडकडीत तपश्चर्येचें—झणझणीत वैराग्यवृत्तीचें—खडतर व्रताचरण स्वीकारलें पाहिजे ही भारतीय ज्ञानोपासकांची परंपराप्राप्त वृत्ति अनुकरणीय व आदरणीय नाहीं असें

कोण म्हणेल? प्रापंचिक सुखाला विटलेला व सांसारिक दुःखानें डागलेला सिद्धार्थ आतां दुःखाचें मूळ खणून, परमसुखाचें अढळ शांति-स्थान शोधून काढण्यासाठीं सर्व प्रियजनांचा मोह आवरून व राज-सुखावर पाणी सोडून आणि कपिलवस्तूस राम राम ठोकून निर्जन अरण्याच्या दुर्गम मार्गास लागला ! !

---

## अनोमानदीच्या कांठावर

अश्वघोष व जातक–अट्ठकथा ( निदान )

कपिलवस्तूच्या वेशीतून बाहेर पडल्यावर त्या अश्वराज कंथकानें जोरानें उडी मारून धांवण्यास सुरुवात केली. तेव्हां वायूला सुद्धा त्याच्या वेगापुढें मागें हटावें लागलें ! हां हां म्हणतां त्यानें शाक्य-राज्याची सीमा ओलांडून कोळी राज्यांत प्रवेश केला. पुढें थोडक्याच वेळांत कोळीय सीमाहि गांठली आणि मल्लाच्या मुलुखांत पादप्रक्षेप केला. याप्रमाणें राज्यामागें राज्यें ओलांडून सकाळ होते न होते तों त्यानें अनोमा नदी गांठली ! म्हणजे कपिलवस्तूहून त्यानें सहा तासांत जवळ जवळ तीस योजनांची धडक मारली ! ! नदीचें पात्र बरेंच रुंद होतें. सिद्धार्थानें टांच मारून त्याला खूण करतांच त्या बहाद्दर कंथकानें मोठ्या कौशल्यानें त्या विस्तीर्ण पात्रावरून उडी मारून हां हां म्हणतां पैलतीर गांठलें आणि एक विजयश्रीची गर्जना केली ! !

सिद्धार्थाला मोठा आनंद झाला. चटकन् घोडा थांबवून तो खालीं उतरला. त्यास प्रेमानें पाठीवर थोपटून त्यानें त्याचे आभार मानले. व नंतर छन्नाकडे वळून त्यास म्हटलें :—श्रेष्ठ मित्रा ! शाबास तुझी ! तुझें मित्रप्रेम व स्वामिभक्ति आज कसास लागली ! वायुगतीनें धांवणाऱ्या कंथकाची पाठ तूं अखेरपर्यंत सोडली नाहींस ! धन्य

आहे तुझी !! आज मित्रप्रेमानें तूं मला जिंकलें आहेस ! खरा स्वामिभक्त आहेस तूं. तुझ्यावर फार खूष झालो आहें ! आतां, मित्रा ! फार काय सांगूं, आतांपर्यंत केलीस त्याचप्रमाणें ही माझी एक शेवटची सेवा कर.

**छन्न**:—ती काय, आर्यपुत्र ?

**सिद्धार्थ**—( गळ्यांतील कंठा काढून त्याच्या हातांत ठेऊन बोटांतील रत्नाची आंगठी काढून त्याच्यापुढें धरून ) :—मित्रा ! आतां असं कर. येथें तुझी माझी ताटातूट होणार. इथून तूं घराकडे मागें परत अन् मी माझ्या कार्यार्थ एकटाच पुढें जातों. ही आंगठी घे आणि ती पिताजीस दाखवून माझ्या वतीनें त्याला प्रणामपूर्वक विनंति करून सांग कीं—

**छन्न**:—काय सांगूं ?

**सिद्धार्थ**:—माझ्यासाठीं आतां शोक करूं नकोस म्हणून. तुमचा मुलगा सिद्धार्थ हा सुखरूप असून तो यापुढें जरामृत्यूवर जय मिळविण्याच्या उद्योगास लागला आहे. स्वर्गाच्या अगर इतर सुखाच्या लालसेनें अथवा कोणावर रुसून अगर रागावून तो बाहेर पडला नाहीं. तर दुःखाचें मूळ शोधून काढून त्याचा नायनाट करण्यासाठीं व अजात, अजर, अमर, अशोक असें शाश्वत सुख मिळविण्यासाठीं त्यानें हें दिव्य पत्करलें आहे. आज नाहीं, पुढें केव्हां तरी आपला वियोग हा होणारच. तो ठरलेलाच. मग दुःखशोक करून काय होणार ? यावर पिताजी असें म्हणेल कीं तें सर्व खरें असलें, तरी तो गेला तो योग्य वेळीं गेला नाहीं. त्याचें जाण्याचें हें वय नव्हे. तर तूं पिताजीचें असें समाधान कर कीं धर्मकारणांत योग्यायोग्य असा कालभेद करतांच येत नाहीं. मनांत आलें कीं कोणताहि काळ योग्यच ठरतो. तोच मंगल मुहूर्त होय ! कारण हें जीवित मोठें अस्थिर नि फार चंचल आहे. केव्हां दगा देईल याचा नेम नाहीं. मृत्यु हा

जीवितावर झडप घालण्यास सतत टपून बसला असतां अमुक योग्य नि अमुक अयोग्य वेळ असें तारतम्य करण्यांत काय अर्थ आहे ? म्हणून मित्रा ! तूं घरीं जाऊन पिताजींचें चार गोड शब्दांत सांत्वन कर ! व त्याचा शोकमोह घालवून दे ! त्याचप्रमाणें मातु:श्रीलाहि सांग आणि सती यशोधरेला मुद्दाम भेटून तिची समजूत व समाधान कर ! आणि शेवटीं हें सांगण्यास विसरूं नकोस.

छन्न:—तें काय, राजपुत्र ?

सिद्धार्थ:—माझा हेतु सफल झाला म्हणजे मी परत येऊन सर्वांना भेट देईन म्हणून. खात्रीनें येऊन भेटेन म्हणून.

छन्न:—नाहीं तर.

सिद्धार्थ:—हाच शेवटचा नमस्कार ! !

सिद्धार्थाचे हें अखेरचे शब्द ऐकून छन्नाचे डोळे एकदम पाण्यानें भरून आले व कंठ गहिवरला ! दु:खानें छाती दडपली व डोळ्यांसमोर काजवे चमकूं लागले ! ! क्षण भर तो दगडी पुतळ्याप्रमाणें स्तब्ध उभा राहिला. पुढें काय बोलावें नि काय करावें हें त्यास सुचेना. त्याची भ्रमिष्टासारखी स्थिति झाली.

सिद्धार्थानें त्याची ती दशा ओळखिली व प्रोत्साहनार्थ त्यास म्हटलें, 'छन्ना ! असा मुग्ध कां ? बोलत कां नाहींस ?'

छन्न :—आर्यपुत्र ! मीहि आपल्याबरोबरच येणार. हें काळें तोंड घेऊन मी कपिलवस्तूस कसा जाऊं ? नाहीं. आर्यपुत्र ! मी परत जाणार नाहीं. आपल्यापाशींच राहीन.

सिद्धार्थ :—असें म्हणूं नकोस. छन्ना ! असं म्हणूं नकोस. तूं जर गेला नाहींस, तर पिताजीस माझी वार्ता कशी कळेल ? कोण कळवील ? जा, मित्रा ! जा. त्यांना माझी हकीकत कळव. नाहीं तर ते माझा ध्यास घेऊन प्राण देतील. ही आपत्ति टाळण्यासाठीं तुला गेलेंच पाहिजे.

या शब्दानें छन्नाचा निरुपाय झाला. स्वामीचीं आज्ञा मान्य करणें त्यास भागच पडलें व तसें करण्यास तो कबूल झाला. नंतर सिद्धार्थानें ती आंगठी व अंगावरील इतर सर्व दागिने काढून त्याच्या हवालीं केलीं. आणि आकाशाकडे वर तोंड करून पाहिलें, तो दिनराज उदयगिरीवर चांगला वर आला होता. ‘ हं, आतां विलंब करून उपयोग नाहीं ’ असें म्हणून छन्नाजवळची तलवार मागून घेऊन ती म्यानेतून बाहेर काढीत असतां तो छन्नास म्हणाला, ‘छन्ना, आतां मला या वेषांत राहून चालावयाचें नाहीं. माझा वेष बदलला पाहिजे. मला भिक्षु झालें पाहिजे. हा राजपुत्राचा वेष टाकून भिक्षूचा वेष घेतला पाहिजे तरच माझा कार्यभाग होईल. ’ असें म्हणून त्यानें त्या तरवारीनें आपल्या डोकी-वरचे सुंदर काळे कुळकुळीत केंस कापून वाऱ्यावर उडवून दिले. चमत्कार हा की ते केस खाली न पडतां उडत उडत वर आकाशांत अधांतरीच तरंगत राहिले !

केंस तेवढे काढले. पण भिक्षु होण्याला नुसते केंस काढून चालत नाहीं. त्याबरोबरच वस्त्रहि बदलावें लागतें. पण तशी सोय तेथें कोठें होती ? निर्जन प्रदेश आणि तशांत सकाळची वेळ. काषाय वस्त्र तेथें मिळणार कोठून ? ही पंचाइत येऊन पडली. तें कसें मिळेल, अगर मिळवावें या विचारांत तो पडला असतां सुदैवानें पुढें लौकरच एक शिकारी सावजाचा शोध करीत करीत तेथें आला. त्याच्या अंगावरचें वस्त्र धुळीनें मळून इतकें तांबूस झालें होतें कीं जवळ जवळ त्याला छाटीचें स्वरूपच आलें होतें ! सिद्धार्थाचा हेतु आयताच सफल झाला. तो त्या शिकाऱ्याजवळ जाऊन आपली राजवस्त्रें घेऊन त्याचीं तीं मळकट वस्त्रें मोबदल्यांत देण्यास त्याची विनंति करूं लागला. आवळा देऊन कोहाळा मिळत असतांना कोण शाहणा तो सौदा नाकारील ? अर्थात् शिकाऱ्यानें ती गोष्ट मान्य केली व आपलें मळकट वस्त्र देऊन राज-

पुत्राचा तो सुंदर पोषाख घेऊन तो आला तसा मोठ्या खुषीनें तेथून परत निघून गेला.

छन्नानें आतां त्या सिद्धार्थाकडे पाहिलें मात्र. एकदम त्यास रडूं कोसळलें ! डोक्यावर केंस नाहींत, गळ्यांत हार नाहीं. कानांत कुंडलें नाहींत, हातांत पोचा नाहीं, बोटांत आंगठी नाहीं. अंगावर पोषाख नाहीं ! डोके मुंडलेलें अन् अंगावर मळकी छाटी ! सकलैश्वर्यसंपन्न राजपुत्राचें क्षणांत दरिद्र नारायण भिक्षूंत रूपांतर झालेलें पाहून छन्नाला रडें कोसळलें, यांत आश्चर्य काय ? कोणाही सहृदय माणसाची तशीच स्थिति व्हावयाचीच. असो.

तीं शिकाऱ्याचीं वस्त्रें अंगावर धारण केल्यावर तो छन्नाकडे वळत म्हणाला, "छन्ना ! आतां आमच्या वियोगाचा क्षण आला. मी पुढें जातों. तूं परत जा. दुःख करूं नकोस ! रडूं नकोस ! मी कांहीं तिकडेच जात नाहीं."

**छन्न** ( हुंदके देत )–आर्यपुत्र ! पिताजी, माता गोतमी, देवी यशोधरा, बाळ राहुल, ती कपिलवस्तु अन् शाक्यराष्ट्र.

**सिद्धार्थ :**—( मध्येंच ) आतां तें कांहीं बोलूं नकोस ! तो सिद्धार्थ आतां मी नाहीं. मला आतां तें कांहीं नको ! बस्स. बहुजनहितासाठीं व बहुजन सुखासाठीं मला हा त्याग–प्रपंचाचा त्याग–सर्वस्वाचा त्याग केलाच पाहिजे ! छन्ना ! तो मीं केला आहे ! आनंदानें केला आहे ! खुषीनें केला आहे ! मित्रा ! आतां तूं आपल्या रस्त्यानें जा ! माझ्या मी जातों. योगायोग असेल तर पुनः मी तुम्हां सर्वांना येऊन दर्शन देईन. जा ! छन्ना ! आतां तूं जा ! !

असें म्हणून तो तेथून झपझप पावलें टाकीत पुढें निघून गेला. छन्न त्याच्याकडे पाहत वेड्यासारखा तेथल्या तेथें स्तब्ध उभा राहिला.

---

## कपिलवस्तु शोकसागरांत बुडाली !

अश्वघोष ८–४३ ते ७०

सिद्धार्थ जो तेथून निघाला तो वायुगतीनें झपझप पावलें टाकीत पुढें जाऊन क्षणार्धांतच दिसेनासा झाला ! बिचारा छन्न ! आतां तर त्याचें होतें नव्हतें तेवढें सर्व अवसानच निघून गेलें ! स्थिति मोठी चमत्कारिक झाली ! क्षणभर वेडाच झाला तो ! डोकें सुन्न झालें व डोळ्यांपुढें काजवे चमकूं लागले ! काय करावें, कोठें जावें, हे त्याला सुचेना ! मोठ्या बुचकळ्यांत पडला तो ! तो स्वामिभक्त छन्न ! गांवीं जावें तरी पंचाईत आणि न जावें तरी पंचाईत. गांवीं गेल्यास सगळी कपिलवस्तु त्याला बोलबोलून टोंचून फाडून खाईल ! आणि न जावें तर राजवाड्यांत सगळा हाहाकार माजून नसता अनर्थ ओढवेल ! ! आतां करावें तरी काय ? या विवंचनेंत तो पडला असतां मध्यें एकदम त्याला सिद्धार्थाच्या शेवटच्या शब्दाची–म्हणजे निरोपाची –आठवण झाली. म्हणून सर्व विचार बाजूला ठेवून गांवाकडे परतण्याचा निश्चय ठाम करून तो कंथकाजवळ गेला.

बिचारा कंथक ! मूक प्राणी खरा ! पण किती शाहणा नि किती प्रामाणिक ! सिद्धार्थाचें व छन्नाचें भाषण त्याला जणूं समजलें कीं काय, सिद्धार्थ तेथून निघून गेलेला पाहून त्या स्वामिभक्त सेवकानें एक दु:खाची दीर्घ किंकाळी फोडली ! व डोळ्यांतून अश्रु गाळले ! छन्न जवळ जाऊन ‘ चल, कंथका ! परत जाऊं चल ! ’ असें म्हणून त्याला लगाम धरून ओढूं लागला. पण तो जागचा हलेल तर ! छन्नानें त्याला पुष्कळ चुचकारून व गोंजारून पाहिलें. पण सर्व कांहीं व्यर्थ ! कशालाच तो दाद देईना ! किंबहुना त्याचें तिकडे लक्षच नव्हतें ! सारखी त्याची सिद्धार्थ गेला त्या वाटेकडे दृष्टि लागून राहिली होती ! छन्न अगदी बेजारला. त्याला तेथेंच सोडून जातां येईना आणि कंथक तर जाग्यावरून हलेना ! खरोखर त्या प्राण्याला मरणांतिक दु:ख

झालें ! त्याचें काळीज फाटलें आणि अंगातील सर्व अवसान निपटून गेलें ! ज्या पाठीवर सिद्धार्थ स्वार होत होता ती पाठ आतां दुसरा कोणी तरी पटकावणार, या विचारानें जणूं त्याच्या काळजाला पीळ पडून जीव अगदीं कासावीस झाल्यासारखा झाला ! छन्नाबरोबर परतून चार पावलें कशीबशीं टाकलीं न टाकलीं तोंच त्याला घेरी आली व धपकन् तो खालीं पडला ! आणि तेथेंच त्याचा अंत झाला ! ! सिद्धार्थ सोडून गेला आणि कंथक मरून पडला ! तेव्हां त्या बिचाऱ्या छन्नाची काय अवस्था झाली असेल याची वाचकांनींच कल्पना केलेली बरी ! ! ( ललित विस्तर )

बिचारा छन्न आतां एकटाच तेथून निघाला. कंथकानें पांचसहा तासांत जी मजल मारली होती ती परत चालून जाण्यास छन्नास चांगले सात दिवस लागले ! या अवधींत कपिलवस्तु सगळी गडबडून गेली होती ! सिद्धार्थ एकाएकीं कोणाला न सांगतां न पुसतां रातोरात नाहींसा झाला ही बातमी दुसऱ्या दिवशीं सकाळीं शहरांत सगळीकडे वणव्याप्रमाणें पसरून, जो तो ती ऐकून आश्चर्यानें व दुःखानें दिङ्मूढ झाला ! तो कसा गेला, कां गेला हाच एक प्रश्न ज्याच्या त्याच्या तोंडीं रुजून प्रत्येकजण ती बातमी ऐकून हळहळूं व तडफडूं लागला ! खरोखर सिद्धार्थ होताच तितका लोकप्रिय ! अत्यंत सालस व परम दयाळु ! स्वभावाचा गोड नि मनाचा उदार ! रूपानें सुंदर व वाणीनें मधुर ! ! अशा युवराजाविषयीं कोणाचें मन प्रेमभरित होणार नाहीं ? कोण त्याच्या विरहानें हळहळणार नाहीं ? खरोखर म्हणजे सिद्धार्थ हा कपिलवस्तूचा—साऱ्या शाक्यराष्ट्राचा—जीव कीं प्राण होता, हें निराळें सांगणें नको.

सिद्धार्थ हा नाहींसा झाला ही बातमी ऐकून शुद्धोदनाचें तर संपूर्ण अवसानच गेलें ! तो मटकन् खालीं बसला आणि जमिनीला हात टेकले ! त्याची कम्मरच खचली आणि चैतन्य गारठल्यासारखें झालें ! केवढें त्याचें त्यावर प्रेम ! सिद्धार्थाच्या तोंडून शब्द निघण्याचाच काय तो

अवकाश. झेललेंच ते हातांत आणि केलीच त्याची इच्छा पूर्ण. पण हें सर्व आतां काय? ती सगळी अखेर स्वप्नसृष्टिच झाली ना ! गोतमीनें तर ही बातमी ऐकून 'हा सिद्धार्थ !' म्हणून जमीनच धरली ! ! आणि राजवाडा सगळा हाहाकारानें व आक्रोशानें दणाणून गेला ! ! !

शुद्धोदन जरी दु:खग्रस्त झाला होता, तरी त्यांतल्या त्यांत थोडा धीर धरून,शोक आवरून लगेच मुलाच्या शोधार्थ त्यानें चारी दिशांना शेंकडों राजदूत पाठविले. त्यांनीं गांवोगांव व रानोमाळ फिरून त्याचा कसून तपास चालविला. दिवस नाहीं, रात्र नाहीं, पाऊस नाहीं, वारा नाहीं, भूक नाहीं, तहान नाहीं, कशाची परवा न करतां जिवाचें रान करून सारखे त्याला शोधीत ते चोहोंकडे फिरत सुटले. तो सबंध दिवस गेला, दुसरा गेला, तिसरा गेला, चौथाहि गेला, पण कशाला काय थांग ना पत्ता, सगळा कानाकोंपरा धुंडून तपासून पाहिला; पण व्यर्थ ! युवराजाचा कांहींच ठाव लागेना ! अखेर तेहि फिरून फिरून थकले आणि शेवटी निराश होऊन परत घराकडे वळले.

तो आठवा दिवस. पडत झडतच कां होईना, छन्नानें एकदाची कपिलवस्तु गांठली. वेशींत पाय पडतो न पडतो तों 'कोठें आहे, छन्ना ! सिद्धार्थ' या प्रश्नाची एकच सरबत्ती सुरू झाली. त्याला पाहतांच ज्याच्या त्याच्या तोंडांत हाच एक प्रश्न—'कोठें आहे छन्ना ! आमचा सिद्धार्थ ?' बिचारा छन्न काय सांगणार ? त्यांचें समाधान करण्यासारखें उत्तर असें त्याच्याजवळ होतें कोठें ? कोणाशीं कांहींच न बोलतां तो सरळ राजवाड्याचा रस्ता धरून खालीं मान घालून झपझप पावलें टाकीत चालूं लागला. आणि अखेर राजवाड्यांत जाऊन शिरला.

वाड्यांत गेल्यावर तेथें सिद्धार्थाचा जो महाल होता, तेथें जाऊन त्याचें प्रथम दर्शन घेतलें. दरवाजा उघडा होता म्हणून आंत डोकावून पाहिलें, तो यशोधरा त्याच्या दृष्टीस पडली. तिनें त्यास पाहिलें.

त्याला एकट्याला पाहतांच तिचा शोकही पुन: भडकला! व डोळे अश्रूंनीं भरून आले. एकदम उठून त्याच्याजवळ जाऊन 'छन्ना? कुठं आहे माझा प्राण? कुठं आहे माझा नाथ? सांग सांग, कुठं आहे माझा प्राणनाथ?' असा टाहो फोडला!

छन्नाची गाळणच उडाली! त्याच्या तोंडांतून शब्दच निघेना! यशोधरेची ती म्लान, दीन व करुणमूर्ति पाहून त्याला वेडच लागलें! काय बोलावें नि काय सांगावें हें त्याला सुचेना नि समजेना. त्याची मति कुंठित झाली आणि जीभ लुली पडली! इतक्यांत पुन: ती कडाडली 'छन्ना! माझा सिद्धार्थ कोठें आहे? कोठें त्याला छपचून आलास? बोल, बोल! कोठें त्याला सोडून आलास?'

छन्नाला आतां रडें कोसळलें! हुंदके देत व अडखळत तो उत्तरला, 'देवि! काय बोलूं! नि काय सांगूं! देवि! तो सिद्धार्थ नव्हे. प्रत्यक्ष देव! देवाप्रमाणें तो आम्हां सर्वांना सोडून पुढें निघून गेला! वनांत निघून गेला!

**यशोधरा** :—काय? पुढें निघून गेला? वनांत निघून गेला! मला सोडून? मला फसवून? मला टाकून? देवाला हें शोभलें काय? छन्ना! तूं माझा घात केलास! माझ्या सुखावर निखारे ठेविलेस!

**छन्न** :—(रडत) नाहीं, देवि, नाहीं. यांत माझा दोष नाहीं.

**यशोधरा**:—नाहीं कसा? तूंच आम्हा सर्वांच्या दु:खाला कारण. तूं राजाज्ञा न मोडतास तर हा अनर्थ न होता.

**छन्न** :—देवि! खरोखर मी निरपराधी आहें. मला राजाज्ञा होती हें खरं. पण त्या वेळीं माझा मी नव्हतों! कोणत्या तरी अज्ञात दैवी शक्तीनं बळेंच माझ्याकडून तें काम करवून घेतलं. कंथकाला सज्ज केला खरं; पण तें कसं झालं हें मला आतां सांगतां येत नाहीं. देवि! तो सगळाच चमत्कार झाला! कंथक जमिनीवरून दौडूं लागला, पण गांवांत रस्त्यावर त्याच्या खुराचा आवाजच निघेना!

**यशोधरा**:—बरं, ही तुझी गोष्ट झाली, पण वाड्यांतील व वेशीवरील पाहरेकरी काय करीत होते ?

**छन्न** :—त्या वेळीं ते सर्व झोंपेंत घोरत पडले होते. कोणीच जागे नव्हते ! सर्वत्र अगदीं सामसूम ! ! एकजात जमिनीवर पसरलेले ! !

**यशोधरा** :—दरवाजे बंद होते ना ?

**छन्न** :—देवि, आपणाला ते खरं वाटणार नाहीं. पण सांगतोंच, घोडा जवळ गेला, तेव्हां ते देखील आपोआपच उघडले. वाड्याचे नि वेशीचे. दोन्ही ठिकाणीं असा चमत्कार घडला.

**यशोधरा**.—(कपाळाला हात लावून) माझं दुर्दैव आणखी काय !

**छन्न** :— माझ्या अंगांत कुठलं अवसान आलं होतं कोण जाणें ! कंथक सारखा दौडत चालला होता नि मी त्याचं शेपूट धरून धूम ठोकीत होतों. पण गम्मत ही कीं मला मुळींच धाप लागला नाहीं आणि थकवा आला नाहीं. हें सर्व आश्चर्यच !

ही सर्व हकीगत ऐकून यशोधरेलाहि क्षणभर विस्मय वाटला. त्या दु:खांतच तिला एक प्रकारचें समाधान झालेंसें झालें. क्षणभर ती स्तब्ध राहिली. तों इतक्यांत देवपूजा आटपून शुद्धोदन तेथें आला. छन्नाला पाहून त्यानें त्याला सिद्धार्थ कोठें आहे व कोठें गेला याविषयीं प्रश्न केले. छन्नानें सर्व घडलेली हकीगत इत्थंभूत निवेदन केली. ती सर्व ऐकून घेऊन शेवटीं विचारलें कीं आम्हांस त्यानें जातांना कांहींच निरोप दिला नाहीं कीं काय. त्याला छन्न उत्तरला ' होय, महाराज, त्यानें आपणांस निरोप दिला आहे आणि तो सांगण्यासाठींच मी परत इथं आलों आहें. नाहीं तर मीहि तिकडेच गेलों असतों. मुद्दाम त्यानें मला इकडे पाठविलें आहे.

**शुद्धोदन**:—काय म्हणाला तो ?

**छन्न**:—तो म्हणाला कीं ' पिताजीला जाऊन असें सांग कीं या मृत्यु लोकांत वियोग हा ठरलेलाच आहे. मी जरी आपल्याजवळ

राहतो, तरी आज नाहीं पुढें केव्हां तरी मृत्यु हा आपला वियोग घडवून आणता ! संसाराचा हा असा स्वभावच आहे. तेथें कोणाचें कांहींच चालण्यासारखें नाहीं. म्हणून माझा वियोग झाला म्हणून पिताजीला विवेक करून दु:ख करूं नको म्हणून सांग.

**शुद्धोदन**:—दु:ख करूं नको म्हणून म्हणाला ?

**छन्न**:—होय; महाराज ! मीं पुष्कळ विनवणी केली परत फिरण्याविषयीं पण काय, सगळें व्यर्थ. मेरूसारखा तो स्थिर राहिला. आणि वर म्हणतो काय, छन्ना ! मी जो गृहत्याग करून बाहेर जातों तो स्वर्ग मिळविण्यासाठीं नव्हे. तर संसारदु:खांतून कायमची विमुक्ति मिळविण्यासाठीं ! मी कोणावर रागावलो नाहीं, रुसलों नाहीं. किंवा तुमच्यावरचें प्रेम व भक्ति कमी झाली म्हणून नव्हे. तर फक्त दु:खमुक्तीचा मार्ग शोधून काढण्यासाठीं. छन्ना ! दु:खमुक्तीचा मार्ग शोधून काढण्यासाठीं मी जात आहें म्हणून पिताजीला नीट समजावून सांग. आणि पुन: हेंहि सांग कीं, मी कांहीं कायमचा तिकडेच जात नाहीं. मला जर सत्य ज्ञान झालें,–दु:खमुक्तीचा मार्ग सांपडला,–माझें ध्येय साध्य झालें,–तर मी पुन: कपिलवस्तूस येऊन पिताजीस भेट देईन. अवश्य देईन.

**शुद्धोदन** :—नाहीं तर ?

**छन्न** :—नाहीं तर हाच शेवटचा नमस्कार ! !

हे शब्द यशोधरेनें ऐकले न ऐकले तोंच 'हा नाथ !' असा हंबरडा फोडून ती जमिनीवर धपकन् पडली आणि बेशुद्ध झाली ! हा प्रकार पाहून वाड्यांत पुन: एकच गोंधळ व आकांत माजला ! कोणी मोठ्यानें गळा काढून रडूं लागले ! कोणी छाति पिटवून घेऊं लागले ! कोणी जमीनीवर गडबडा लोळूं लागले ! काय सांगावा तो प्रसंग ? वाड्याभर जिकडे तिकडे एकच आकांत नि एकच गोंधळ ! ! रडारड नि आरडाओरड ! ! तो प्रसंग लेखणीनें लिहून पुरवत नाहीं ! !

कपिलवस्तूवर त्या दिवशीं सर्वत्र स्मशानछाया पसरून राहिली. जिकडे तिकडे दु:खोद्गार व अश्रुपात! बाजार बंद झाला! व्यवहार थंड पडले! चुलींना अक्षता लागल्या! घरोघर दु:ख नि शोक!! 'सद्गुणनिधान सिद्धार्थ गेला! कपिलवस्तूस टाकून गेला!! राजवैभव टाकून, सुखविलासावर पाणी सोडून, प्रियजनांचा मोह आवरून, सिद्धार्थ बैरागी होऊन अरण्यांत निघून गेला!!! हाय रे देवा! राजवाडा सुना झाला!! आणि कपिलवस्तु उघडी पडली!!' अशा दु:खोद्गारांनीं ती नगरी व्याकुल व ग्रस्त होऊन गेली!! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ती सबंध कपिलवस्तु शोकसागरांत बुडून गेली! राम अयोध्येतून गेला तेव्हां अयोध्यावासी जनांना जें दु:ख झालें तेंच आतां कपिलवस्तूस झालें! आणि दशरथाप्रमाणेंच शुद्धोदनहि विरहानें व्याकुल व दु:खानें भ्रांत झाला!!

---

## मी तपश्चर्येसाठीं जात आहें.

पब्बज्जासुत्त. ( सुत्तनिपात ३–१ )

मगधदेशाधिपति बिंबसाराच्या राजधानींत म्हणजे राजगृहांत एक तरुण भिक्षु भिक्षा मिळविण्यासाठीं म्हणून राजरस्त्यावरून चालला होता. तो फार देखणा होता. रस्त्यावरून चालला असतांना दृष्टि खालीं रोखून तो धिमे धिमे पाऊल टाकीत चालला होता. तेथील राजानें त्यास रस्त्यावरून जात असतांना आपल्या प्रासादावरून सहज पाहिलें. तेव्हां त्याला तो कोण असावा हें समजून घेण्याची इच्छा झाली.

राजानें लागलीच दूतांस हाक मारून म्हटलें कीं 'अरे, तो भिक्षु रस्त्यावरून चालला आहे. तो पाहा. तो कोठें जातो, कोठें राहतो, काय करतो, हें त्याच्या मागोमाग जाऊन पाहून मला त्याची खबर द्या.'

याप्रमाणें राजाज्ञा होतांच ते दूत तेथून निघून त्या भिक्षूच्या मागोमाग जाऊन त्याला नकळत त्याचा पाठलाग करीत चालले. तो भिक्षु घरोघर जाऊन आपणास पुरेशी भिक्षा मिळवून नगरांतून बाहेर झपझप पावलें टाकीत वस्तीसाठीं पांडवपर्वताजवळ आला.

तेथें आल्यावर विश्रांतिस्तव तो तेथें एका प्रशांत स्थानीं बसला. ते राजदूतहि कांहींशा अंतरावर त्याची पाळत करीत बाजूस जाऊन बसले व आपल्या पैकीं एकाला त्यांनीं ही खबर बिंबसारास पोंचविण्याला वाड्याकडे पाठवून दिलें.

दूतानें येऊन ही हकीकत राजाला कळविली. ती ऐकून लागलीच तो तेथून उठला व रथांत बसून पांडवपर्वताकडे निघाला. रथाचा रस्ता संपल्यावर पुढें पायवाट लागली. म्हणून त्यांतून उतरून पायीं चालतच तो त्या भिक्षूपाशीं आला. तेथें आल्यावर त्याच्याजवळ जाऊन बसून प्रथम त्याला कुशल प्रश्न वगैरे विचारून मग तो त्याला म्हणाला, हे भिक्षो ! तूं कोण आहेस ? मला तुझी हकीकत ऐकावीशी वाटते. सांगशील का ? दिसावयास जवान तरुण दिसतोस. तुझी मुद्रा भव्य व तेजस्वी आहे. तोंडावर कुलीन क्षत्रियाचें सुंदर पाणी चमकत आहे. मग तूं कोण आहेस हें सांगशील का ? अशा वयांत सुखाचा संसार सोडून, डोकें मुंडून, भिक्षापात्र घेऊन वणवण फिरत हिंडणें हें तुझ्यासारख्या तेजस्वी तरुणाला शोभत नाहीं. इच्छा असल्यास हा वेष टाक नि माझ्याजवळ राहा. मी तुला आश्रय देऊन जन्माचा सुखी करतों. माझ्या हस्तीदलाचा नायक होऊन इथें वास्तव्य कर. तुला पुष्कळ संपत्ति व धनदौलत देतों. त्याचा स्वीकार करून सुंदर तरुणीशीं विवाह करून, चांगला संसार थाटून माझ्याजवळ रहा. आता मला तुझें नांवगांव कळल्यास फार आनंद होईल. मग सांगशील का ?

भिक्षु:—राजा ! या तुझ्या थोर औदर्याबद्दल मी तुझा फार आभारी आहे. आतां माझा इतिहास सांगतों तो ऐक. हिमाल-

याच्या पायथ्याशीं धनानें व वीर्यानें सुसंपन्न असा एक सुंदर देश आहे.

राजा:—त्याचें नांव काय ?

भिक्षु:—त्याचें नांव शाक्यराष्ट्र आहे.

राजा:—तेथील तूं कोण ?

भिक्षु:—तेथील महाजनाचें–म्हणजे माझ्या वडिलाचें–नांव शुद्धोदन असून त्याचा मी ज्येष्ठ पुत्र आहें. माझें गोत्र आदित्य ( आदिच्च ) असून मला गोतम असें म्हणतात. माझा बाप शाक्यांचा राजा असून तो कपिलवस्तु इथें राहतो.

राजा:—मग तूं राजपुत्र म्हणावयाचा ! जातीनें तूं क्षत्रिय आहेस. होय ना ?

भिक्षु:—होय, राजा, मी क्षत्रिय आहे.

राजा:—मग हा भिक्षूचा वेष काय म्हणून धारण केलास ? असा काय प्रसंग तुजवर आला, कीं तूं राजवाडा सोडून हा भिक्षूचा वेष धारण करावास ? घरीं बापाशीं भांडण–बिंडण तर झालें नाहीं ना ?

भिक्षु:—नाहीं, राजा, नाहीं. मी कोणाशीं भांडलो नाहीं व माझ्याशीं कोणी भाडलें नाहीं.

राजा:—मग घर सोडण्याचें कारण ?

भिक्षु:—राजा, मी आपखुषीनें ही भिक्षुवृत्ति पत्करिली आहे. कोणाशीं भांडून तंडून नव्हे.

राजा:—घरीं बायको नाहीं तुझी ?

भिक्षु:—आहे. राजा, बायको आहे माझी. ती कोळिय राजाची कन्या असून यशोधरा म्हणतात तिला. तिच्याशीं माझा विवाह झाला आहे. शिवाय एक मुलगाहि आहे मला.

राजा:—मग इतकें असून गृहत्याग केलास तूं !

भिक्षु:—राजा, राजोपभोगांत–कामोपभोगांत–सुखोपभोगांत–स्वारस्य दिसलें नाहीं मला. या प्रपंचांत मन रमलें नाहीं माझें. तेथें मला सगळे दोषच दोष दिसले. या संसाराचा कंटाळा आला मला आणि म्हणून गृहत्याग करून संसारनिवृत्त झालों आहे मी. सर्वसंग परित्याग करून सन्यस्त वृत्तीनें एकांतांत राहणें हेंच सुखाचें वाटतें मला. म्हणून राजा, प्रंपचत्याग करून भिक्षु झालो आहे !

राजा:—मग तुला माझी विनंति मान्य होण्यासारखी नाहीं तर? पण, भिक्षो, संसारनिवृत्त होण्याचें हें तुझें वय व शील नव्हे. भिक्षु होऊन घरोघर भिक्षा मागत हिंडणें हा क्षत्रियांचा धर्म नव्हे ! माझें ऐक. हा भिक्षूचा वेष टाकून दे !

भिक्षु:—नाहीं, राजा, नाहीं. तसें मला आतां करतां येत नाहीं. मी संसाराला विटलों आहे. घर म्हणजे एक अडचणीची जागा आहे अशी माझी खात्री झाली आहे. तेथें स्वातंत्र्य नाहीं, पारतंत्र्य आहे; सुख नाहीं, दुःख आहे; स्वास्थ्य नाहीं, भगभग आहे ! आणि मला तें नको आहे. स्वतंत्र राहून एकांत वासांत व ज्ञानार्जनांत दिवस काढणें हेंच मला अधिक आवडतें.

राजा:—मग आतां कुठं चाललास तूं ?

भिक्षु:—मी आतां तपश्चर्येला चाललों आहे. त्या मार्गातच माझें मन रमतें. म्हणून राजा, मला तुझा शब्द मान्य करतां येत नाहीं. मला आतां कांहीं नको. फक्त एक धर्मज्ञान–सत्यज्ञान–तेवढें पाहिजे आहे. त्यासाठीं मी फिरत आहें.' हें त्याचें भाषण ऐकून राजाचा निरुपाय झाला व आला तसा तेथून तो निघून चालता झाला. अर्थात् तो भिक्षु म्हणजे गोतम हें सांगण्याचें आतां कारण नाहीं.

---

# बौद्धकालीन मतमतांचा गलबला

सामञ्ञफलसुत्त. ( दीघनिकाय २ )

आतां पुढें जाण्यापूर्वी गोतमाच्या वेळीं भरतखंडांत धार्मिक व तात्त्विक विचारांची काय परिस्थिति होती याचा थोडासा आढावा घेणें हें येथें जरूर असल्यामुळें त्याचा आतां थोडक्यांत परामर्श घेतों. बुद्धाच्या वेळीं वैदिक धर्म सर्वत्र अस्तित्वांत व प्रचारांत असला, तरी यज्ञसंस्थेवर तत्कालीन वैदिकेतर मतस्थापकांचा व प्रवर्तकांचा फार मोठा कटाक्ष होता. त्या सर्वांनीं त्या संस्थेवर फार मोठा हल्ला चढवून सामान्य जनतेची तद्विषयक असलेली पूज्य व आदरबुद्धि उखडून काढण्याची जोराची खळबळ व चळवळ चालविली होती. याचें कारण आमच्या मतें असें असावें कीं त्यावेळी यज्ञाला आलेलें हीन व विकृत स्वरूप.

उदाहरणार्थ तेथें होणारी अपार पशुहिंसा. कोसलचा राजा प्रसेनजित् यानें एक मोठा यज्ञ करण्याचें ठरवून त्यांत मारण्यासाठीं पांचशें बैल, पांचशे गोहरे, पांचशें कालवडी, पांचशे बकरे व पांचशें बोकड आणून यज्ञमंडपांत यूपास नियुक्त करण्यांत आले होते. त्या यज्ञाला ‘ महायज्ञ ’ असें नांव होतें. त्याचप्रमाणें उग्गतसीर ब्राह्मणानें त्याच नांवाच्या यज्ञांत तितकेच पशु यूपास नियुक्त केले होते. अशा प्रकारची माहिती बौद्ध ग्रंथांतून आढळते. पण वैदिकांचे यज्ञग्रंथ चाळले, तर असा प्रकार तेथें मुळींच दिसत नाहीं. एक अश्वमेध सोडून दिला, तर इतर यज्ञांत ही संख्या फार थोडी आहे व ती अगदीं हिशोबी आहे. शतपथांत–वैदिकांच्या प्रमुख धर्मग्रंथांत–तर ‘ महायज्ञ ’ नांवाचा यज्ञच नाहीं ! मग तो बुद्ध काळीं कसा व कोठून आला हें श्रीहरिच जाणे ! वैदिक यज्ञाची बदनामी करण्या करितां तर या कथा बौद्धाचार्यांनीं त्रिपिटकांत आपल्या अधिकारांत घुसडून दिल्या नसतील ना, असा संशय वैदिकांस येणें अगदीं स्वाभाविक आहे. असो.

काय असेल तें असो, मात्र त्यावेळच्या वाङ्मयावरून पाहतां वैदिक धर्मास विकृत व हीन स्वरूप प्राप्त झालें असावें असें म्हणणें प्राप्त होतें. एकंदरींत, कारण काय असेल तें असो, वैदिक धर्म प्रचारांत होता तरी त्याविषयींची आदर बुद्धि लोकांची घसरणीस लागली होती हें मात्र मान्य करणें भाग आहे. याचें कारण वैदिक धर्माशिवाय इतर अनेक पंथांचें जाळें त्या वेळीं इतस्ततः चांगले पसरून राहिले होते, असें ब्रह्मजाल सुत्तावरून दिसून येतें. त्यांपैकी आजीवक, निर्ग्रंथ, परिव्राजक, चार्वाक इत्यादि अनेक अवैदिक पंथ चांगलेच रुजून बसले होते. त्यांची वाचकांस थोडक्यांत कल्पना यावी म्हणून त्या त्या पंथाच्या तत्कालीन मुख्य मुख्य आचार्यांची व त्यांच्या मतांची सारांश रूपानें माहिती देतों.

१ पूर्ण काश्यप बुद्धः—हा एक त्या वेळीं मोठा तीर्थंकर होता. हा मूळचा दासीपुत्र. तो एका सरदाराच्या घरीं परमुलखांतून आलेल्या एका दासीच्या उदरीं जन्मला, तरी तो आपणास ब्राह्मण म्हणवीत असे. त्याच्या जन्मानें त्याच्या मालकाच्या घरीं असलेल्या गुलामांची संख्या पूर्ण शंभर भरली म्हणून त्याला पूर्ण हें नांव पडलें. त्याला त्याच्या मालकानें रखवालदाराचें काम दिलें होतें, पण तें त्यास पसंत न पडल्या-मुळें नाराज होऊन तो तेथून पळून गेला. दुसऱ्या गांवीं जात असतां वाटेंत चोरांनीं पकडून त्याला सर्वस्वी नागविलें. तें इतकें कीं त्याच्या अंगावरचें वस्त्रसुद्धां राहिलें नाहीं. नग्न स्थितींतच तो पळत सुटला. पुढें एका गांवीं गेल्यावर लोकांनी ती नग्नस्थिति झांकण्या-करितां वस्त्र देऊं केलें, पण त्याचा स्वीकार न करतां तो नग्नच राहूं व फिरूं लागला. तो म्हणे कीं ज्यानें पाप केलें असेल त्यानें तें झांकण्या-करितां पाहिजे तर वस्त्र धारण करावें. मीं तर कांहींच पाप केलें नाहीं. मग मला लाज कसली नि कोणाची? पापी मनुष्याला लाज असते व

वाटते व ती लपविण्यासाठीं तो वस्त्र धारण करतो. मी तर निष्पाप आहें! अर्हत् आहें! बुद्ध आहें! मग मला वस्त्राची जरूरी काय?

हा अट्टल अक्रियावादी होता. याच्या मतें शून्यता हीच जगांतील मुख्य व मूळ वस्तु होती. राजा व प्रजा, बाप व लेक, ब्राह्मण व शूद्र असलीं नैतिक पण कृत्रिम बंधनें त्यास निरर्थक वाटत होतीं. कर्मावर त्याचा मुळींच विश्वास नव्हता. अर्थात तो अक्रियावादी होता.

२ **मखली गोशाल** :—हा एका सरदाराच्या घरचा गुलाम होता. याच्या आईचें नांव मखली असें होतें व तो गोशाळेंत जन्मला म्हणून त्याचें नांव मखली गोशाल असें पडलें. एके दिवशीं हा तेलाचें भांडें घेऊन घरीं जात असतां मध्यें वाटेंतच त्याचा पाय घसरून तें हातांतलें भांडें निसटून खालीं पडलें. मालक मागें होताच. त्यास भिऊन तो तसाच तेथून पळत सुटला. मालकानें त्याचा पाठलाग करून त्याचें वस्त्र पकडलें. तेव्हां तें वस्त्र तेथेंच टाकून देऊन तो तसाच पुढें नग्न स्थितींतच पळत सुटला. पुढें एका गांवांत येऊन आपण दिगंबर जिन आहों असें लोकांस सांगत सुटला. पुढें कांहीं दिवसांनंतर जैन धर्माची भूमिका सोडून देऊन आजीवक पंथाचा म्हणजे चार्वाक पंथाचा एक मुख्य आचार्य झाला. त्यानें काढलेल्या आजीवक पंथास मखली गोशाल हें नांव प्राप्त झालें.

आजीवक पंथाचें मत असें होतें कीं त्या लोकांना आत्म्याचें अस्तित्व मुळींच कबूल नव्हतें. तसेंच कर्मवादहि मान्य नव्हता. पाप-पुण्य हें सगळें थोतांड असून सत्कर्मानें सद्गति मिळते व पाप-कर्मानें दुर्गति लाभते, हा सिद्धांत त्यास पटत नव्हता. मनुष्याला या जन्मीं जें सुखदुःख प्राप्त होतें त्याला कारण पूर्वार्जित कर्म नसून ती एक निसर्गघटित योजना आहे. जें व्हावयाचें तें अगोदरच ठरलेलें असून तें कोणाला कांहीं करूनही चुकवितां येत नाहीं. अर्थात् कर्माचा कांहीं एक उपयोग नाहीं. ‘ न अत्थि कम्मम् ’ -कर्म नाहीं-, ‘ न अत्थि

किरियम् '- न अत्थि विरियन् ति '- हे या पंथाचे धर्म-सिद्धांत होत. म्हणजे हा पंथ नियतवादी होता; तसाच पण अक्रियावादीहि होता. आयुष्यांत जें काय घडतें त्याला कारण कर्म नसून दैव, परिस्थिति व ज्याचा त्याचा प्रकृतिस्वभाव हेंच आहे असें ठासून सांगण्यास तो कमी करीत नसे.

३ **अजित केशकंबल** :—हा एका सरदाराचा नोकर होता. त्यास पुष्कळ कर्ज झाल्यामुळें सावकाराचा त्रास व उपद्रव चुकविण्यासाठीं तो गांव सोडून फरारी झाला. पुढें त्यास निर्वाहाचें सरळ साधन उपलब्ध नसल्यामुळें डोकें मुंडून व केसाचें कांबळे पांघरून घेऊन लोकांस उपदेश करण्याची भूमिका पत्करली. अंगावर कांबळें घेऊन लोकांस उपदेश करण्याची प्रथा स्वीकारल्यामुळें लोक त्यास अजित केशकंबल नांवानें ओळखूं लागले.

हा वैदिक धर्माचा कट्टा विरोधक व प्रतिस्पर्धी होता. पाप-पुण्य, स्वर्गलोक व नरकलोक व त्याचप्रमाणें कर्मसिद्धांत या गोष्टी तो मुळींच मानीत नसे. कर्मावर पापपुण्य व सुखदुःख मुळींच अवलंबून नाहींत असें तो ठासून सांगे. पूर्वजन्म व पुनर्जन्म यांवर त्याचा मुळींच विश्वास नव्हता. तो जहाल जडवादी होता. जीव असा स्वतंत्र पदार्थ नसून तो जडाचाच एक भाग व खेळ आहे—' तं जीवं तं सरीरं '— असें तो चक्क सांगत फिरे. नेम धर्म सब झूट असून मेल्यावर मनुष्याचें मागें कांहींच राहत नाहीं ! ' भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनो कुतः ? अशा प्रकारचें त्याचें तत्त्वज्ञान होतें. अर्थात् हा अक्रियावादी व तसाच जडवादीहि होता. जडवादालाच बौद्धधर्मांत उच्छेदवाद हें नांव आहे.

४ **ककुध कात्यायन** :—याची उत्पत्ति जार कर्मापासून झाली होती. याची आई गरीब व हीन जातींतील एक विधवा असून तिला राहावयास घर देखील नव्हतें. तो ककुध झाडाखालीं जन्मला व पुढें

बरेवाईट भोग वारंवार भोगावे लागतात. म्हणून सत्यज्ञान करून घेऊन कर्माचा नाश करावा. संसाराचें यथार्थ स्वरूप ओळखावयाचें तर तें सम्यक् ज्ञान, सम्यक् आचरण व सम्यक् श्रद्धा यांच्या मदतीनें व देहदंडणानें करून घेतलें पाहिजे आणि म्हणून मनुष्यानें त्यांचा आश्रय करावा. सत्यज्ञानाचा प्रभाव असा आहे कीं त्यापासून कर्माचा नाश होतो. आणि कर्माचा नाश झाला म्हणजे जिवाची संसारदशा संपून अखेर जिवाचा तो जिन बनतो. जैनाची मुक्ति ती हीच! जिवाचा जिन होणें!! हें घडून यावयास अहिंसा, सूनृत, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या पंचयामाचें—म्हणजे महाव्रताचें—आचरण करणें जरूर आहे. पूर्वीं जैन धर्म चतुर्यामात्मक होता. महावीराने त्यांत शेवटचा याम-म्हणजे अपरिग्रह—घालून तो पंचयामात्मक केला. महावीर यानें नवीन पंथ स्थापन केला नाहीं. फक्त त्याला पांचवा याम जोडून त्यांत सुधारणा केली. तो दिगंबर म्हणजे नग्न स्थितींत फिरत असे. तो तीर्थंकर असून जिन असेंहि त्यास म्हटलें आहे. हा बुद्धाचा मोठा प्रतिस्पर्धी होता. असो.

६ **संजय** :—याचें डोकें मोठें विलक्षण होतें. त्यानें निरनिराळया शास्त्रांचा अभ्यास करून आपल्या ज्ञानांत चांगली भर घातली होती. आपण बुद्ध आहों असा लोकांत पुकारा करून त्यानें पुष्कळ अनुयायी मिळविले होते. या जन्मांत प्राण्याला जी योनि प्राप्त झाली असेल तीच योनि पुढील जन्मीहि प्राप्त होते. मनुष्यास 'बोधि अगर मुक्ति' शोधून काढण्याचें कारण नाहीं. ऐशीं हजार कल्पें संपतांच ती आपोआपच प्राप्त होते, असें त्याचें मत होतें.

७ **परिव्राजक** :—हे लोक बैराग्याप्रमाणें असून गांवोगांव हिंडून लोकांना नीतिशास्त्र व तत्त्वज्ञान शिकवीत. हे कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळीत. त्यांच्यांत कांहीं स्त्रियाहि होत्या. अहिंसा, सत्य, इंद्रियनिग्रह, शुद्धविचार, संतोषवृत्ति, साधेपणा, आस्तिक्यबुद्धि, विद्याभ्यास,

निःस्पृहता, समाधानवृत्ति, गुरुसेवा, आदरभाव, क्षमाशीलता, ध्यान-धारणा, प्राणायाम, प्रार्थना, आत्मज्ञान इत्यादि बाबतींत ते मोठे तरबेज असत. यांत बहुतेक ब्राह्मण असून ते सर्व अग्नि-उपासक होते. क्वचित ब्राम्हणेतरांतहि असे लोक आढळत. पण त्यांची प्रसिद्धी फार नव्हती. या परिव्राजकांपैकीं पुष्कळ परिव्राजकांची पुढें बुद्धाबरोबर नैतिक, धार्मिक व आत्मिक विषयांवर पुष्कळ चर्चा व वादविवाद झाले आहेत. एकंदरींत त्या काळीं परिव्राजकांचें प्रस्थही लोकांत चांगलें दृढमूल होऊन राहिलें होतें. या पंथाचें थोडक्यांत मत सांगावयाचें म्हणजे सम्यक् ज्ञान, सम्यक् वर्तन व सम्यक् श्रद्धा या त्रयीच्या जोरावर मनुष्याचें खरें व शाश्वतसुख अवलंबून आहे, असा त्याचा निष्कर्ष सांगतां येईल.

याशिवाय आणखी अनेक किरकोळ सांप्रदाय होते. त्या सर्वांचा उल्लेख येथें करण्याचें कारण नाहीं. ज्यांना त्याची माहिती पाहिजे असेल, त्यांनी दीघनिकायांतील ब्रह्मजाल सुत्त पाहवें. म्हणजे त्या-काळीं धर्ममताची कशी खिचडी झाली होती व जनमनांत किती गोंधळ माजून राहिला होता, याची थोडीशी कल्पना येईल. असो. तूर्त हें इतकें विवेचन आमच्या प्रस्तुत कार्यास पुरेसें आहे. इतकें सांगून आतां पुढील कथानकाकडे वळतों.

---

## तत्त्वशोधन

अश्वघोष व पासरासिसुत्त २६ ( मज्झिमनिकाय )

मगध देशांत आलार कलाम नांवाचा एक प्रख्यात विद्वान आचार्य होता. तो चांगला वेदाध्ययनसंपन्न असून आत्मविद्येंतहि त्याची मोठी ख्याति होती. शिवाय समाधियोगहि त्यास चांगला अवगत होता. म्हणून त्याच्याजवळ विविध विषयांच्या अध्ययनार्थ म्हणून शेंकडो विद्यार्थी येऊन राहिले होते. या विद्वान आचार्याची कीर्ति सिद्धार्थाला पूर्वींच ऐकून माहित होती. तेव्हां त्याचेकडे जाऊन व राहून त्याच्यापासूनच ज्ञानप्राप्ति करून घ्यावी या हेतूनें तो राजगृहांतून निघाल्यावर या कलामाश्रमांत आला.

आलार कलामानें त्यास प्रेमपूर्वक जवळ ठेवून घेतलें व आपल्याजवळ असलेलें सर्व तत्त्वज्ञान त्यास सांगितलें व शिकविलें. आत्मा कसा जन्मतो व कसा जातो, कर्मगति कशी विचित्र व प्रभावी आहे, दुष्ट लोक नरकांत कां व कसे जातात व पुण्यवान लोक स्वर्गांत कसे राहतात, यज्ञ, दान, तप करणारे लोक पुढील जन्मीं राजे अगर ब्राह्मण अगर देव कसे होतात, हा सर्व कर्मविपाक त्यास नीट समजावून सांगितला.

तसेंच आत्मा म्हणजे काय, तो शरीरांत कोठें व कसा राहतो, शरीरधर्म कसे चालतात व कोणामुळें चालतात याचें ज्ञानहि त्यास करून दिलें. शिवाय या तत्त्वज्ञानाबरोबरच समाधिविद्याहि त्यास शिकविली. हें सर्वज्ञान सिद्धार्थानें समजून घेतलें; पण त्यापासून त्यास व्हावें तसें समाधान झालें नाहीं. तें ज्ञान त्यास अपुरें वाटलें म्हणून पुढील ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं तो तेथून बाहेर पडला.

आतां तो रुद्रक रामपुत्त आचार्याजवळ आला. तोहि चांगला विद्वान व योगनिष्ठ ब्राम्हण होता. त्याच्याजवळ समाधिविद्या कलामापेक्षां अधिक होती. आलार कलामाजवळ समाधिविद्या फक्त ' अकिंचन्या-

यतन ' पर्यंतच होती व तेवढी त्यानें संचय करून घेतली होती. पुढील ज्ञान कलामाजवळ नव्हतें. तें या रुद्रकाजवळ होतें. म्हणून तो येथें येऊन राहिला व समाधीचें पुढील ज्ञान-म्हणजे नैवसंज्ञानासंज्ञा नांवाची आठवी पायरी-प्राप्त करून घेण्याच्या उद्योगास लागला. पुढें तेंहि ज्ञान त्यानें मिळविलें व रुद्रकाचा कर्मसिध्दांतही पटवून घेतला. मात्र तें कर्म करणाऱ्या आत्म्याचें अस्तित्व तेवढें त्यास अखेरपर्यंत पटलें नाहीं!

त्याच्या मनानें असें घेतलें कीं आत्मा जर खरा असेल तर मनुष्याची दु:खांतून मुक्तता होणें शक्यच नाहीं. यज्ञोपासना ही मनुष्याचें दु:ख चुकवील हें सत्य नाहीं. अज्ञानामुळेंच मनुष्य देव मानतो व त्याला भजतो. पण ही देवोपासना प्रभावी नाहीं. यज्ञांत पशू मारून देवसंतर्पण करण्यापेक्षां सत्योपासना करणें हेंच अधिक श्रेयस्कर होय. पशूचा वध मनुष्याचे दोष कसे घालवील? छे छे, तें शक्यच नाहीं. अंत:करण शुद्ध व पवित्र राखणे व हिंसा न करणे हाच खरा धर्म होय! वेदमंत्र प्रभावी नाहींत, देवोपासना व्यर्थ आहे, वेद पठणांत सामर्थ्य नाहीं! आशा व आसक्ति सोडून देणें, दुष्ट विकारापासून अलिप्त राहणें, द्वेष व तिरस्कार यांचा त्याग करणे, मनुष्याची पाशवी वृत्ति नष्ट करणे, हाच खरा यज्ञ होय.

रुद्रक रामपुत्ताजवळचें सगळें देवताज्ञान व तत्त्वज्ञान प्राप्त करून घेतल्यावर व समाधीची आठवी पायरी साध्य झाल्यावर पुढील प्रगतीची त्याला तेथें आशा राहिली नाहीं. म्हणून तेथून तळ हलविण्याचा आतां त्यानें विचार केला. आणि ही गोष्ट त्यानें आपल्या पंचवर्गीय मित्राजवळ काढली.

या रुद्रक रामपुत्ताजवळहि अनेक विद्यार्थी होते. त्यांत कौण्डिण्य, वप्प, भद्रिय, महानाम व अश्वजित हे पांच ब्राह्मण विद्यार्थी सत्य धर्म समजून घेण्याच्या इराद्यानें तेथें येऊन राहिले होते. त्यांची व सिद्धा-

र्थाची चांगली गट्टी जमली होती. प्रसंग साधून सिद्धार्थानें आपण बाहेर पडण्याची त्यांच्यापुढें गोष्ट काढली व तेहि त्याच्याबरोबर निघावयास तयार झाले. पुढें सिद्धार्थास तत्त्वबोध झाला तर तो त्यानें त्यांस सांगावा असें बोलणें होऊन पुढें तपश्चर्येच्या वेळीं त्यांनीं त्याची सेवा करावी असें ठरलें.

त्याप्रमाणें त्या पंचवर्गीय भिक्षूंना बरोबर घेऊन, स्वतंत्र रीतीनें तपश्चर्या करून सत्यज्ञान शोधून काढण्यासाठीं म्हणून आतां तो सिद्धार्थ त्या आश्रमांतूनहि बाहेर पडला.

याविषयीं बुद्धाचे मज्झिमनिकायांत उद्गार आढळतात ते असेः—'हे बोधिराज कुमारा ! मी आलार कलामाजवळून निघून पुढें उद्दक रामपुत्ताजवळ आलों. तेथें आल्यावर धर्मविनयांत मी आपल्याजवळ राहून ब्रह्मचर्य पालन करूं इच्छितों असें त्यास म्हटलें. व त्यानें माझी विनंति मान्य करून, मला आपल्याजवळ ठेवून घेऊन, जवळ होतें तेवढें सर्वहि धर्मज्ञान मला दिलें. त्याचप्रमाणें 'नैवसंज्ञा-नासंज्ञायतन' पर्यंतचें समाधिज्ञानहिं करून दिलें. पण तेवढ्यानें माझें समाधान झालें नाहीं. जशी उद्दक रामपुत्ताजवळ श्रद्धा आहे तशीच ती मजजवळहि आहे, त्याचेजवळ जसें वीर्य आहे तसेंच तें मजजवळहि आहे, त्याचेजवळ जशी स्मृति आहे, तशी ती मजजवळहि आहे. तेव्हां माझ्या मनांत हा विचार आला कीं जो धर्म उद्दक रामपुत्त स्वतः जाणून, साक्षात्कार पावून, विहार करतो असें म्हणतो त्या धर्माचा साक्षात्कार करून घेण्याचा उद्योग मी स्वतः कां करूं नये ? असा विचार करून त्याप्रमाणें वागून मीं तो धर्म प्राप्त करून घेतला. हें पाहून उद्दकानें मला आपल्या बरोबरीचें स्थान देऊन, माझा मोठा गौरव करून माझा सत्कार केला. तेव्हां मला असें झालें कीं हा धर्म कांहीं बरोबर नाहीं. त्यानें मनाची कायमची शांति व तृप्ति होणें नाहीं. तो अपूर्ण आहे. असें समजून मी पुढील ज्ञान संपादन करण्यास म्हणून तेथूनहि निघून बाहेर पडलो'. ( बोधिराजकुमारसुत्त, मज्झिमनिकाय )

# पूर्वतयारी

बोधिराजकुमार सुत्त ८५

(मज्झिमनिकाय)

आतां दुसरीकडे राहून ज्ञान मिळविण्याचा हव्यास न धरतां स्वतः तपश्चर्या करून तें स्वतःच प्राप्त करून घ्यावें असा विचार करून त्याप्रमाणें तपाचरण करण्याचा आपला बेत त्यानें कायम केला. या वेळीं त्याची कायिक व मानसिक स्थिति कशी होती हें पुढें त्यानेंच बुद्ध झाल्यावर एकाप्रसंगी बोधिराजकुमार यास सांगितलें आहे. तें मननीय असल्यामुळें त्याचा येथें अनुवाद करतों म्हणजे झालें.

याचा उल्लेख बोधिराजकुमार सुत्तांत आला आहे. तेथें बुद्ध भगवान म्हणतातः–हे बोधिराजकुमारा ! एखादें लांकूड ओलें असून पाण्यांत पडून भिजलेलें आहे. असलें ओलें लांकूड घेऊन त्यावर उत्तरारणि ठेऊन घुसळून त्यांतून कोणी अग्नि उत्पन्न करूं लागला तर त्या मंथनापासून अग्नि उत्पन्न होईल काय ?

**राजकुमार** :—नाहीं, भगवन्, त्यापासून अग्नि उत्पन्न होणार नाहीं.

बुद्ध :—कां ?

**राजकुमार** :—तें लाकूड ओलें व तशांत भिजलेलें आहें म्हणून. ते मंथनाचे सर्व प्रयत्न फुकट होत. आयास मात्र खरे.

बुद्ध :—त्याचप्रमाणें हे बोधिराजकुमारा ! जे कोणी श्रमण अगर ब्राह्मण शरीरानें व मनानें कामोपभोगापासून अलिप्त झाले नाहींत आणि ज्यांचा कामविकार शांत झाला नाहीं अशांनीं कितीहि तप केलें नि कष्ट भोगिले तरी ते व्यर्थच ! कारण अशा कामुक माणसांनीं कितीहि तपश्चर्या केली व कष्ट सोशिले, तरी त्यांची खरी ज्ञानदृष्टि उजळावयाची नाहीं. संबोधि तर मुळीं होणेंच नाहीं. ही पहिली उपमा. आतां यापुढची दुसरी सुचली ती ही.

**राजकुमार** :—म्हणजे कोणती ?

**बुद्ध** :—एखादें लांकूड पाण्यापासून दूर पडलें आहे, म्हणजे भिज-लेलें नाहीं, पण तें ओलें आहे आणि एखादा मनुष्य त्यावर उत्तरारणि ठेवून मारे मंथन करीत आहे, तर त्यापासून अग्नि निर्माण होईल काय ?

**राजकुमार** :—हें कसें शक्य आहे, भदंत ? नाहीं. त्यांतूनहि अग्नि निर्माण होऊं शकणार नाहीं. येथेंहि त्याचे सर्व श्रम व्यर्थच होत.

**बुद्ध** :—कां ?

**राजकुमार** :—तें लांकूड ओलें आहे म्हणून.

**बुद्ध** :—त्याचप्रमाणें हे बोधिराजकुमारा ! जे श्रमण व ब्राह्मण कामोपभोगापासून शरीरानें अलिप्त राहतात, पण ज्यांच्या मनांतील कामविकार अजीबात शमन पावलेले नाहींत, नष्ट झालेले नाहींत, अशांनीं किती जरी तपाचरण केलें व कष्ट सोशिले, तरी त्यापासून त्यांना ज्ञान-दृष्टि प्राप्त व्हावयाची नाहीं. आणि संबोधिचें नांव तर नकोच नको ! ही दुसरी उपमा झाली. आतां तिसरी ऐक.

**राजकुमार** :—ती कोणती ?

**बुद्ध** :—ती म्हणजे ही. एखादें लांकूड पाण्यापासून दूर पडलें आहे आणि तें कडकडीत वाळलेलें आहे. अशा लांकडावर मंथा ठेऊन अग्निमंथन करूं लागलें तर त्यापासून अग्नि निर्माण होईल कीं नाहीं ?

**राजकुमार** :—हें काय विचारायचें, भगवन् ? खात्रीनें तेथें अग्नि उत्पन्न होईल. अगदी जरूर.

**बुद्ध** :—कारण ?

**राजकुमार** :—कारण तें लाकूड ओलें नसून चांगलें वाळलेलें आहे. शिवाय आणखी तें पाण्यांत पडून भिजलेलें नाहीं. मग अग्नि कां नाहीं निर्माण होणार ?

बुद्ध :—त्याचप्रमाणें, हे बोधिराजकुमारा ! जे श्रमण व ब्राह्मण शरीरानें व मनानें कामोपभोगापासून अलिप्त आहेत व ज्यांच्या मनांतील कामविकार सगळे नष्ट व निर्मूल झाले आहेत, अशांनीं शरीराला कष्ट दिले काय, न दिले काय, ज्ञानदृष्टि त्यांना लाभणें हें सहज शक्य आहे.

या तीन उपमांवरून घ्यावयाचा बोध इतकाच कीं कामोपभोगापासून शरीर व मन अलग व अलिप्त ठेविल्याशिवाय व मनांतील एकंदर कामविकारांचें संपूर्ण निर्मूलन केल्याशिवाय मनुष्याला सत्यज्ञान व परमशांति लाभेल ही गोष्ट सहसा शक्य नाहीं. याप्रमाणें विचार करून बुद्धानें प्रथम सर्व संसारोपभोगांचा त्याग व कामविकारांचें निर्मूलन करूनच मग तत्त्वशोधनाचें व तपश्चर्येचें कंकण बांधलें. अर्थात् वरील ज्या तीन उपमा बुद्धानें लांकडाच्या दिल्या आहेत, त्या त्याच्या तपश्चर्येच्या वेळची त्याची कायिक, मानसिक व बौद्धिक स्थिति कशी व किती निकोप व खंबीर होती, याचें निदर्शक आहेत. असो.

---

## तपश्चर्या

बोधिराजकुमार सुत्त ८५ ( मज्झिमनिकाय )

रुद्रक रामपुत्ताच्या आश्रमांतून बाहेर पडल्यावर सिद्धार्थ हा तेथून फिरत फिरत कांहीं दिवसांनीं गयाशीर्ष पर्वतावर येऊन पोंचला. तेथें आल्यावर एकांतांत बसून विचार करीत असतां त्याला असें सुचलें कीं प्रज्ञालाभ व्हावयाचा तर त्यास तपश्चर्या करावयास हवी. त्याशिवाय ती गोष्ट साध्य होणें शक्य नाहीं. म्हणून आतां तो तपश्चर्येसाठीं एकादें शांत व प्रशस्त स्थान शोधावयास लागला.

त्यासाठीं तो इकडे तिकडे फिरत असतां उरुवेला प्रदेशांत आला. तेथें त्यास सेनानिगम हें स्थान आढळलें व तें त्यास फार आवडलें.

स्थान मोठें सुंदर व निवांत होतें. सभोंवतीं वृक्षराजी घनदाट पसरली असून मधून नैरंजरा ( फल्गु ) नदी मंद व मधुर वाहत होती. दोन्ही तीरांवर सफेत वाळवंट पसरलें असून नदीचा उतारहि अगदीं बेताचाच होता. एकंदरींत स्थान मोठें रमणीय असून आसमंतांतील वनश्री व सृष्टिशोभा मोठी मनोहर व प्रसन्न दिसत होती. चारी बाजूंस थोड्या थोड्या अंतरावर लहान लहान गांवहि वसलेले होते.

अर्थात हें स्थान सर्व दृष्टीनें अनुकूल व प्रशस्त वाटून येथेंच तपश्चर्या करण्याचें त्यानें मनांत निश्चित केलें. उद्देश हा कीं अशा रितीनें तरी मनःशांति व साक्षात्कार लाभतों कीं काय हें पाहावें.

ते पंचभिक्षु जवळ होतेच. ते ब्राह्मण असून ब्रह्मचारी होते. तेहि मोठे विद्वान असून जिज्ञासु होते. सिद्धार्थ तपश्चर्येस बसला तर त्याची गुरूप्रमाणें सेवाशुश्रूषा करून त्याची चांगली वरदास्त राखण्याची त्यांनी आपली तयारी दाखविली. त्यांच्या मदतीनें प्रखर तपश्चर्या करून सत्यज्ञानाचा साक्षात्कार करून घेण्याचा त्यानें निश्चय केला.

बोधिसत्त्वाची तपश्चर्या ती ! तापत्रयानें पोळलेल्या जिज्ञासु जिवाची खरी तपश्चर्या ! सत्यज्ञानाची सारखी तळमळ लागून राहिलेल्या उत्साही साधकाची कडकडीत तपश्चर्या ! मग त्याची प्रखरता काय सांगावी ? आणि सांगितलीं तरी ती आधुनिक देहसुखतर्पणरत चैनी व हौसी जनतेला पटणार कशी ? ' अं: ! कांहीं तरी थाप आहे ' असा नेमका शेरा मारून नाक मुरडतील व तो सगळा कल्पनेचा खेळ आहे असें म्हणून तोंड फिरवितील ! हें आम्ही जाणून आहों.

अखंड शिश्नोदरसुखाच्या नादीं लागलेल्या विषयमूढ व देहसुखभ्रांत आधुनिक शास्त्रीय जगाला असल्या गोष्टी पटत व मानवत नाहींत हें खरें. पण या भाग्यशाली भारतमातेच्या पवित्र उदरीं कसलीं कसलीं दिव्य व अलौकिक नररत्नें जन्मास आलीं याचें विस्मरण होऊं देणें म्हणजे विचारी व अभिजात भारतीयांचें तें एक मोठें दुर्भाग्यच

म्हटलें पाहिजे ! तुम्ही आधुनिक सुशिक्षित लोक माना अगर न माना, जगांत अजून असे विचारवंत व निष्ठावंत लोक आहेत कीं त्यांना हें भयंकर अग्निदिव्य वाचून खास आश्चर्य व कौतुक वाटल्या-वांचून राहणार नाहीं.

सिद्धार्थाची ही स्वतंत्र तपश्चर्या—सत्यज्ञान मिळविण्याचा हा त्याचा स्वतंत्र उद्योग—दु:खाचें मूळ व त्याचा नाश शोधून काढण्याचा हा त्याचा स्वतंत्र प्रयत्न ! येथें कोणाचा उपदेश नाहीं कीं कोणाचें मार्गदर्शन नाहीं ! अगदींच सहजस्फूर्त उद्योग ! !

उद्दक रामपुत्ताजवळ असतांना समाधीची आठवी म्हणजे 'नैवसंज्ञानासंज्ञा' नांवाची श्रेष्ठ व शेवटची पायरी त्यानें साध्य करून घेतली होती हें वर सांगण्यांत आलेंच आहे. या समाधीचा उपयोग इतकाच होता कीं तिच्या योगानें दुष्ट मनोवृत्तीचें कांहीं काळ दमन होत असे. नाहीं असें नाहीं. पण त्याचा समूळ नाश--निर्मूलन—करतां येत नसे. म्हणून एवढ्यानें त्याचें संपूर्ण समाधान झालें नाहीं. त्याला दुष्ट मनोवृत्तीचा समूळ उच्छेद करावयाचा मार्ग हवा होता. तो त्यास आलार कलामाजवळ किंवा उद्दक रामपुत्ताजवळ राहून प्राप्त झाला नाहीं. म्हणून आतां त्यानें स्वत:च्या हिम्मतीवर--बुद्धिबलावर--आत्म-स्फूर्तीवर—तप:समर्थ्यावर शोधून काढण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें तो पुढील उद्योगास लागला.

समाधीची शेवटची पायरी--जी नैवसंज्ञानासंज्ञा नांवाची होती--तिच्या पलीकडे आणखी जातां येतें कीं काय हें पहावें म्हणून प्रथम तो खडतर योगाभ्यास पुढें चालू केला. अर्थात् हठ योग होता तो. श्वासोच्छ्वास कोंडून धरून तासांचे तास सारखा ध्यानस्थ होऊन बसूं लागला. यामुळें पुढें कांहीं दिवसांनीं पोटांत भयंकर वेदना उठूं लागल्या. सर्वांगाचा दाह होऊं लागला. शारीरिक क्लेश, दाह व

वेदना मोठ्या आनंदानें सहन करून अंगीकृत प्रयत्नांत खंड अगर व्यत्यय पडूं दिला नाहीं. त्याच्या उत्साहांत उतार पडला नाहीं की स्मृतींत भ्रंश झाला नाहीं. मात्र देहावर त्याचा अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. शरीर दुर्बल झालें व प्रकृति नाजुक बनली ! तथापि न डगमगतां त्यानें आपलें उद्दिष्ट कार्य यथाप्रकारें चालूच ठेविलें.

परमशांतीचें श्रेष्ठ स्थान लवकर गांठावें म्हणून तशा स्थितींतच त्यानें पुढें अन्नहि तोडलें ! हठयोगानें इष्ट कार्य सिद्धीस जाईल याचें चिन्ह त्यास दिसेना, तेव्हां त्यानें तो सोडून अनशनव्रतानुष्ठान–उपोषणव्रतानुष्ठान-स्वीकारलें. पण तो कडकडीत निराहार मात्र नव्हता. दिवसांतून कुळथीची किंवा मुगाची थोडी पेज पिऊन तो निर्वाह करूं लागला.

यामुळें झालें काय, तर दौर्बल्याची सीमा झाली. हातापायाच्या काड्या बनल्या. पाठीचा कणा उठून दिसूं लागला. बरगड्या खिळखिळ झाल्या. डोळे खोल पाताळांत गेले. अंगकांति करपून गेली व पोट व पाठ वाळून एक झाली !

अशी निकृष्ट व दुर्बल स्थिति झाली तरी त्याला कांहीं शांतीचें व समाधानाचें मंगल शिखर दिसेना ! अनेक कष्ट झाले, दुःख भोगिलें, वेदना सोशिल्या तरी त्याला त्या उपोषण व्रतानें दिसावा तसा आशादायक मार्ग दिसेना ! ! त्याला आतां चिंता वाटूं लागली. काळजी पडली. मन द्विधा झालें व निश्चय डळमळूं लागला.

आतां त्याच्या मनांत आणखी एक नवीन विचार चमकूं लागला. अशा रितीनें देहदंडण करून परम शांतीचें श्रेष्ठ स्थान गांठणें हें सहसा शक्य व संभवनीय नाहीं, असा विचार त्याच्या मनांत डोकाऊं लागला. आणि म्हणून अखेर त्यानें तोही नाद सोडून देण्याचें ठरविलें. सुखाचा–शांतिसुखाचा–लाभ व्हावयाचा तर देह तसा

अशक्त व कृश ठेऊन उपयोगी नाहीं. तो सशक्त व सदृढ असावयास पाहिजे. आणि देह सशक्त व सदृढ ठेवावयाचा तर अन्न ग्रहण करणें अवश्यच आहे. आतां अन्नग्रहण केल्यानें प्रकृतिस्वास्थ्य लाभून त्यापासून सुख शांति मिळतें हें खरें. पण भोगवासनेच्या-पापवासनेच्या तृप्तीनें मिळविलेलें तें सुख नव्हे ! किंवा घातपात करूनहि मिळविलेलें नव्हे. मग तशा निर्दोष सुखाला-प्रकृति स्वास्थ्य सुखाला-आपण काय म्हणून अंतरावें ? माझा देह इतका दुर्बल व कृश झाला आहे कीं अशा स्थितींत समाधि साधणें शक्य नाहीं. ती साधावयास शरीर पुनः सशक्त व्हावयास पाहिजे आणि तें उपवासव्रतानें साध्य होण्याजोगें नाहीं. असा विचार करून तो ती प्रखर तपश्चर्या व कठोर देहदंडणव्रत यांचा नाद सोडून देऊन अखेर रोज योग्य आहार घेण्याचा त्यानें निश्चय केला.

या तपश्चर्येच्या वेळीं त्याची काय स्थिति झाली होती हें पुढें खुद्द भगवानच आपल्या तोंडानें बोधिराज कुमारास निवेदन करीत आहेत. त्याचा येथें अनुवाद करतों म्हणजे वाचकांस त्याची यथार्थ कल्पना येईल.

ही कथा बुद्धभगवान बोधिराज-कुमारास सांगतात ती अशी--हे राजकुमारा ! ऐक. माझी तपश्चर्या ऐक. मी तपश्चर्येस बसलों म्हणजे असें करीत असें. दांतावर दांत रोवून, जीभ टाळूला लावून, मनाचा निग्रह करून तपश्चर्या करूं लागलो म्हणजे माझ्या खाकेंतून घामाच्या धारा सारख्या निथळत असत ! तरी न डगमगतां माझा दीर्घ उद्योग मी सारखा चालूच ठेवीं. स्मृति जागृत राखून शरीर तत्पर ठेवीत असें. पुढें पुढें तर मी श्वास दाबून धरून ध्यानस्थ होऊं लागलों. मी जेव्हां श्वास बंद करून ध्यानस्थ बसें, तेव्हां माझ्या मुखांतून व नाकांतून श्वसन बंद झाल्यामुळें कानांतून श्वास निघून भात्याप्रमाणें त्याचा आवाज होई ! यानंतर मी आश्वास-प्रश्वास यांना रोखून धरिलें. तेव्हां

तर काय सांगूं माझ्या वेदना ! माझें डोकें आतां तुटून पडतें कीं काय इतक्या तेथें वेदना होत असत ! त्या श्वासनिरोधामुळें पोटांत कोणी तरी शस्त्र खुपसून आंतडें कापल्याप्रमाणें तीव्र वेदना उठत असत ! आणि शरीरभर होणारा दाह तर कांहीं पुसूं नये ! त्या वेळीं स्वर्गांतील कांहीं देवता स्पष्ट म्हणत कीं, ‘ अरेरे ! बिचारा श्रमण गोतम ! तो खरोखर मरून गेला ! ! ’ कोणी म्हणत:- ‘ छे, तो मेला नाहीं व तसा मरणार नाहीं ! ! श्रमण गोतम हा असातसा कोणी नसून अर्हत आहे ! मग त्याचा नाश कसा होणार ? अर्हतांचा तो तसा विहारच असतो ! ! ’

‘ त्या वेळीं मीं आहार सोडला होता. फक्त मूठभर मुगाची, कुळिथीची, अगर वाटाण्याची किंवा हरभऱ्याची पेज मात्र घेत असें. यामुळें माझी प्रकृति पुढें पुढें इतकी अशक्त व कृश झाली कीं ती सांगून पुरवत नाहीं. पोट अगदीं पाठीला जाऊन भिडलें. पाठीचा कणा वर उठला. बरगड्या सगळ्या स्पष्ट दिसूं लागल्या. डोळे पाताळांत गेले. पोटावरून हात फिरविला तर पाठीचा कणा हातास लागे ! मी त्या वेळीं इतका क्षीण व दुर्बल झालों होतों कीं शौचास अगर लघवीस जाऊन बसलों तर वर उठण्याची देखील अंगांत ताकद राहिली नव्हती ! उठायला गेलों तर झोंक जाऊन पुढें पडत असें ! ! आणि अंगावरून हात फिरविल्यास अंगावरचे केस गळून पडत असत ! ! शरीर अगदीं कृश होऊन काळें ठिक्कर पडून गेलें होतें ! ! माझ्या शरीराचा गोरा रंग व कांति पार करपून गेली होती ! ! राजकुमार ! तपश्चर्येच्या वेळीं माझी अशी एकंदर शोचनीय स्थिति व भयंकर हाल झाले होते ! ! !

हा सर्व प्रकार व दु:स्थिति केवळ आहार सोडल्याचा परिणाम आहे असें पुढें पुढें मला वाटूं लागलें, व आणखी असेच कांहीं दिवस गेले तर ज्ञान न मिळवितांच मी खास मृत्युमुखीं पडणार याची मला भीति वाटूं लागली. म्हणून मीं असा विचार केला कीं इतकें कडकडीत उपोषण न करतां थोडा थोडा आहार घेत गेलों तर काय होईल ? या

विचारानें मला थोडेंसें समाधान वाटलें व धीरही आला. कारण अशा प्रकारच्या तीव्र उपोषणानें माझे शारीरिक कष्ट मात्र फार वाढले होते व दुर्बलता बळावली होती. पण त्या मानानें मनाचें समाधान मात्र मुळींच लाभलें नाहीं. शरीराला कष्ट देऊन, ताप देऊन, सत्यज्ञानाची ओळख पटणें-शांतिसुखाचा ठेवा हातीं लागणें-हें शक्य नाहीं. असल्या कडकडीत तपश्चर्येपासून—हठयोगापासून—उपवासव्रतापासून—तृष्णेचें सर्वस्वी उच्छेदन व निर्मूलन होणें हें कदापि शक्य नाहीं असा माझा ठाम ग्रह झाला. मग बुद्धींत प्रकाश उजळण्याची गोष्ट तर लांबच राहिली ! ज्ञानप्राप्तीचा-शाश्वत शांतीचा-निर्वाण लाभाचा-हा कांहीं आर्य-मार्ग नव्हे ! म्हणून मी पुढें शरीराला कष्ट देणारी व शक्तीचा ऱ्हास करणारी ही कोरडी व कठोर तपश्चर्या व उपोषणव्रत यांचा नाद सोडून दिला व दररोज योग्य आहार करून शरीरप्रकृति सुधारणेच्या मार्गाला लागलो. पुढें त्या पासून मला शक्ति व शांति लाभली व निर्वाणाचें शिखरहि प्राप्त झालें ! ! !' असो.

याप्रमाणें अन्नग्रहणाचा निश्चय केल्यावर उपवासव्रताचा त्याग करून तो तेथून उठला व अन्नग्रहणाच्या पूर्वी स्नान करावें म्हणून नदींत स्नान करावयास गेला. पण तो इतका अशक्त झाला होता कीं स्नान झाल्यावर त्याला पात्रांतून बाहेर येतां येईना ! पण सुदैव इतकेंच कीं तेथेंच शेजारीं एका झाडाची फांदी पाण्यावर लोंबकळत होती. तिचा आधार घेऊन तो कसाबसा उठला व पाण्यांतून बाहेर आला.

नंतर पुढें तेथून स्वस्थानी परत येतांना वाटेंत पाय लटपटून तो धपकन् भोंवळ येऊन खालीं जमिनीवर आदळला ! त्यासरशीं त्या पंचवर्गीय भिक्षूंना वाटलें कीं बोधिसत्वाची इतिश्रीच झाली !

तो जेथें पडला होता, तेथेंच जवळच एक गोपनायक राहत होता. त्याची नंदा नांवाची ज्येष्ठ कन्या होती. ती त्या वेळीं त्याच्या जवळून जात होती. तिनें त्यास पाहिलें. नमस्कार केला व आपल्या जवळ

असलेला दूधभात त्यास अर्पण करून ती तेथून चालती झाली. बोधिसत्त्वानें त्याचा आनंदानें स्वीकार करून त्याचें सेवन केलें.

याप्रमाणें त्या दूधभाताचें भक्षण केल्यावर त्याला थोडीशी हुशारी आली. मन प्रसन्न झालें. व सर्व शरीरांत नवचैतन्याचा संचार झाला! यानंतर पुढें तो नित्य अन्नग्रहण करूं लागला. तेव्हां त्याच्यांत दिनेदिने थोडी थोडी शक्ति येत जाऊन प्रकृति सुधारत चालली. यावरून त्याला एक गोष्ट पटली. ती ही कीं प्रखर व कठोर तपानें बोधिलाभ होणें नाहीं. सर्वज्ञतेचा तो मार्गहि नव्हे. अत्यंत काय-क्लेश व अत्यंत सुख या दोन्हींचा त्याग करून मध्यम मार्गाचा अवलंब करून संयमानें जीवन कंठणें यांतच खरा लाभ आहे.

याप्रमाणें पुढें वागण्याचा निश्चय करून त्यानें तो निश्चय आपल्या साथीदारांस म्हणजे पंचवर्गीय भिक्षूंस कळविला. पण यामुळें त्यांची समजूत विपरीत होऊन बोधिसत्व हा तपश्चर्येपासून भ्रष्ट झाला, आतां त्याला धर्मज्ञान होणें शक्य नाहीं, असा विचार करून ते त्यास सोडून तेथून निघून गेले!!

---

## मसलत फसली.

पधानसुत (सुत्तनिपात ३–२)

आयत्या वेळीं ते पंचवर्गीय भिक्षु आपणास दगा देऊन सोडून गेले हें पाहून सिद्धार्थ घाबरला नाहीं, कचरला नाहीं, डगमगला नाहीं, किंवा गर्भगलित झाला नाहीं. आपला कृत निश्चय शेवटास नेणेचा त्यानें धैर्यानें व नेटानें चंग बांधला व आतांपर्यंत आचरीत आलेला देहदंडणाचा कठोर मार्ग सोडून देऊन, नित्य, युक्त व मित आहार घेऊन ध्यान मार्गानें तत्त्वबोध करून घेण्याचा निश्चय मनांत ठाम केला.

याप्रमाणें निश्चय करून तो ध्यानस्थ होऊन बसणार तों इतक्यांत काळा कभिन्न असा एक भव्य पुरुष त्याच्याजवळ येऊन उभा राहिला. अर्थात् मार होता तो ! तेथें आल्यावर अत्यंत करुण स्वर काढून तो त्यास म्हणाला :—गोतमा ! अरेरे ! काय रे बाबा दशा झाली तुझी ही ! किती वाळला आहेस ! रोडला आहेस ! थकला आहेस ! काय काळा ठिक्कर पडला आहेस ! कसला राजबिंडा तूं ! काय तुझें तेज तें ! पण आतां तें सर्व कुठं आहे ? खचित खचित मरणार आतां तूं ! पण, भल्या माणसा ! माझं ऐक ! अशा रीतीनं मरूं नयेस तूं. जगावंस ! पण माझं ऐकशील का ?

**गोतम** :—काय सांगणार तूं मला ?

**मार** :—मी तुझ्या हिताचंच सांगणार आहें. निराळं कांहीं नाहीं. अरे, जगणं हा उत्तम पक्ष. कारण जगलास तर सुखी होशील ! पुण्यकर्म करून स्वर्गाचा धनी होशील ! असा कुजून मेल्यानं काय लाभणार आहे तुला ? म्हणून म्हणतों कीं जग. जिवंत रहा आणि ब्रह्मचर्यानं राहून अग्निउपासना कर ! म्हणजे तुझा पुण्यसंचय वाढून तूं पुण्यवान होशील ! इहपर लोकीं तुझी कीर्ति वाढेल ! आणि तूं पूर्ण सुखी होशील ! ! बाबा, हा राजमार्ग सोडून आडमार्गास लागण्याची अवदसा तुला कुठून सुचली ! नाजुक व अवघड असा निर्वाण प्राप्तीचा नसता उद्योग तुला हवा कशाला ? बाबा ! तो मार्ग कांहीं सोपा व सरळ नाहीं ! तो अत्यंत कठीण व अडचणीचा आहे ! मोठा दुर्गम आहे ! महत्प्रयासाचा आहे ! म्हणून म्हणतों माझं ऐक. ऐकशील का ?

**गोतम** :—हे निष्काळजी व आळशी मानवाच्या प्राणमित्रा ! तुझं इथं काय काम आहे ? कशाला आलास तूं इथं ? कुणी बोलावलं तुला इथं ? हे पापी मारा ! जा, आलास तसा काळं कर !

**मार** :—भल्या माणसा ! असं कां बरं म्हणतोस ?

**गोतम** :—मी तुला आतां स्पष्टच सांगतों कीं तीं तुझी पुण्यकर्माची बडबड माझ्यापुढं अगदीं व्यर्थ आहे. मला तुझ्या पुण्यकर्माची मुळींच परवा नाहीं ! ज्याला त्याची चाड असेल, त्याच्यापुढं तुझ्यासारख्या भोंदू मारानं वाटेल तशा गप्पा गोष्टी माराव्यात. माझ्यापुढं तुझ्या गमजा मुळींच चालावयाच्या नाहींत. जा, मारा जा ! ईथून चालता हो ! !

**मार** :—असं म्हणूं नकोस. गोतमा, नाहीं म्हणूं नकोस ! अजून मला ओळखलं नाहींस तूं !

**गोतम** :—ओळखलं. चागलं ओळखलं आहे तुला मीं ! मारा, तुझी जानपछान पूर्ण आहे मला ! जा, बाबा, इथून नीट चालता हो ! मला श्रद्धा आहे, वीर्य आहे, प्रज्ञाहि पण आहे ! असं असून व मीं माझ्या ध्येयावर चित्त निश्चल ठेवलं असून मला मरणाची नसती भीति दाखवून पशुवत् जगण्याचा उपदेश करणारा असा भामटा तूं कोण ?

**मार** :—अरे, माझा प्रताप अद्याप तूं ओळखला नाहींस.

**गोतम** :—ऐक, माझा प्रताप प्रथम ऐक. हा जो वारा वाहतो आहे, तो कदाचित नदीचा ओघसुद्धां सुकवूं शकेल; पण लक्षांत ठेव कीं सरळ ध्येयावर नजर रोखून सन्मार्गानं चालणाऱ्या माझं रक्त मात्र तो सुकवूं शकणार नाहीं ! ! पुनः हेंहि लक्षांत ठेव कीं माझ्या प्रयत्नानं मी माझं रक्त आटवीन व मांस सुकवीन, पण त्यापासून माझं चित्त मात्र अधिक पवित्र व प्रसन्न होईल ! आणि माझे शारीरिक पित्तश्लेष्मादि दोष पार हटून जातील ! त्यामुळं माझी स्मृति, प्रज्ञा, व समाधि हीं उत्तरोत्तर वाढतच जातील ! ! याप्रमाणें व्रतस्थ राहून जीवन कंठत असतां मध्येंच अचानक सुखोपभोगाचा दिव्य प्रसंग आला तरी माझं चित्त त्या विषयोपभोगाकडे-कामोपभोगाकडे-लवमात्रहि वळणार नाहीं ! ! मारा ! हें माझं प्रचंड व दणदणीत आत्मसंयमन पाहा ! ! ही माझी दिव्य आत्मशुद्धि पाहा ! ! आणि हा माझा खणखर आत्मनिश्चय पाहा ! !

**मार** :—गोतमा, ही तुझी बडबड व्यर्थ आहे! अगदीं व्यर्थ आहे!! माझी सेना-प्रबल मार सेना-अजून तूं पाहिली नाहींस. तिचं सामर्थ्य-प्रचंड सामर्थ्य-तूं ओळखिलं नाहींस!! म्हणून ही तुझी वटवट चालली आहे!!

**गोतम** :—ओळखितों. मारा! तुझी सेना मी ओळखितो, चांगली ओळखितों. तिला मी पूर्ण ओळखून आहे! तिची नको तूं भीति घालूंस! हे दुष्ट मारा! कामोपभोग म्हणजे रति ही तुझ्या प्रबळ सेनेची पहिली रांग! अरति ही दुसरी, भूक व तहान ही तिसरी, तृष्णा ही चौथी, आळस ही पांचवी, भीति ही सहावी, कुशंका ही सातवी, अहंकार ही आठवी, लाभसत्कारपूजा ही नववी आणि खोट्या मार्गानं मिळविलेली कीर्ति ही दहावी रांग होय, कीं जिच्या योगानें मनुष्य हा आत्मस्तुति व परनिंदा करण्यास प्रवृत्त होतो. हे कृष्ण पुरुषा! असे हे तुझ्या सेनेचे निरनिराळे दहा तट आहेत. आणि तसेंच त्या सेनेचें सामर्थ्यहि पण मी पूर्ण ओळखून आहे. ती तुझी सेना भ्याड पुरुषाला—विषयी मनुष्याला—स्त्रैण पुरुषाला—जिंकूं शकते. उलट हे शिस्नोदर-सुखपरायण जन मात्र तिला जिंकूं शकत नाहींत, हेंहि मी जाणतों. पण हें ध्यानांत ठेव कीं जो तिला जिंकतो तोच खरा सुखी होतो! त्यालाच खरा स्वर्ग मिळतो! त्यालाच खरा आनंद व शाश्वत शांति लाभते! हे काळ्या नमुचे! मी प्रतिज्ञा करून सांगतों कीं तूं माझा पराभव करूं शकणार नाहींस! तुझी सेना माझा बालग्रही नमविणार नाहीं!!

**मार** :—आणि तुझा पराभव झाला तर?

**गोतम** :—माझें जिणें व्यर्थ मी समजेन! जगण्यापेक्षां मरणच मग मला अधिक बरें वाटेल! मला ठाऊक आहे कीं कित्येक श्रमण व ब्राह्मण तुझ्या सेनेंत मिसळून व दडपून गेल्यामुळें ते प्रकाशत नाहींत. याचें कारण इतकेंच कीं साधु पुरुष ज्या मार्गानें जातात तो मार्ग

त्यांना अवगत नाहीं. आणि अवगत असला तरी तो त्यांना वावडा व अवघड वाटतो !

**मार** :—नीट विचार कर, गोतमा, पुनः विचार कर. ही माझी सेना तुझ्यावर सोडतों पहा.

**गोतम** :—हो, मी पाहतों आहे. चारी बाजूला तुझी प्रबल मारसेना मला गराडा घालून उभी आहे, हें मी पाहतों आहे ! ती मला दिसते आहे ! आणि तूं–मार–आपल्या वाहनावर सज्ज झाला आहेस हेंहि मी पाहतों आहे ! पण मी कांही हातांत बांगड्या भरल्या नाहींत ! पाहा, मीहि तुझ्याशीं दोन हात करण्यास शूरासारखा पुढें उभा आहें !! मीहि तुझ्या सेनेशीं चांगली टक्कर देण्यास सिद्ध झालों आहे !! कोण मला स्पर्श करतो आहे हें पाहूं दे ! मारा, मला तूं स्थानभ्रष्ट करणार नाहींस–उलथून पाडणार नाहींस–एवढी काळजी मला आतां घेतलीच पाहिजे ! मी जाणून आहें कीं देव काय नि मनुष्य काय, तुझ्या प्रबल सेनेपुढें उभे राहून टिकाव धरूं शकत नाहींत. पण मी मात्र प्रतिज्ञेनें सांगतों कीं दगडानें मातीचें मडकें फोडून जसें चूरचूर करून टाकावें तसें माझ्या अमोघ प्रज्ञेनें तुम्हां सर्वांची फजीति व पराभव केल्याशिवाय राहणार नाहीं !!! आणि मन ताब्यांत ठेऊन, स्मृति जागृत करून लोकांना व श्रावकांना सत्य धर्माचा अखंड उपदेश करीत या पृथ्वी-तळावर मी निर्भयपणें संचार करीत राहीन !! इतकेंच नव्हे, ते माझे श्रावकहि माझ्या उपदेशाप्रमाणें सावधानपणानें वागून आणि आपल्या ध्येयावर चित्त निश्चल ठेऊन तुझ्या नाकावर टिच्चून अशा श्रेष्ठपदाला जातील कीं जेथें त्यांना तुम्हा दुष्टांचा संपर्क होऊन शोक करण्याचा प्रसंगच येणार नाहीं !!

हें धीरगंभीर भाषण ऐकून माराचें तोंड लज्जेनें गोरेंमोरें झालें. व मनांत तो फारच चरकला, चपापला व नरमला. गोतमावर आपली मात्रा चालण्यासारखी नाहीं व तेथें आपली डाळ शिजण्यासारखी नाहीं,

याची त्यास पक्की साक्ष पटली व अखेर त्याच्या मनोजयाचें दुर्दमनीय सामर्थ्य पाहून तो त्यास म्हणालाः—'गोतमा! शाबास तुझी! महापुरुषा! धन्य आहे तुझी!! सात वर्षें झालीं मी सारखा तुझा पाठलाग करीत आहे. पण माझ्यानें तुझा केंसहि वांकडा करवला नाहीं!! स्मृतिमान गोतमाचें वर्म मला मुळींच सांपडलें नाहीं! गोतमा! तुझा नाद आतां मीं सोडून दिला! तुझ्यापुढें मी पराभूत झालों! हीन ठरलों! निस्तेज पडलों! म्हणून आल्यावाटेनें मी परत जातो!!

असें म्हणून विकल अंतःकरणानें तो मार तेथून निघून गेला!!

गोतमानें माराला जें शेवटचें पण प्रभावी भाषण बोलून त्याचा पूर्ण पराजय केला, त्याचा मुख्य तात्पर्य भाव त्यानें यापुढील गाथेंत म्हणून दाखविलाः—

**'पगाळ्हा यत्थ न दिस्सन्ति एते समण ब्राम्हणा।**
**तंच प्रग्गं न जानन्ति येन गच्छन्ति सुब्बता॥**
**यं तेतं नप्प सहानी सेनं लोको सदेवको।**
**तं ते पञ्ञाय गच्छामि आमं पत्तवं अम्हना॥**

अर्थः—हे मारा! सगळे श्रमण व ब्राम्हण तुझ्या सेनेच्या तडाख्यांत सांपडले आहेत. आणि म्हणून ते प्रकाशात नाहींत. व महर्षि ज्या मार्गानें जातात तो मार्ग त्यांस सांपडत नाहीं. ह्या तुझ्या सेनेपुढें देव आणि मनुष्य टिकाव धरूं शकत नाहींत. पण दगडानें कच्च्या मातीचें भांडें फोडून टाकावें त्याप्रमाणें मी प्रज्ञेच्या योगानें तुझ्या सेनेची पांगापांग करून टाकतों.

(पधानसुत्त)

---

## अश्वत्थवृक्षाखालीं !

( १ ) महावग्ग १–१–१ ( विनयपिटक ) ( २ ) अश्वघोष

भरतखंडांत अश्वत्थ वृक्षास महत्त्व फार आहे. मोठा पूज्य व पवित्र वृक्ष तो! इतका कीं जवळ जवळ त्यास देवता स्वरूपच प्राप्त झालें आहे ! याचें कारण असें कीं तेथें देव वास करून राहत असतात अशी वैदिक भावना आहे. त्याच्या बुडांत ब्रम्हा, मध्यभागीं विष्णु, व शेंड्यावर शिव राहतो अशी भारतीयांची समजूत आहे. श्रीकृष्णांनीं आपल्या विभूति सांगतांना ' अश्वत्थश्चास्मि वृक्षाणां ' असें स्पष्ट सांगून जगास त्याची महती जाहीर केली आहे. आणि याच कारणास्तव याज्ञवल्क्यांची बहीण कंसारी ही आपल्या नूतन अर्भकास त्या वृक्षाखालीं ठेऊन ' अश्वत्थ विष्णुरुपोऽसि त्वं देवेषु प्रतिष्ठितः । तस्माद्रक्षस्व मे पुत्रं सर्वतस्त्वं वनस्पते ' अशी त्याची प्रार्थना करून तेथून निघून गेली. आणि पुढें त्या अश्वत्थनारायणानें त्या मुलाचें पालन पोषण केलें. व पुढें तोच मुलगा पिप्पलाद ऋषि या नांवानें प्रसिद्ध झाला ! स्त्रियांना मूलबाळ होत नसल्यास या झाडाला लक्ष प्रदक्षिणा घातल्यास त्यांना अपत्यलाभ होतो असें पुराणांतरीं सांगितलें आहे. अग्निदेव या झाडावर असतो अशीहि एक कल्पना आहे. आणि म्हणून अग्निमंथन करावयाची अरणी या झाडाची करतात व त्याच्या बारीक बारीक वाळलेल्या डाहळ्या त्यास समिधा म्हणून अर्पण करण्यांत येतात. अशी ही थोडक्यांत अश्वत्थ वृक्षाची पौराणिक कथा आहे. असो.

हें येथें सांगण्याचें कारण कीं बोधिसत्वाला संबोधि ज्ञान झालें तें अखेर या अश्वत्थवृक्षाखालींच झालें. म्हणून त्यास बौद्धधर्मात बोधिवृक्ष असें म्हणतात. शिवाय आणखी एक गोष्ट या वृक्षासंबंधानें सांगण्यासारखी म्हणजे सिद्धार्थ ज्या दिवशीं जन्मला त्याच दिवशीं हा अश्वत्थवृक्षहि अंकुरला होता ! त्याचप्रमाणें सिद्धार्थाची पत्नी यशोधरा, त्याचा बालमित्र काळुउदायी, त्याचा सारथी छन्न व प्रिय घोडा कंथक

या सर्वांचा जन्म सिद्धार्थाच्या जन्माबरोबरच झाला, अशी आख्यायिका असून त्यांना सहजात म्हणण्याचा प्रघात पडला.

माराचा मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें पराभव केल्यावर पुढें गोतम हा तेथून निघून शांत व पवित्र स्थानाचा शोध करीत करीत नैरंजरा नदीवरील एका विशाल वटवृक्षाखालीं आला. त्याला तें स्थान फार रम्य व प्रसन्न दिसलें. म्हणून तेथें बसून त्यानें थोडीशी विश्रांति घेतली. नंतर तेथून उठून नदीवर जाऊन त्या झुळुझुळु वाहणाऱ्या शीतल प्रवाहांत उतरून स्वच्छ स्नान केलें. आणि मग वर येऊन पुनः त्या वृक्षाखालीं जाऊन आसन घातलें.

अर्थात् आतां तो फार थकला होता. शिवाय भूकहि सडकून लागली होती. पण करणार काय ? राजवाडा असा थोडाच होता तो ! एकदम पंचपक्वान्नांचें ताट वाढून पुढें यायला ! बोलून चालून निर्जन प्रदेश ! तेथें त्याला काय मिळणार नि कोण देणार ? पण योगायोग तरी किती विलक्षण ! तो तेथें जाऊन बसला आणि मनांत खाण्याची इच्छा झाली तों इतक्यांत सुदैवानें सुजाता नांवाची एक सुंदर व कुलीन गोपकन्या त्या वटदेवतेचा नवस फेडण्यासाठीं म्हणून एका हातांत भरलेलें पायस पात्र व दुसऱ्या हातांत सुवर्ण जलपात्र घेऊन तेथें आली !

वृक्षाच्या बुडाशीं येऊन पाहते तों काय चमत्कार ! तेथें देवता नसून एक सुशांत व तेजस्वी असा दिव्यपुरुष तिला दिसला. दोघांची दृष्टादृष्ट झाली आणि सुजातेचें मन श्रद्धेनें व भक्तीनें उचंबळून आलें. त्यालाच देवता समजून तें हातांतील पायसपात्र व जलपात्र त्याच्यापुढें ठेऊन त्याला नमस्कार करून ती तेथून परत निघून गेली.

गोतमाला काय, तेवढेंच हवें होतें. सुंदर व मधुर अन्न आयतें वाढून आलेलें; मग कोण टाकून देईल ? त्यानें त्याचा आदरपूर्वक स्वीकार केला. तें पायसपात्र घेऊन तो नदीवर जाऊन, पुनः स्नान करून त्या अन्नाचे ४९ भाग करून ते सर्व भक्षण केल्यावर पुनः

नदींत उतरून हस्त प्रक्षालन करून वर आला. आणि त्या जल-पात्रातील पाणी पिऊन संतृप्त झाला. या वेळीं त्यानें स्नान केलेली जागा व पायसपात्र ठेवलेलें स्थान बुद्धगयेजवळ सुप्रतीर्थ म्हणून आजला प्रसिद्ध आहे. अन्न ग्रहण केल्यावर त्याला थोडीशी हुशारी आली व आनंदहि झाला ! थोडा वेळ बसून विश्रांति घेतल्यावर पुनः तो तेथून उठला व दिवस मावळेपर्यंत सारखा वनांत इकडे तिकडे फिरत राहिला.

वैशाख शुद्ध पौर्णिमेचा दिवस तो ! वार बुधवार आणि विशाखा नक्षत्र. संध्याकाळचा सुमनोहर समय ! सूर्य अस्ताचलाखालीं उतरतो न उतरतो तों इतक्यांत पूर्वेस रजनीनाथ हा आपल्या अमृतमय दिव्य कांतीनें स्वच्छ व निरभ्र आकाशांत विलसूं लागला !

काय सुंदर देखावा ! किती शांत ! किती प्रसन्न ! किती मनोहर ! निरभ्र नीलवर्ण आकाशांतील रात्रीचें–तशांत पौर्णिमेच्या प्रसन्न रात्रीचें–वर्णन करून असें संपणार थोडेंच ! तें दिव्य व स्वर्गीय सौंदर्य प्रत्यक्ष डोळ्यानें पाहूनच मनाची हौस फेडून घ्यावी हेंच बरें ! निसर्गदेवतेचें तें खुललेलें अपार वैभव व नितांत सौंदर्य असें सांगून तें कधीं संपणार आहे काय ? म्हणून त्या भरीस आम्ही पडत नाहीं. फक्त इतकेंच कीं तेथें आसमंतात खुललेली ती सुरम्य व सुमधुर वनश्री पाहून सिद्धार्थाचें मन हर्षोत्फुल्ल व सुप्रसन्न झालें.

समोरच एक उंच व विशाल असा सुरमणीय अश्वत्थवृक्ष उभा होता. त्याच्याजवळ तो आला. जागा मोठी शांत, स्वच्छ व पवित्र होती. तेथें आल्यावर बुंध्याजवळ उभा राहून आसमंतात दृष्टि फिरविली व तेथील देखाव्यानें त्याला परमावधीचें समाधान वाटलें. आणि म्हणून तेथेंच बसून श्रेष्ठ धर्माचें शांत चिंतन करून संसारमुक्तीचें परमतत्त्व अचूक शोधून काढावयाचें असा मनाचा पूर्ण निर्धार केला. नंतर त्या अश्वत्थनारायणाच्या बुडाखालीं पवित्र दर्भ पसरून त्यावर

पद्मासन घालून प्रसन्न मनानें व स्थिर बुद्धीनें आणि मोठ्या जागरूकतेनें तो ध्यान करावयास बसला. अर्थात् रात्रीचा प्रथम याम होता तो. यावेळेला तो जो तेथें बसला तो आपणास संबोधि प्राप्त झाल्याशिवाय तेथून वर उठावयाचें नाहीं असा निर्धार करूनच बसला !

पहिल्या यामांत समाधि लाऊन आतांपर्यंतचे आपले सर्व पूर्वजन्म आठवून त्या प्रत्येक जन्मांत आपण काय काय केलें व काय काय अनुभविलें याचें सम्यक् चिंतन केलें. त्यावरून त्यानें असा निर्णय काढला कीं, हें जग म्हणजे केवळ असार व मिथ्या आहे ! हा विचार निश्चित होईपर्यंत पहिला याम संपला.

दुसऱ्या यामाच्या प्रारंभीं त्यास नवीन स्फूर्ति आली व ज्ञानदृष्टि निवळून ती अधिक सूक्ष्म व तेजस्वी झाली. त्या तीक्ष्ण व तेजस्वी दृष्टीनें पुनः त्यानें या जगाकडे पाहिलें. तेव्हां त्याला हें सर्व प्राणिजात जन्ममृत्यूच्या प्रबळ भोंवऱ्यांत सांपडून आपल्या कर्माच्या योगानें सुखदुःखाच्या डोहांत बुडून सारखें गटंकळ्या खात आहे असें त्यास दिसून आलें. कुकर्म करून जे नरकांत खिचपत पडले होते त्यांचे हाल, दुःख, कष्ट, यातना, तळमळ, धडपड पाहून त्याचें अंतःकरण कळवळून व भडभडून आलें !

जे लोक येथें दुष्ट कृत्यें–पापकृत्यें–कपटकृत्यें–नीच कृत्यें–हंसत करीत असत, त्यांचें फल-प्रायश्चित्त-तेथें ते रडत अनुभवीत होते. या पापी लोकांना आपल्या पापकर्माचें विषारी जहर फल मरणोत्तर काय मिळतें व तें कसें भोगावें लागतें हें जर त्यांना जिवंतपणींच कळेल व दिसेल तर ते भयानें गांगरून जाऊन रक्त ओकून खचित प्राण सोड-तील ! त्याचप्रमाणें आपल्या स्वार्थासाठीं दुसऱ्याचा हेवादावा करून त्यास त्रास व पीडा देणारे जे दांडगेश्वर असतील त्यांना मरणोत्तर पशूच्या योनींत जन्म घ्यावा लागत असून, त्यांना मागेंपुढें केव्हां तरी मांसाच्या निमिषानें बाणानें अगर शस्त्रानें मारून ठार करतात, किंवा

त्यास पकडून गाडीला जुंपतात किंवा त्यावर स्वार होऊन चाबकानें सडकून काढतात, अथवा त्यावर बसून अंकुशानें डोकीवर प्रहार करतात, हें जर त्यांना जिवंतपणींच समजेल, तर दुष्टावा करण्यांस ते खात्रीनें धजणार नाहींत! हे सर्व हाल, दुःख, कष्ट, यातना, जर लोकांना जिवंतपणींच कळतील, तर शिबीराजाप्रमाणें आपल्या अंगाचे लचके तोडून खुषीनें दुसऱ्याला देण्यास ते तयार होतील!!

आतां जे कोणी सत्कर्में करणारे आहेत, तपश्चर्या करणारे आहेत, ते सर्व मेल्यावर स्वर्गाला जातात; कोणी अंतरिक्षांत संचार करीत राहतात, कोणी नाग होऊन पृथ्वीच्या पोटांत असलेल्या धनराशीवर विळखे घालून बसतात. हे सर्व शाहणे असले तरी त्यांच्या मागचा भवपाश कांहीं सुटूं शकत नाहीं. हें सर्व पाहून त्यानें अखेर असे उद्गार काढले कीं, अरेरे! हे शाहणे सुद्धा वाट चुकून अखेर जन्म-मृत्यूच्या डोहांतच डुंबत राहतात ना! कोणी कोणी वाट चुकून भलती-कडेच वाहवत जातात! पण यांना हें सर्व समजत असलें तरी उमजत नाहीं हें किती आश्चर्य! प्राणी जन्मतो, वाढतो नि मरतो; पुनः जन्मतो, वाढतो नि मरतो; पुनः आणखी जन्मतो, वाढतो नि मरतो; मग हें भवचक्र चुकवायाचें कसें? कोणत्या उपायानें तें चुकवितां येईल? याप्रमाणें विचार करीत असतां दुसरा यामही संपून गेला. व पुढें तिसऱ्या यामाला सुरुवात झाली.

वरील प्रमाणें विचार करीत असतां, पुनः त्यास नवीन स्फूर्ति आली व नव्या दमानें पुनः तो विचार करूं लागला. त्या भरांत त्यास हे पुढील विचार सुचले. ‘ जेथें जन्म आहे तेथें जरा आहे आणि जेथें जरा तेथें मरण ठेविलेलें! आणि मरण म्हणजे सर्वांत महद्दुःख!! पण जन्म होतो तो कशामुळें, तर भवामुळें म्हणजे जीवनाशेमुळें. भव कशामुळें तर उपादानामुळें (विषयासक्तीमुळें). उपादान कशामुळें तर तृष्णेमुळें, तृष्णा कशामुळें, तर वेदनांमुळें, वेदना कशामुळें, तर स्पर्शामुळें,

स्पर्श कशामुळें, तर षडायतनामुळें ( इंद्रियामुळें ), षडायतनें कशामुळें, तर नामरूपामुळें, नामरूपें कशामुळें तर विज्ञानामुळें, विज्ञान कशामुळें तर ( पुर्वजन्मीच्या ) संस्कारामुळें, आणि संस्कार कशामुळें तर अविद्येमुळें ! अर्थात् ही अविद्याच जन्माला मूळ कारण आहे ! ! आणि या अविद्येमुळेंच मनुष्य जन्म-मृत्यूच्या भवचक्रांत गुरफटला जातो ! !

याप्रमाणें विचार करीत असतां हें भवचक्र कसें चुकेल अगर चुकवितां येईल, प्राण्याची जन्ममृत्यूंतून कशी सुटका होईल याचें नीट योगस्थ मनानें विचार करून अखेर त्यानें पुढीलप्रमाणें आपला निर्णय कायम केला. मूळ अविद्येपासून संस्काराची उत्पत्ति असून पुढें संस्कारापासून विज्ञान, विज्ञानापासून नामरूप (शरीर), नामरूपापासून षडायतन, षडायतनापासून स्पर्श, स्पर्शापासून वेदना, वेदनांपासून तृष्णा, तृष्णेपासून उपादान, उपादानापासून भव, भवापासून जाति ( जन्म ), जातीपासून जरा, मरण, दुःख, शोक, दौर्मनस्य, उपायास वगैरे वगैरे अनर्थपरंपरा सुरू होते.

आणि ही अनिष्ट परंपरा चुकवावयाची असेल तर प्रथम जरा व व्याधि यांचा निरोध केला पाहिजे. त्यांचा निरोध झाला कीं मग मरण चुकतें. जरा व व्याधि चुकवावयाची तर जन्म चुकविला पाहिजे. म्हणजे जन्माचा निरोध झाला तर जरा व्याधि चुकतात. आणि भवाचा निरोध झाला तर जन्म चुकतो. त्याचप्रमाणें उपादानाचा निरोध झाला तर भव चुकतो. तृष्णेचा निरोध झाला, तर उपादान (जीवनाशा) चुकतें. अर्थात् हें उपादान चुकावयाचें तर तष्णेचा नाश केला पाहिजे. म्हणजे तृष्णेचा निरोध हेंच उपादान नाशाचें कारण आहे. तसेंच तृष्णा चुकवावयाची तर वेदनांचा निरोध केला पाहिजे आणि वेदना चुकवावयाची तर स्पर्शाचा निरोध केला पाहिजे. स्पर्श चुकवावयाचा तर षडायतनाचा निरोध झाला पाहिजे. षडायतनें चुकावयाचीं तर नामरूपाचा निरोध झाला पाहिजे. नामरूपें चुकावयाचीं तर विज्ञानाचा

निरोध केला पाहिजे आणि विज्ञान चुकावयाचें तर संस्काराचा निरोध झाला पाहिजे. हा संस्कार चुकवावयाचा तर अविद्येचा नाश झाला पाहिजे. अर्थात् हा सर्व पसारा एका अविद्येमुळें वाढला व वाढत असून त्या अविद्येचा निरोध झाला कीं मनुष्य मग जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटून दुःखमुक्त होतो. अर्थात् निर्वाणाप्रत जातो !

पण या अविद्येचा निरोध वा नाश व्हावयाचा तर मनुष्यांत वैराग्य हें नीट बाणलें पाहिजे व सत्यज्ञानाचा प्रकाश उजळला पाहिजे. तरच अविद्येचा नाश होऊन मनुष्य भवचक्रांतून मुक्त होतो. म्हणजे त्याचा संसारवृक्ष आपोआपच वठून जातो ! या विचारप्रणालीला—कार्य-कारण परंपरेला—बुद्धधर्मांत पटिच्चसमुप्पाद—प्रतीत्यसमुत्पाद—हें नांव आहे. शिवाय याला आसवक्षय—ज्ञानदर्शन व मध्यमा—प्रतिपदा असेंही म्हणतात.

एवंच ही अविद्याच सर्व संसारदुःखाचें मूळ कारण असून त्या दुःखांतून मुक्त व्हावयाचें तर तृष्णेचा नाश केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तृष्णेचा नाश व्हावयास अविद्येचा नाश झाला पाहिजे. आणि तें घडून यावयास अंगांत कडकडीत वैराग्यवृत्ति बाणली पाहिजे. व ज्ञानज्योति उजळली पाहिजे, तरच हा चमत्कार घडून येईल. वैराग्य-वृत्तीपासून ज्ञानोदय होऊन त्या ज्ञानाग्नीनें अविद्येचा नाश होतो. आणि अविद्येचा नाश झाला म्हणजे मनुष्य जान्ममृत्यूच्या मगरमिठींतून सुटून—भवचक्रांतून फुटून—सर्व दुःखशोकांतून कायमचा मुक्त होतो. नाहीं तर नाहीं.

हा निर्णय ठाम केल्यावर तिसऱ्या यामाच्या शेवटीं शेवटीं त्याची दृष्टि पुनः अधिक सूक्ष्म व तेजस्वी होऊन, तिच्या सहायानें विचार करीत असतां त्यास पुढील हीं चार आर्यसत्यें सुचलीं व पटलीं. तीं म्हणजे हीं:—१ दुःख हें पहिलें आर्यसत्य २ दुःख-समुदय हें दुसरें आर्यसत्य ३ दुःखनिरोध हें तिसरें आर्यसत्य व ४ दुःखनिरोधगामिनी

प्रतिपदा हें चौथें आर्यसत्य. हीं चार आर्यसत्यें त्यानें नीट जाणलीं आणि यामुळें त्याची अविद्या नष्ट होऊन त्याचा तृष्णारज्जु गळून पडला! व म्हणून त्याची भवसागरांतून–पुनर्जन्मांतून–सुटका झाली! व परमशांतीचा लाभ होऊन अखेर तो सिद्धार्थाचा बुद्ध झाला!! अज्ञानाचा प्रज्ञ झाला!! मर्त्याचा अमर झाला!! आणि बोधि-सत्त्वाचा सम्मासंबुद्ध झाला!!!

बोधिसत्वाला हें जें ज्ञान झालें त्याला संबोधि हें नांव असून ज्या अश्वत्थवृक्षाखालीं तें झालें त्याला संबोधिवृक्ष असें म्हणतात. हें ज्ञान झाल्याबरोबर त्याला जो आनंद झाला तो अवर्णनीय होता. आणि त्या परमानंदाच्या भरांत त्यानें हे पुढील उद्गार काढले.

**अनेकजातिसंसारं संधाविस्सं अनिब्बिसं।**
**गृहाकारकं गवेसन्तो दुक्खजाति पुनप्पुनं॥**
**गृहकारक दिट्ठोसि पुन गेहं न काहसि।**
**सब्बा ते फासुका भग्गा गहकूटं विसङ्खतम्॥**
**विसङ्खारगतं चित्तं तण्हानं खयमज्झगा॥**

धम्मपद (११–८,९)

**भावार्थः**—या भवरूप संसारांत अनेक जन्म घेऊन भ्रमण करीत करीत या गृहकाराचा म्हणजे देह धारण करणाऱ्याचा शोध करीत पुनः पुनः जन्म घेऊन दुःखराशी अनुभवीत होतो. पण आतां मला या गृहकरणाऱ्याचा शोध लागला असून पुनः मला देह धारण करण्याचें कारण आतां राहिलें नाहीं. माझीं सर्व संसारबंधनें शिथिल झालीं व देहरूपी गृहाचें शिखर कोलमडून पडलें! याप्रमाणें संसारगत सर्व कामनांचा–इच्छाआकांक्षांचा उच्छेद होऊन गेल्यामुळें माझ्या चित्तास निर्वाणाचा–परमशांतिसुखाचा–महालाभ झाला आहे!!

याप्रमाणें त्या बोधिवृक्षाखालीं संबोधिज्ञान प्राप्त करून घेतल्यावर सिद्धार्थाचा–बोधिसत्वाचा–बुद्ध होऊन विमुक्तिसुखाचा गोड अनुभव घेत

पुढें सात दिवसपर्यंत तो त्या वृक्षाखालीच बसून राहिला. त्या वेळीं रात्रीच्या तीन यामांत मध्यम प्रतिपदा म्हणजे प्रतीत्यसमुत्पाद याचें मनांत अनुलोम व प्रतिलोम पद्धतीनें म्हणजे उलट सुलट चिंतन करीत राहिला.

प्रतीत्यसमुत्पाद म्हणजे कार्यकारण परंपरा, अर्थात् दुःख कसें उत्पन्न होतें व तें कसें टाळतां येतें या दोहोंच्या सयुक्तिक विचारसणीस प्रतीत्यसमुत्पाद हें नांव आहे. बौद्धधर्माच्या मुख्य तत्त्वज्ञानाचा मूळ गाभा काय तो हा. असो. पुढें सातव्या दिवशीं रात्रीं शेवटच्या यामाच्या अखेरीस अनुलोम व प्रतिलोम प्रतीत्यसमुत्पादाचीं साक्ष पूर्ण पटल्यावर अत्यंत आनंदभरित होऊन त्यानें हे पुढील आनंदोद्गार काढले.

**'यदा हवे पातु भवन्तु धम्मा आतापिनो झायते ब्रम्हणस्स ।**
**विधूपयं तिट्ठति मारसेनं सुरियोव ओभासयमंत-लिक्खंति ॥**

**भावार्थः**—ज्या वेळीं ध्यानस्थ व उत्साही अशा ब्राह्मणाला धर्म-ज्ञानाचा साक्षात्कार होतो, त्या वेळीं तो मारसेनेचा विध्वंस करून अंत-रिक्षांतील सूर्याप्रमाणें ज्ञानतेजानें चमकूं लागतो ! !

---

## ब्रह्मदेवाची प्रार्थना

महावग्ग, १–१–५ ( विनयपिटक )

संबोधिज्ञान झाल्यावर त्या दिव्य ज्ञानानंदाचा आस्वाद घेत गोतम –आतां भगवान बुद्ध–एक आठवडाभर तेथेंच म्हणजे त्या बोधिवृक्षा-खालींच वास करून राहिला. हा आठवडा संपल्यावर दुसरा आठवडा फिरून, तिसरा आठवडा बोधिमंडळ पाहत, चौथा आठवडा सतत चालत, पांचवा आठवडा मुचिलिंद वृक्षाखालीं ध्यानस्थ होऊन बसून काढला. सहाव्या आठवड्यांत अजपालवृक्षाखालीं बसून श्रावक, परिव्राजक, निर्ग्रंथ, आजीवक इत्यादिकांशीं धर्मचर्चा करून आणि पुढें सातवा आठवडा तारायण वृक्षाखलीं बसून काढला.



सम्बोधि ( पृष्ठ १०८ अ.)

PREMIER ART PRINTING WORKS
FORT, BOMBAY

या सातव्या आठवड्याची शेवटची रात्र संपून उजाडल्यावर दंत-धावन करून, स्नान आटपून हरीतकी खाऊन बसला असतां अकस्मात त्रपुष्प व भल्लिक असे दोन वैश्य यात्रेकरू तेथें आले व त्यास भक्तिपूर्वक मधुसंयुक्त असें मधुर भोजन घालते झाले. याप्रमाणें सात आठवडे म्हणजे ४९ दिवस कांही एक न खातां उपोषणावर राहून धर्मचिंतनांत व धर्मोपदेशांत तो काळ घालवून पुढें पन्नासाव्या दिवशीं उपवासव्रत मोडून वैश्यान्न ग्रहण करून पारणें फेडलें !

एवढें झाल्यावर बुद्ध भगवंतास मोठा आनंद झाला. त्याच्या जन्माचें सार्थक झालें ! अंगीकृत कार्याचा शेवट अखेर गोड झाला, व जगांत नवीन धर्माचा उज्ज्वल प्रकाश उजळला ! ! आतां त्याच्या मनांत हा विचार आला कीं आपण हें धर्मज्ञान, हें दुःखविमुक्तिज्ञान, मोठ्या प्रयत्नानें व महत्प्रयासानें प्राप्त करून घेतलें खरें; पण तें आतां कोणास जाऊन सांगावें ? असा कोण आहे कीं तो हें माझें धर्मज्ञान अचूक ग्रहण करील ? सामान्य जनतेला तर तें खास रुचणार नाहीं. पटणारहि नाहीं व मानवणारहि पण नाहीं ! कारण ते सर्व लोक अज्ञ असून राग-द्वेष, लोभ-मोह, स्वार्थ-स्वहित इत्यादि क्षुद्र भावना व विचार यांनीं पूर्ण घेरले जाऊन भ्रांत व भ्रमिष्ट झाले आहेत. श्रद्धा तर नाहींच नाहीं. स्मृतिहि पण नाहीं. प्रज्ञा नाहीं, इच्छा नाहीं कांहींच नाहीं ! मग त्यांना माझा धर्म समजणार तरी कसा ? छे, तें शक्य नाहीं ! मीं शोधून काढलेला मार्ग लोकप्रवाहाच्या अगदीं उलट जाणारा आहे ! तो ज्ञानपूर्ण असून मोठा गंभीर आहे ! तसाच मोठा सूक्ष्म असून दुर्गमहि आहे ! तो तर्कातीत असून फक्त पंडितांनाच कळणारा आहे ! अर्थात तो सोपा व सुगम नाहीं ! ! मग अशा कामभोगासक्त अज्ञ व अल्प जनांना हा असा सूक्ष्म धर्म सांगून उपयोग काय ? जे अज्ञानानें पूर्ण पछाडलेले आहेत, त्यांना तो उमजणार कसा ? छे, तें शक्यच नाहीं ? तेव्हां अशा देहातर्पणानंद विषयमूढांना या माझ्या धर्माचा उपदेश करण्यांत मग अर्थ तरी काय ?

त्यावेळचे त्याचे तोंडांतून निघालेले प्रत्यक्ष उद्गार हे असे आहेत :-
**अधिगतो खो मे अयं धम्मो गम्भीरो दुद्दसो दुरनुबोधो सन्तो पणीता अतक्कावचरो निपुणो पंडितवेदनीयो। आलयरामा खो पनायं पजा आलयरता आलयसम्मुदिता। आलयरामाय खो पन पजाय आलयरताय आलयसम्मुदिताय दुद्दसं इदं ठानं यदि'दं इदप्पच्चयता पटिच्चसमुप्पादो; इदम्पि खो ठानं दुद्दसं यदि'दं सब्बसङ्खारसमथो सब्बूपधिपटिनिसग्गो तण्हक्खयो विरागो निरोधो निब्बाणं। अहञ्चे'व खो पन धम्मं देसेय्यं, परे च मे न आजनेय्युं, सो मम'स्स किलमथो, सा मम'स्स विहेसा'ति। अपि'स्सु मं, राजकुमार, इमा अनच्छरिया गाथा परिभंसु पुब्बे अस्सुतपुब्बाः—**

**'किच्छेन मे अधिगतं ह'लं दानि पकासितुं।**
**रागदोसपरेतेहि ना'यं धम्मो सुसम्बुधो॥**
**पटिसोतगामिं निपुणं गम्भीरं दुद्दसं अणु।**
**रागरत्ता न दक्खन्ति तमोखन्धेन आवुता'ति॥**

(मज्झिमनिकाय, ८५–२४)

भावार्थ वर दिलाच आहे. सबब वरील उताऱ्याचा पुनः अर्थ देण्याचें कारण नाहीं. असो.

अशा प्रकारचे विचार त्याच्या मनांत घोळत असतां ब्रह्मा सहंपति यास मोठी चिंता पडली. भगवान बुद्ध जर आपल्या धर्माचा लोकांना उपदेश करणार नाहीं, तर फार मोठा अनर्थ होईल. असा विचार करून ब्रह्मा सहंपति तेथें प्रत्यक्ष प्रगट होऊन बुद्धास म्हणाला:– भगवंता ! तूं जर लोकांना तुझ्या सद्धर्माचा उपदेश करणार नाहींस, तर लोकोद्धार कसा होईल ? लोकांना सत्य ज्ञान कसें मिळेल ? त्यांना सन्मार्ग कोण दाखवील ? म्हणून म्हणतों कीं तूं आतां गांवांत जाऊन लोकांना सदुपदेश करीत जगभर फिरत राहवेंस. पर्वतशिखरावर उभा राहिलेला मनुष्य ज्याप्रमाणें चारी बाजूंच्या लोकांना पाहतो,

त्याप्रमाणें, हे सुमेधा ! हे सर्वनेत्रा ! धर्मरूपी प्रासादावर चढून तूं आतां सर्व जनाकडे पाहा ! हे धर्मवीरा ! तूं संग्राम जिंकला आहेस ! ऋणमुक्त झाला आहेस ! आतां ऊठ नि जगभर फिरून धर्मप्रसार कर ! जगांत विषयतृष्णा सांडलेले असे अनेक जिज्ञासु लोक आहेत, त्यांना तुझ्या धर्मोपदेशाची जरूरी आहे. तुझा सत्यधर्म–आर्यधर्म–त्यांना समजला नाहीं, तर बापुडे व्यर्थ भवसागरांत बुडून दुःखभागी होतील ! तूं त्यांना धर्मोपदेश करशील, तर त्यांची समजूत पटून जिज्ञासूंचा उद्धार होईल ! !

हा जो मजकूर दिला आहे, तो बोधिराजकुमारसुत्तांत पुढील वचनांत गर्भित झाला आहे.

**' सेले यथा पब्बतमुद्धनिट्ठितो यथा पि पस्से जनतं समन्ततो।**
**तथू'पमं धम्ममयं सुमेध पासादमारुह्य सुमन्तचक्खु।**
**सोकावतिण्णं जनतं अपेतसोको अवेक्खस्सु जातिजराभिभूतं।**
**उट्ठेहि वीर विजितसङ्गाम सत्थवाह अनण विचर लोके।**
**देसेस्सु भगवा धम्मं अञ्ञातारो भविस्सन्ती'ति ॥**

( मज्झिमनिकाय. ८५–२५ )

याप्रमाणें ब्रह्मा सहंपति त्याची प्रार्थना करून व त्याला प्रोत्साहन देऊन तेथून अंतर्धान पावला. बुद्धाला ब्रह्मदेवाच्या म्हणण्यांतील अर्थ व मर्म समजून व त्याचा लोकांवरील कारुण्यभाव जागृत होऊन त्याला नवीन स्फूर्ति चढली व तो धर्मोपदेश करण्यास सिद्ध झाला.

---

## धर्मचक्र प्रवर्तन

महावग्ग १–१–६ ( विनयपिटक )

ब्रह्मा सहंपति याप्रमाणें सांगून निघून गेल्यावर बुद्धास धर्मोपदेश करण्याची नवीन स्फूर्ति आली व आपण महत्प्रयासानें प्राप्त करून घेतलेला धर्म आतां प्रथम कोणास सांगावा हा विचार मनांत येऊन,

पुढें कोठें जावें व कोणास गांठावें हा प्रश्न त्यास येऊन पडला. या विचारांत असतां अकस्मात् त्यास एका माणसाची आठवण झाली. तें म्हणजे आलार कलाम अर्थात् त्याचा पूर्वीचा गुरु. त्यास आतां मोठा आनंद झाला. आपला धर्म समजून घेण्याची योग्यता व पात्रता खास त्याच्या अंगांत आहे या विचारानें त्याला मोठा धीर व उत्साह चढला. व त्या भरांत चटकन तेथून उठून त्यास भेटण्यासाठीं म्हणून तो उरुवेलेला निघाला.

पण वाटेंतच त्याला दृष्टांत झाला कीं तो मागेंच इहलोक सोडून गेला. याप्रमाणें पहिला विचार फसतांच त्यास आपला पूर्वीचा दुसरा गुरु, जो भद्दक रामपुत्त त्यास जाऊन गांठून त्याच्यापुढें आपल्या धर्माची विचारसरणी मांडावी हा विचार त्याच्या मनांत येऊन त्याप्रमाणें तो त्याच्याकडे जावयास निघाला. पण वाटेंत त्याला समजलें कीं आदल्या दिवशीं रात्रींच त्यास मृत्यूनें गांठलें. झालें. त्याचे दोनहि बेत फसले. आतां पुढें ?

आतां मात्र त्याला मोठी पंचाईत येऊन पडली. पुष्कळ विचार केला. परंतु आपला धर्म समजणारा असा मनुष्यच त्यास कोणी दिसेना. याप्रमाणें मनांत विचार व शोध करीत असतां पुढें सुदैवानें त्यास आपल्या पूर्वीच्या सहाध्यायांची व साथीदारांची—पंचवर्गीय भिक्षूंची—आठवण झाली. तेव्हां त्यास थोडेंसें हायसें वाटलें. पण ते कोठें असतात याचा त्याला पत्ता नव्हता. म्हणून त्यांचा शोध करून तपास काढावा या हेतूनें फिरत फिरत वाराणशी येथें आला. तेथें त्यास ते भिक्षु तेथील ऋषिपत्तन ( इशिपत्तन, सारनाथ ) येथील मृगवनांत आहेत असें कळलें. म्हणून तो आतां तिकडे निघाला.

गोतम हा आपल्याकडेच येत आहे हें त्या सहाध्यायांनीं लांबूनच पाहिलें. तेव्हां ते आपापसांतच बोलूं लागले कीं, गडेहो, तो पाहा, श्रमण गोतम हा आपल्याकडेच येत आहे. खाऊन पिऊन स्वारी मोठी

भिक्षु :—बरं, सांगा तर.

बुद्ध :—माझा धर्म—मीं संपादिलेला धर्म—तुम्हांस सांगतों तो नीट ऐका. मी सांगतों त्या मार्गानं चला म्हणजे तुम्हालाहि माझ्याप्रमाणंच अमर ज्ञान प्राप्त होऊन तुम्ही चिरकाल सुखी व आनंदी व्हाल! दुःखमुक्त व्हाल! शाश्वत शांति मिळवाल!! त्या श्रेष्ठ लाभासाठींच ज्ञानी लोक आपलीं घरंदारं सोडून—सगळा संसार टाकून—भिक्षाचर्या पत्करतात.

भिक्षु :—मित्रा! गोतमा! तुझं म्हणणं आम्हास पटत नाहीं. खरं वाटत नाहीं. तूं पूर्वी आचरीत होतास त्या तपानं, त्या हटयोगानं, त्या उपवासव्रतानं मनुष्यापेक्षां अधिक शक्ति तुला प्राप्त झाली नाहीं किंवा उच्चतर ज्ञानदृष्टिहि लाभली नाहीं. मग आतां तर तूं सामान्य माणसाप्रमाणं दररोज अन्नग्रहण करून ऐषआरामांत राहत असतां, तपश्चर्या सोडून चैनीत दिवस काढीत असतां, तें अलौकिक सामर्थ्य—उच्चतर ज्ञान—सूक्ष्मतर दृष्टि—प्राप्त झाली असं म्हणतोस तर तें कसं शक्य आहे? आमचा त्यावर विश्वास बसत नाहीं! मुळींच नाहीं!!

बुद्ध :—भिक्षु हो! तुमचा ग्रह चुकीचा झाला आहे. तथागत चैनींत राहत नाहीं. त्यानें तपश्चर्या सोडून दिलेली नाहीं. आणि प्रयत्नहि पण टाकलेले नाहींत! भिक्षु हो! मी सत्य सत्य सांगतों कीं तथागत आतां ज्ञानपूत झाला आहे! बुद्ध झाला आहे! मुक्त झाला आहे!! त्यानं निर्वाण प्राप्त करून घेतलं आहे!! आणि म्हणून तो आतां अमर झाला आहे!!! हें मीं कसं प्राप्त करून घेतलं तें तुम्हास सांगतों, शिकवितों. त्या मार्गानं चला म्हणजे तुम्हालाहि तें दिव्य ज्ञान प्राप्त होऊन तुम्हीहि माझ्याप्रमाणंच त्या अमरपदाचं अधिकारी व्हाल! या निर्वाण प्राप्तीसाठींच—अमरत्व लाभासाठींच—ज्ञानी लोक संसार त्याग करून भिक्षु होऊन फिरतात.

भिक्षु :—नाहीं, आमचा त्यावर विश्वास बसत नाहीं.

बुद्ध:—असं म्हणूं नका. भिक्षू हो! असं म्हणूं नका. माझ्यावर गैर-विश्वास करूं नका. मी कधीं तरी खोटं बोललेलं तुम्हास आठवतं का?

भिक्षु :—नाहीं, भदंत! आपण केव्हांहि मागं तसं बोलला नाहीं.

बुद्ध :—मग आतांच कां बाबानो! माझ्यावर असा गैरविश्वास करतां? मी खरंखुरं सांगतों कीं मी आतां बुद्ध झालों आहें! मला खरं धर्मज्ञान प्राप्त झालं आहे! मी जन्ममृत्यूचा पाश तोडून दुःखमुक्त झालों आहें! या भवचक्रांतून पार निसटलों आहें! मी तें श्रेष्ठ निर्वाण गांठलं आहे!! विश्वास ठेवा! आणि माझं ऐका!

भिक्षु :—वरं, आपला धर्म-आपण मिळविलेलं ज्ञान-असं आहे तरी काय हें आम्हास ऐकूं द्या. आम्ही तो लक्षपूर्वक ऐकून घेवूं आणि मग पुढं काय करावयाचं तें ठरवूं.

बुद्ध :—ठीक आहे. मग ऐका तर. माझा धर्म काय आहे हें मी तुम्हास सांगतों. भिक्षू हो, जो मुमुक्षु आहे त्यानं हे दोन अंत सोडून दिले पाहिजेत.

भिक्षु :—ते कोणते?

बुद्ध :—पहिला अंत म्हणजे हा कीं विषयोपभोगांत व ऐषआरामांतच सुखसर्वस्व मानणं व त्यांतच रात्रंदिवस अखंड गढून बसणं. हा अंत हीन आहे! ग्राम्य आहे! अनार्य आहे व तसाच अनर्थावह आहे!!

भिक्षु :—आणि दुसरा अंत?

बुद्ध :—तो म्हणजे देहदंडण! आणि तोहि तितकाच दुःखदायक, क्लेशकारक, अनार्य व अनर्थावह आहे! या दोन टोकांस न जातां तथागतानं अंतर्दृष्टि निवळणारा, असा मधला मार्ग शोधून काढला आहे! तो मार्ग ज्ञानाला, शांतीला, संबोधीला व निर्वाणाला प्राप्त करून देणारा असा आहे!!

भिक्षु :—खरं?

बुद्ध :—अगदीं खरं.

भिक्षु :—मग तो कोणता ?

बुद्ध :—तो आर्य अष्टांगिक मार्ग.

भिक्षु :—म्हणजे ?

बुद्ध :—म्हणजे हा. सम्यक् दृष्टि, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृति, आणि सम्यक् समाधि. हा असा माझा अष्टांगिक मार्ग आहे. निर्वाण प्राप्तीसाठीं म्हणून महत्प्रयासानं व दीर्घ चिंतनानं मीं तो शोधून काढला आहे. तो कोणत्याहि टोकास न जातां दोन्हीच्या मधून जाणारा आहे. या मार्गानं जो जाईल त्यास अंतर्दृष्टि प्राप्त होऊन ज्ञानलाभ होईल. नि परमशांति लाभेल. त्याला संबोधि प्राप्त होऊन अखेर निर्वाणहि मिळेल.

भिक्षु :—झालें ? हेंच नि एवढंच कां आपण मिळविलेलं ज्ञान ?

बुद्ध:—अजून पुष्कळ आहे. मीं एकंदर चार सिद्धांत शोधून काढले आहेत. त्यांना आर्यसत्यें हें नांव दिलं आहे. जगांत सर्वत्र दुःखच दुःख भरलं आहे हें पहिलं आर्य सत्य.

भिक्षु :—म्हणजे काय ?

बुद्धः —म्हणजे हें. जन्म हें दुःख आहे. जरा हें दुःख आहे. व्याधि हें दुःख आहे. अप्रियाचा संयोग व प्रियाचा वियोग हें दुःख आहे. इच्छेप्रमाणें न होणें अगर न मिळणें हें दुःख आहे. हें सर्व संक्षेपानं सांगावयाचं म्हणजे सर्व भौतिक व अभौतिक पदार्थ हे दुःखपरिणामी आहेत.

भिक्षु :—हं, आतां समजलं. तें आम्हास मान्य आहे.

बुद्ध :—दुसरें आर्यसत्य तें हें कीं पुनः पुनः उत्पन्न होणारी आणि अनेक विषयोपभोगांत रंगून व रुतून बसणारी तृष्णा, हीच सर्व दुःखोत्पत्तीची जननी आहे. तीच सर्व दुःखाचं मूळ आहे. ही तीन प्रका-

रची आहे. कामतृष्णा, भवतृष्णा व विभवतृष्णा. ही तृष्णाच सर्व दुःखाची मायकूस आहे. जन्ममृत्यूला कारण ती हीच होय. इच्यामुळेंच संसारवृक्ष पालवतो व बहरतो! समजलं?

भिक्षु :—होय! भदंत! तें आम्हास पटलं. आतां तिसरं आर्य-सत्य कोणतं?

बुद्ध :—या तृष्णेचा वैराग्यपूर्ण ज्ञानप्राप्तीनं संपूर्ण निरोध म्हणजे नाश करावयाचा. हेंच माझं तिसरं आर्यसत्य. याला दुःखनिरोध आर्य सत्य असं नांव आहे.

भिक्षु :—म्हणजे काय होईल?

बुद्ध :—या तृष्णेचा नाश अथवा उच्छेद झाला म्हणजे सर्व दुःखाचा अंत होऊन निर्वाण प्राप्त होईल. म्हणजे या तृष्णानाशानं मनुष्य सर्व दुःखांतून मुक्त होतो! जन्ममृत्यूच्या भवचक्रांतून सुटतो! सत्यज्ञानानंदानं तृप्त व शांत होऊन, अखेर निर्वाणाप्रत जातो!!

भिक्षु :—आतां चौथें आर्यसत्य कोणतं तें सांगा म्हणजे झालं.

बुद्ध :—चौथें आर्यसत्य तें मीं तुम्हास प्रथमच सांगितलं आहे. त्यास निरोधगामिनी प्रतिपदा हें नांव मीं दिलं आहे. तोच माझा आर्य अष्टांगिक मार्ग होय. समजलं काय सांगितलं तें?

भिक्षु :—होय, भगवन्, आपण सांगितलं तें सर्व आम्हास समजलं व पटलं.

बुद्ध :—मग आतां सांगा तर पाहूं काय समजलं तें.

भिक्षु :—हें सर्व म्हणजे हा संसार दुःख आहे. हें पहिलं आर्यसत्य.

बुद्ध :—ठीक.

भिक्षु :—पुनः पुनः उत्पन्न होणारी व विषयपंकांत अखंड रुतून बसणारी तृष्णा—कीं जिला दुःखसमुदय म्हणतात—हें त्या दुःखाचं कारण आहे, हें दुसरं आर्यसत्य.

**बुद्धः**—अगदीं बरोबर.

**भिक्षु :**—त्या तृष्णेचा वैराग्यानं पूर्ण निरोध करणं हें तिसरं आर्य सत्य. यालाच दुःखनिरोध हें उपनाम आहे. अर्थात् या तृष्णानाशानंच मनुष्य जन्ममृत्यूच्या संसारचक्रांतून मुक्त होऊन निर्वाणास प्राप्त होतो. असंच नव्हं का ?

**बुद्ध :**—होय.

**भिक्षु :**—आणि चौथं आर्यसत्य तें हें कीं आपण प्रथम जो सम्यक संकल्पादि अष्टांगिक मार्ग सांगितला तो शुभमार्ग होय. त्यालाच दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा असं म्हणतात.

**बुद्ध :**—अगदीं उत्तम ! फार सुंदर ! भिक्षू हो ! हीं चार आर्यसत्यें मीं शोधून काढलीं आहेत. या मार्गानं गेलं असतां सर्व दुःखाचं निवारण खास–अगदीं खास–होतं. तृष्णेचा नाश झाला म्हणजे दुःखाचा अंत होतो. आणि निर्वाण प्राप्त होतं. तो चमत्कार घडून यावयाचा तर आर्यअष्टांगिक मार्गाचा संपूर्ण अवलंब केला पाहिजे. तो मार्ग चोखाळल्यानं सत्यज्ञान होऊन तृष्णेचा नाश होतो. अर्थात् दुःखाचा अंत होतो. आणि संबोधि प्राप्त होऊन अखेर मनुष्य निर्वाण मिळवितो ! या चार आर्य सत्याचं यथार्थ ज्ञान करून घेतल्यानं व तदनुसार आचरण केल्यानं सर्व संसार दुःखाचा परिहार होऊन शाश्वत शांतीचा परम लाभ होतो. हा धर्म, हा मार्ग मीं शोधून काढला आहे. त्याची व्यवस्था मीं लाविली आहे. पूर्वीं हा धर्म, व हा मार्ग कोणीहि ऐकलेला नव्हता. त्याचं ज्ञान, त्याचं दर्शन, त्याचा साक्षात्कार मलाच झाला आहे. मी आतां सर्व पाशांतून, सर्व दुःखातून मुक्त झालों असून मनाला अखंड शांति लाभली आहे ! भिक्षु हो ! जोंपर्यंत मला याचं यथार्थ ज्ञान नव्हतं, दर्शन नव्हतं, साक्षात्कार नव्हता तोंपर्यंत मनुष्य आणि देव, तसंच मार व ब्रह्मलोक यांचं पूर्ण ज्ञान–संबोधि–मला प्राप्त झाली नव्हती पण आतां मला त्याचं यथार्थ व पूर्ण ज्ञान झालं असल्या-

मुळं मला मनुष्य व देव या लोकांतील अत्युच्च ज्ञानाचा परम लाभ झाला आहे ! माझ्या मनाची शांति आतां पूर्ण व अढळ झाली आहे ! हा माझा शेवटचाच जन्म होय ! मला आतां पुनर्जन्म नाहीं ! !

याप्रमाणें बुद्धाचें भाषण ऐकून त्या भिक्षूंना मोठा आनंद झाला. भगवंताचें त्यांनीं अभिनंदन केलें व त्यांवर त्यांची श्रद्धा बसली. आणि अखेर ते त्यांचे शिष्य व्हावयास तयार झाले !

बुद्धाचा हा धर्मोपदेश चालला असतांना आयुष्मान कौण्डिण्याचें मन निवळून बुद्धि उजळत चालली. आणि 'जें कांहीं उत्पन्न होणारें तें सर्व नाशवन्त आहे' अशा प्रकारची निर्मल धर्मदृष्टि लाभून त्यास श्रेष्ठ ज्ञान झालें. त्या पंचवर्गीयांपैकीं प्रथम कौंडिण्यास बुद्धोपदिष्ट धर्माचें ज्ञान झालें म्हणून त्यास आज्ञात कौंडिण्य हें नांव पडलें.

भगवंताचा उपदेश संपल्यावर तो आज्ञात कौंडिण्य भगवंतास म्हणाला—भगवन् ! मला आपल्या हातून प्रव्रज्या व उपसंपदा मिळूं दे.

भगवान म्हणाले--'बरं आहे. भिक्षो, ये. हा माझा धर्म सुंदर प्रकारानं व्याख्यात आहे. चांगल्या तऱ्हेनं दु:खाच्या नाशासाठीं ब्रह्म-चर्याचं पालन कर.

या उपदेशानेंच त्याची उपसंपदा झाली.

यानंतर वप्प, भद्दिय व इतर दोन भिक्षु यांसहि वरीलप्रमाणेंच ज्ञान होऊन त्यांनींहि भगवंताकडून उपसंपदा घेतली.

तो काल पावसाळीचा असल्यामुळें बुद्धांनीं तीन महिने तेथेंच राहून काढले. त्या वेळीं ते पंचवर्गीय भिक्षु म्हणजे १ कोण्डञ्ञ (कौण्डिण्य), २ अस्सजि (अश्वजित्), ३ वप्प (वाप्प), ४ महा-नाम व ५ भद्दिय (भद्रिक) असे पांच ब्राह्मण ब्रह्मचारी आणि त्यांच्याबरोबर भगवान बुद्ध असे सहाजण तेथें होते. त्यांपैकीं तिघे जण गांवांत जाऊन भिक्षा मागून आणीत व त्या भिक्षान्नावर सहा जणांचा उदरनिर्वाह होई.

या तीन महिन्यांत भगवान दररोज या भिक्षूंना पुढें घेऊन रूप अनित्य आहे, वेदना अनित्य आहे, संज्ञा अनित्य, संस्कार अनित्य, आणि विज्ञान अनित्य आहे. म्हणजे पंच स्कंध हे अनित्य व म्हणून अनात्म आहेत. हेंच थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जें अनित्य तें दुःख व जें दुःख तें अनात्म.

---

## बीज अंकुरलें !

महावग्ग १-१-८ ( विनय पिटक )

भगवान बुद्ध ऋषिपत्तन-मृगदाव येथेंच तो पावसाळा समग्र राहून काढला. त्या वेळीं वाराणशी येथें एक धनकुबेर श्रेष्ठी (वैश्य) राहत होता. तो मोठा धनिक असून तेथील श्रेष्ठी वर्गांत प्रमुख व अग्रेसर होता. त्याला यश नांवाचा एकुलता एक सुंदर मुलगा असून आईबापाचा तो मोठा लाडका होता. घरीं संपत्ति विपुल असल्यामुळें व यश हा फार लाडका असल्यामुळें, तो वयांत आल्यावर बापानें त्याच्या सुखविलासार्थ स्वतंत्र व सुंदर असे तीन रमणीय महाल बांधवून दिले. तेथें राहून अनेक सुंदर व तरुण प्रेमरमणींबरोबर सुखोपभोग व श्रृंगारविलास करण्यांत तो रात्रंदिवस मग्न झाला. 'खा, पी, चैन कर' हा देहपर्णणानंद गुलाबरावांचा महामंत्र तो सारखा जपत होता इतकें सांगितलें, म्हणजे आणखी अधिक सांगण्याची जरूरी नाहीं.

एके दिवशीं रात्रीं नाचरंग, गाणेंवजावणें, थट्टामस्करी वगैरे प्रेमप्रमोदविलास झाल्यावर तेथें जमलेल्या सुंदर व तरुण स्त्रिया तेथेंच झोंपीं गेल्या. यशहि तेथेंच त्यांच्या शेजारी सुवर्ण मंचकावर शयन करता झाला. पुढें कांहीं वेळानें प्रभातकालीन गार वाऱ्यानें त्यास जाग आली, व तो चटकन् उठून बसला. दिव्याचा खोलीभर मंद

प्रकाश पडला होता. त्या प्रकाशांत त्यानें तेथें झोंपलेल्या स्त्रियांकडे पाहिलें. किती हिडिस देखावा तो ! त्यांपैकीं एकटी तंबोऱ्याला आलिं-गून निद्रासुख अनुभवीत होती ! दुसरी मृदंगास कवटाळून झोंपली होती ! कांहींच्या तोंडांतून लाळ गळत होती ! कोणाचें मोठमोठ्यानें घोरणें चाललें होतें ! कोणी कांहींच्याबाहीच बडबडत होत्या ! कोणाचें वस्त्र अस्ताव्यस्त होऊन सगळें अंग उघडें पडलें होतें ! कोणी हातपाय पसरून आ वासून पडल्या होत्या ! हा सर्व विलक्षण व उद्वेगकर देखावा पाहून त्याच्या मनांत लज्जा व किळस उत्पन्न होऊन वैराग्याचा एकदम झटका आला ! व त्या आवेगांत चटकन् उठून घराबाहेर पडून 'हा ताप ! ! हा पीडा ! हा दुःख ! असें ओरडत पळत सुटला.

तो अगदीं उषःकाल होता. भगवान बुद्ध लवकर उठून 'मृगदाव' वनांत सहज फिरावयास चालले होते. त्या वेळीं त्यांच्या कानांवर 'हा ताप ! हा पीडा ! हा संताप ! ! ' असा करुण आवाज ऐकूं आला. त्यांनीं बाजूला वळून पाहिलें तो एक सुंदर वस्त्रालंकारभूषित तरुण 'हा ताप ! हा संताप ! हा पीडा ! ' असें ओरडत आपल्याकडेच धांवत येत आहे असें त्यांना दिसलें. भगवान तेथेंच उभे राहिले तों इतक्यांत यश वरीलप्रमाणें ओरडत ओरडत त्यांच्याजवळ आलाच. त्याला पाहून भगवान म्हणाले–येथें ताप नाहीं ! पीडा नाहीं ! संताप नाहीं ! दुःख नाहीं ! !

यशानें ते शब्द ऐकून भगवंताकडे निरखून पाहिलें. तों त्याच्या संतप्त अंतकरणांत एकदम शांतीचा मधुर गारवा सुटला. त्याचा आत्मा आतां समाधानला व मन हलुवारलें ! भगवान म्हणाले, 'हे पीडित मनुष्या ! तूं कोण ?'

यश म्हणाला :—भदंत, मी यश, येथील धनकुबेर श्रेष्ठीचा मुलगा.

भगवान :—मग असा ओरडत कां सुटला आहेस ?

यश :—देवा ! काय सांगूं माझा ताप ! मी या संसारसुखाला विटलों आहें ! कोठें जाऊं नि कोणाला भेटूं ? कोण माझा हा ताप नि पीडा नि दु:ख शमन करील ?

भगवान :—खरोखर तुला संसाराचा वीट आला आहें काय ? खरोखर तुला वैराग्य प्राप्त झालें आहे काय ?

यश :—होय, भदंत ! मी या संसारसुखाला विटलों आहे ! खरो-खर मला तो नकोसा झाला आहे ! मला आपण यांतून मुक्त कराल काय ? मला त्या आपत्तींतून सोडवाल काय ?

भगवान:—तुला धर्म समजावून घेण्याची इच्छा आहे काय ? तुझ्यांत खरोखर वैराग्य वृत्ति बाणली आहे काय ? तुला संसाराचा मनापासून वीट आला आहे काय ?

**यश** :—होय, भदंत ! मी संसाराला खराखुरा विटलों आहें. पण अजून मुनी झालों नाहीं. मग मला धर्माचें रहस्य कळणार कसें ? व या पीडातापासून मुक्त होणार कसा ?

**भगवान** :—ज्याचें मन इंद्रियावर सत्ताधीश झालें आहे, त्यानें अंगावर सुंदर वस्त्र धारण करून रत्नालंकार चढविले असले, तरी तो खरोखर मुनिच आहे ! धर्म हा बाह्य वेषावर नाहीं. अंत:शुद्धीवर आहे ! संसारांत ज्याचें मन मग्न झालेलें असतें, त्यानें अरण्यांत राहून अंगावर यतीचीं वस्त्रें धारण केलीं तरी तो कांहीं मुनि होऊं शकत नाहीं ! तो खरा संसारीच होय ! ज्यानें मन मुंडलें तोच खरा श्रमण ! व तोच खरा मुनि ! ! ज्यानें स्वार्थबुद्धीवर पाणी सोडलें व सुखेच्छावर जय मिळविला त्यानें काषायवस्त्रें धारण केलीं काय अथवा तुझ्या-सारखीं उंची सुंदर वस्त्रभूषणें धारण केलीं काय, त्यांत कांहीं फरक नाहीं. समजलें काय सांगितलें तें ?

यशानें मान हलवून ‘ होय’ म्हणून उत्तर दिलें. नंतर भगवंतांनीं त्याला विहारांत नेऊन त्यास पुढें बसवून घेऊन आपल्या मधुर अमृत-

मय वाणीनें सुंदर धर्मोपदेश केला व सांसरिक दु:ख, त्या दु:खाचें कारण, त्या दु:खाचा नाश व त्या दु:खनाशाचा मार्ग या चार आर्यसत्यांचा त्याच्या मनावर चांगला ठसा उमटवून प्रपंचाचें चंचल व दु:खद स्वरूप उघड करून दाखविलें. तें ऐकून यशाचें मन अधिकच वैराग्यपर बनून चटकन उठून त्यानें भगवंताचे पाय धरून त्यांस साष्टांग नमस्कार घातला व त्यांच्या उपदेशाप्रमाणें प्रव्रज्या ग्रहण करून भगवंताचा शिष्य झाला.

पुढें ही बातमी यशाचे मित्र–विमल, सुबाहु, पूर्णजित, व गवांपति–यांस समजतांच ते धांवतच यशाकडे आले. तेथें आल्यावर त्यांनीं त्याची भेट घेऊन सर्व हकीकत विचारून घेतली. यशाची ती शांत मुद्रा व समाधान वृत्ति पाहून त्यांस मोठा अचंबा वाटला व थोडा बहुत आनंदहि झाला. भगवंताचें दर्शन घेण्याची गोष्ट त्यांनीं यशाजवळ काढल्यावरून त्यानें त्या चौघांना घेऊन बुद्धाचें दर्शन करविलें. गुरुदेवांनीं त्यांना जवळ बसवून घेऊन सदुपदेश केला व तो त्यांना पटला व मानवला. म्हणून ते चारहि जण भगवंतास तेथल्या तेथें शरण गेले. लगेच डोकें व दाढी मुंडून प्रव्राज्या घेऊन त्यांच्या भिक्षुसंघांत दाखल झाले. यशाचे आणखी पन्नास मित्र होते त्यांना हें वर्तमान कळतांच तेहि भगवंताजवळ येऊन दीक्षा घेऊन त्या संघांत समाविष्ट झाले ! याप्रमाणें एकंदर चौपन भिक्षु यशाबरोबर संघांत येऊन प्रविष्ट झाले.

यशाच्या पूर्वी कांहीं दिवस अगोदर कालदेवल असित ऋषीचा भाचा नारद हा भगवंताचा उपदेश ऐकून प्रव्रज्या घेऊन त्यांच्या संघास येऊन मिळाला होता. एकूण पहिल्या वर्षावासाच्या अखेर म्हणजे तीन महिन्यांत सहा भिक्षूंचा आद्य संघ एकसष्टपर्यंत वाढला ! बीजाला अंकुर फुटला व भगवंताचा धर्म वाढीस लागला.

नंतर भगवान वाराणशी सोडून राजागृहास जाण्यास निघाले. वाटेंत कापास्यवन लागलें. तेथें भद्रवर्गीय तीस क्षत्रिय कुमारांनीं भगवंताचें

दर्शन घेऊन, त्यांचा उपदेश ऐकून, त्यांचें शिष्यत्व पत्करून म्हणजे भिक्षु होऊन-संघांत प्रवेश केला. पुढें तेथून तळ हालवून भगवान पुढील मार्गास लागले.

---

## काश्यप-बंधूंची दीक्षा

महावग्ग, १-१-१४

कापास्य वनांतून निघून बुद्ध देव फिरत फिरत नैरंजरा नदीच्या कांठावर असलेल्या उरुवेला येथें आले. तेथें कृष्णाचे भक्त व अग्नीचे उपासक अशा जटिलांची वस्ती बरीच होती. त्यांच्यांत काश्यप हा सर्वांत अधिक मान्यतेस पोंचला होता. तो अत्यंत जाडा विद्वान असून कट्टर अग्नि-उपासक होता. मोठा धर्मज्ञ म्हणून त्या मगध राज्यांत त्याची मोठी ख्याती होती. त्याच्याजवळ पांचशें शिष्य विद्या शिकण्यास म्हणून येऊन राहिले होते. याला बिल्व काश्यप असें म्हणत.

उरुवेला येथें आल्यावर बुद्ध काश्यपाच्या घरीं आले. आणि त्यास म्हणाले, ' काश्यपा, मला तुझ्या येथें आजची रात्र काढावयाची सोय होईल काय ? मला कांहीं नको. फक्त निजावयास तेवढी जागा दे म्हणजे झालें. तुझ्या आश्रमांत जुनी अग्निशाला आहे ती दिलीस तरी चालेल. आजची रात्र मी तेथें काढीन. होईल का तेवढी सोय ?

बुद्धाचें तें दिव्य तेज व गंभीर मुद्रा पाहून काश्यपाला मोठें आश्चर्य व धन्यता वाटली. तो श्रेष्ठ मुनी व धर्मप्रवक्ता असावा असा त्याचा ग्रह झाला. पण तो मनांत म्हणाला ' तो जर माझ्या अग्निशाळेंत जाऊन राहील, तर तेथील घटसर्प त्यास खात्रीनें दंश करील. अर्थात् बिचारा मरून जाईल ! ही वस्तुस्थिति त्यास कळवावी म्हणून तो भगवानास म्हणाला: मुनिवर्य ! माझ्या अग्निशाळेंत राहावयास मी जागा देईन हें खरें. पण एक अडचण आहे.

बुद्ध:—ती कोणती, काश्यपा?

काश्यप :—तेथें एक महा विषारी नागराज राहत आहे. रात्रभर तो शाळेंत फिरत असतो. तुम्ही त्याच्या नजरेस पडलां कीं खात्रीनें तो तुम्हास दंश करील. या भीतीनें मला आपणास तेथें जागा देण्यास संकोच वाटतो.

बुद्ध :—ती नको काळजी तुला, काश्यपा! तेवढीच ना तुझी भीति?

काश्यप :—होय, मुनिवर्य!

बुद्ध :—मग ती भीति नको तुला. आज रात्रीं मी तेथें राहीन व नाग आल्यास पाहून घेईन. फक्त मला अग्निशाळेंत जागा दे म्हणजे झालें.

यावर काश्यप कांहीं बोलला नाहीं. भगवंताच्या इच्छेप्रमाणें त्यानें त्यांस रहावयास जागा दिली. बुद्ध तेथें जाऊन बसले. रात्र झाली. पुढे सर्वत्र सामसूम झाल्यावर मध्यरात्रीच्या सुमारास नाग तेथें आला. अबब! केवढा भयंकर प्राणी तो! असा लांबी नि असा लठ्ठ!! तेथें येतांच त्यानें फणा उंच करून इकडे तिकडे पाहूं लागला. त्याला तेथें बुद्ध दिसले. त्यांना पाहतांच अंगांत रागाचा संचार होऊन स्वारी फुसकारूं लागली. भगवान जागृत होतेच. नाग आल्याचें त्यांनीं ओळखिलें. व चुटकन् उठून पद्मासन घालून आपल्या तयारींत बसले.

त्यांना पाहतांच नागराजानें आपल्या तोंडांतून विषारी धुराचे लोळ सोडण्यास सुरुवात केली. भगवान त्या घटसर्पाला पाहून मुळींच डगमगले नाहींत. उलट शांत व स्वस्थच राहिले. तें पाहून नागाला अधिकच चीड आली! आतां धुराऐवजीं विषारी ज्वाला तो ओकूं लागला!! त्यासरशी भगवंताच्या शरीरांतूनही ज्वाला निघूं लागल्या. ज्वाला म्हणजे काय? प्रत्यक्ष ऊग्र व प्रखर अग्निनारायणच! त्यांत कांहीं तांबड्या, कांहीं निळ्या, कांहीं पिवळ्या, कांहीं गुलाबी, कांहीं लाल अशा विविध रंगांच्या महाप्रखर नि अत्यंत तेजस्वी ज्वाला होत्या

त्या ! हें पाहून नागराजाचा संताप अधिकच वाढला व त्या आवेशांत फाडकन् आपला फणा त्यानें जमिनीवर जोरानें आपटला.

चमत्कार हा कीं तेथेंच तो निश्चेष्ट होऊन पडला ! नंतर भगवंतांनीं तेथून उठून नागाजवळ जाऊन, त्याला उचलून घेऊन आपल्या कमंडलू शेजारी ठेवून दिलें.

रात्रीं अग्निशाळेंत प्रचंड प्रकाश पडलेला पाहून काश्यप मनांत म्हणाला कीं, अरेरे ! बिचारा गोतम फुकट प्राणास मुकला ! ! केवढा अनर्थ हा ! !

दुसरे दिवशीं पहाटेस उठून काश्यप काय प्रकार घडला हें पाहण्यासाठीं म्हणून अग्निशाळेंत आला. त्याला पाहून बुद्ध म्हणाले, ' ये, काश्यपा, आलास, छान झालें. हा पाहा तुझा नाग ! माझ्या तेजानें निस्तेज होऊन माझ्या कमंडलूजवळ कसा निश्चेष्ट पडला आहे ! मी जिवंत राहिलों आणि तोच मृत झाला !'

भगवान जिवंत असून शांत व सुरक्षित आहेत हें पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. आणि आनंदहि झाला. तो मनांतच पुटपुटला ' शाक्यमुनि खरोखर मोठा श्रमण आहे ! आणि त्याची योगशक्तिहि पण मोठी विलक्षण आहे ! ' हा चमत्कार पाहून काश्यपाची आदरबुद्धि अधिकच वाढली, व तो त्यांना म्हणाला, 'भदंत ! आणखी कांहीं दिवस माझ्या घरींच राहा ना ! मी आपली योग्य बरदास्त ठेवीन. त्याच्या विनंतीला मान देऊन भगवान तेथें कांहीं दिवस राहिले.

काश्यपाच्या आश्रमाशेजारीं एक सुंदर आमराई होती. तेथें त्यानें भगवंताची व्यवस्था केली. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर एका रात्रीं अंतरिक्षांतून चार देव त्यांच्याजवळ आले. अर्थात् ते तेथें आल्याबरोबर त्यांचा प्रकाश अत्यंत देदीप्यमान् असल्यामुळें त्या आमराईभर तो सुंदर शुभ्र प्रकाश उजळून राहिला. त्यांच्या दिव्य देहाचा झगझगीत प्रकाश होता तो ! ते देव येऊन भगवंताच्या चारी बाजूस जाऊन उभे राहिले

व त्यांचें त्यांचें संभाषण चालू झालें. भगवान त्यांना उपदेश करीत होते. उपदेश संपल्यावर देव तेथून परत निघून गेले. अर्थात् तो प्रकाशहि तेथून अस्त झाला. हा प्रकार रात्रीं काश्यपानें पाहिला.

दुसरे दिवशीं सकाळीं तो भगवंताच्या भेटीस आला तेव्हां तो त्यांना म्हणाला, 'भदंत! काल रात्रीं आपल्याकडे आलेले पुरुष कोण? त्यांच्या तेजानें सर्व आमराई प्रकाशमय झाली होती.

'काश्यपा?' भगवान म्हणाले, 'ते अंतरिक्षांतील देव होते नि माझा उपदेश ऐकावयास आले होते!'

'हं, अस्सं!' असें म्हणून भोजनास लवकर येण्यास सांगून तेथून उठून चालूं लागला. वाटेंत तो मनांत म्हणूं लागला 'शाक्यमुनीचा महिमा फार मोठा आहे. देव देखील त्याच्या दर्शनास येतात. पण माझ्याइतका कांहीं तो पुण्यवान नाहीं!'

यानंतर पुढें थोड्याच दिवसांची गोष्ट. चमत्कार असा झाला कीं, ते दिवस पावसाचे नसतां अकस्मात तेथें मोठा पाऊस पडला. तो इतका कीं, जमिनीवर पाण्याचा प्रचंड पूर आला. आणि जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें! नैरंजरा नदी त्या वेळीं दुथडी भरून समुद्राप्रमाणें वाहूं लागली. आमराई कांठावरच असल्यामुळें तेथें पाण्याचा समुद्रच सांचला होता!

काश्यपास वाटलें कीं बुद्ध त्या महापुरांत सांपडून वाहून बुडून मरून गेले असतील. काय प्रत्यक्ष स्थिति आहे हें पाहावें म्हणून एक नाव घेऊन तींतून तो तेथें आला. आणि पाहतो तों बुद्धदेव सुरक्षित आहेत! ते जमिनीवर यथेच्छ इकडे तिकडे फिरत आहेत! पाणी त्यांच्याजवळ न येतां दुरूनच परतून जात आहे!!

काश्यप त्यांना पाहून नावेंतूनच म्हणाला 'भदंत! आपण सुरक्षित आहां ना?'

'होय' भगवान उत्तरले, 'काश्यपा, मी सुरक्षित आहें. अकालींच केवढा पाऊस हा!' असें म्हणत म्हणतच ते आकाशांत चढले आणि अंतराळांतून चालत त्याच्या नावेंत उतरून बसले.

हा प्रकार पाहून काश्यप विस्मयानें दिङ्मूढ होऊन गेला व मनांतच म्हणाला कीं, खरोखर शाक्यमुनि फार महिमाशाली आहे. त्याची योगमाया फार अद्भुत आहे! तरी पण माझी सर त्याला येणार नाहीं! माझ्याइतका तो पुण्यवान नाहीं! खचित नाहीं!!

इतक्यांत तेथें एक यज्ञमहोत्सवाचा प्रसंग आला. बुद्ध तेथें आल्यापासून लोक त्यांच्या दर्शनास व उपदेश ऐकण्यास नेहमी येऊं लागले व त्यांची लोकांत प्रसिद्धि पसरून लोकादर वाढत चालला. याचा कश्यपाला मनांतून हेवा वाटूं लागल्यास त्यांत अस्वाभाविक असें कांहीं नाहीं. मनुष्य स्वभावच आहे तो!

महायज्ञाचा दिवस अगदीं जवळ आला. त्या प्रसंगीं अंगमगध देशांतील सर्व लोक खाद्यभोज्य पदार्थ घेऊन तेथें येत असत व त्यामुळें काश्यपास फार फायदा होत असे. पण या खेपेस बुद्ध तेथें असल्यामुळें त्याला मोठी चिंता लागून राहिली. तो मनांत म्हणू लागला—'काय करावें? मोठा पेंच आला. यज्ञमहोत्सव जवळ आला. ठिकठिकाणचे पुष्कळ लोक जमणार. आणि ते अवश्य शाक्य मुनीच्या दर्शनास जाणार. त्याचा उपदेश ऐकणार व त्याचे धन्यवाद गाणार. असें झालें म्हणजे आपणास कोणी विचारणार नाहीं. याला काय युक्ति योजावी, काय तोड काढावी, नि काय उपाय करावा, याचा त्यास मोठा विचार येऊन पडला. अर्थात् या विचारानें तो बेचैन व नाउमेद झाला, हें निराळें सांगावयास नकोच. पण उघड कांहीं बोलतां येईना व कांहीं करतां येईना.

उत्सवाचा दिवस उजाडला. त्या दिवशीं भगवान बाहेर कोठें दिसले नाहींत. सबंध उत्सव संपेपर्यंत ते कोठेंच दिसले नाहींत व कोणास भेटले नाहींत. कोठे होते कोणास ठावूक!

उत्सव संपल्यावर काश्यप भगवानाकडे आला व म्हणाला, 'भदंत, आपण माझ्या यज्ञमहोत्सवांत दिसलां नाहीं. तब्येत–बिब्येत बिघडली होती कीं काय?'

भगवान् उत्तरले,–'काश्यपा! मी उत्सवांत बाहेर लोकांना न दिसलों तर बरें होईल, असें तूंच मनांत म्हणत होतास ना? तुला चिंता पडली होती ना? झालें मग. मीं तें समजलों आणि तुझा मान राखण्याकरितां मी उत्तरकुरूंतील अनवलक्ष सरोवरकडे गेलों होतों झालं.'

हें ऐकून काश्यपास महदाश्चर्य वाटलें व तो मनांत अगदीं मेल्या-सारखा झाला. तरी पण तो मनांत म्हणालाच कीं, 'शाक्यमुनि मोठा आहे खरा. पण माझी सर कांहीं त्याला येणार नाहीं!'

काश्यपाला छेडण्याची ही संधि उत्तम आहे असें समजून भगवान त्याला चटकन् म्हणाले कीं, 'काश्यपा! तूं ज्ञानी आहेस हें खरें. आणि सत्य जाणतोस हेंही खरें; पण तें सर्व तुझें व्यर्थ आहे. याचें कारण असें कीं तुझ्या अंतःकरणांतून अजून अहंकाराचें ठाणें उठ-लेलें नाहीं. मत्सर हा खरोखर वाईट आहे. तो जोंपर्यंत तुझ्या अंतः-करणांत दबा धरून आहे, तोंपर्यंत तुझ्या अंतःकरणांत सत्यज्ञानाचा खरा प्रकाश केव्हांहि उजळणार नाहीं. तूं आपणास समजतोस तितका पवित्र झाला नाहींस! तो तुझा भ्रम आहे. मत्सराचा शेवटचा धागा तेवढा तूं आतां तोडून टाक म्हणजे तूं बंधनांतून मुक्त होशील. तृष्णा टाकून दे! सन्मार्गाच्या वळणावर येण्याला हा एवढाच उपाय तुला मोकळा आहे. बाकीचें सर्व तुझें व्यर्थ होय. आतां माझें शेवटचें ऐक—

**'न नग्न–चरिया न जटा न पङ्का, नानासका थण्डिलसायिका वा।**
**रजोजल्लं उक्कुटिकप्पधानं, सोधेंति मच्चं अवतिण–कंखं॥'**

ध. प. १०–१३

अर्थ:—ज्याची तृष्णा दूर झालेली नाहीं असा मनुष्य नग्न राहून, जटा वाढवून, अंगाला माती फांसून, उपाशीं राहून, अग्निसेवा करून, जमिनीवर निजून, भस्म लेपन करून, तपश्चर्या करून केव्हांही पवित्र होऊं शकत नाहीं ! या गोष्टी त्यास पवित्र करण्यास मुळींच समर्थ नाहींत ! आणि म्हणून त्या व्यर्थ होत !

हा उपदेश ऐकून काश्यपाच्या मनांत चक्क प्रकाश पडला व त्यानें उठून भगवंताचे पाय धरले आणि म्हटलें—भगवन् मला क्षमा करा ! मी आपणास शरण आलों आहें. मला प्रव्रज्या देऊन आपल्या भिक्षु-संघांत दाखल करून घ्या !

बुद्धांनी त्यास त्याच्या इच्छेप्रमाणें दीक्षा देऊन त्यास संघांत समील करून घेतलें. त्याच्याबरोबर त्याचे पांचशें शिष्य होते तेही दीक्षा घेऊन संघांत समाविष्ट झाले. पुढें ही गोष्ट काश्यपाच्या दोन भावांस समजली. तेव्हां त्यांनींहि बुद्धास शरण येऊन आपापल्या अडीचशें शिष्यांसहित दीक्षा घेऊन संघांत प्रवेश केला. याप्रमाणें भगवान बुद्धदेव तीन काश्यप बंधु व त्यांचे हजार शिष्य यांना दीक्षा देऊन, त्यांना बरोबर घेऊन पुढें कूच करते झाले.

---

## राजा बिंबसारास उपदेश

महावग्ग, १–१–१७

याप्रमाणें सुप्रसिद्ध महाविद्वान काश्यप बंधुत्रयांनीं बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन भिक्षुसंघांत प्रवेश केला, ही नवलकथा पुढें विद्यु-द्वेगानें चारी दिशेस वणव्याप्रमाणें पसरून लोकांच्या चर्चेचा मुख्य विषय होऊन बसली. जावें तिकडे बुद्ध भगवंताच्या गोष्टीच गोष्टी ! त्यांची तपश्चर्या, त्यांचा उपदेश, त्यांचा थोर महिमा, अगाध ज्ञान, व अलौकिक नवलकथा, हाच एक विषय सर्वांच्या—लहानथोरांच्या—तोंडीं

होऊन बसला. ज्याला त्याला भगवंताकडे जाण्याची हांव सुटली व त्यांच्या दर्शनास लोक फार आतुर झाले! नित्य त्यांच्या दर्शनास व उपदेश ऐकण्यास लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या व त्यांचें निवासस्थान पुण्यक्षेत्राचें एक मोठें तीर्थ बनलें!!

अशा रीतीनें उरुवेला येथें कांहीं दिवस राहून भगवान तेथून आपला तळ हालवून गयाशीर पर्वतावर येऊन राहिले आणि मग तेथून राजगृहाला आले. तेथें आल्यावर त्यांनीं आपला मुक्काम लट्ठीवनांत केला. या वेळीं त्यांचा शिष्यपरिवार बराच मोठा होता.

भगवान बुद्ध देव राजगृहाशेजारीं लट्ठीवनांत येऊन उतरले आहेत ही बातमी राजा बिंबसारास लागतांच तो आपल्या सर्व परिवारानिशीं दरबारी थाटानें त्यांच्या दर्शनास गेला. तेथें गेल्यावर भगवंताजवळ जाऊन, त्यांस दोन्ही हात जोडून नमस्कार करून मोठ्या अदबीनें बाजूस सरकून बसला. भगवंतांनीं त्या वेळीं त्यास आपल्या अमृत वाणीनें अत्यंत सुंदर उपदेश केला आणि तो राजास फार आवडला. उपदेश संपल्यावर राजा हर्षचित्त होऊन दोन्ही हात जोडून म्हणाला:—भगवन्! आपलें दर्शन होतांच मला माझी पूर्वस्मृति जागृत झाली. पूर्व वयांत मला पांच गोष्टींची मोठी इच्छा होती.

**भगवान:**—त्या कोणत्या? राजा!

**बिंबसार:**—मी राजा व्हावें ही पहिली इच्छा. माझ्या राज्यांत भगवान बुद्ध यावेत. ही दुसरी इच्छा.

**भगवान:**—आणि तिसरी?

**बिंबसार:**—मी तथागताचें पूजन करावें ही तिसरी इच्छा. भगवंतांचा उपदेश ऐकावा ही चौथी आणि त्यांच्या धर्माचीं श्रेष्ठ तत्त्वें ऐकून समजून घ्यावीं ही पांचवी व अखेरची इच्छा. त्याप्रमाणें, भगवन् आज सर्व घडून आलें. केवढा भाग्यवान मी! मी कृतकृत्य झालों आणि माझा जन्म धन्य झाला! आपला उपदेश अमोल्य आहे.

**भगवानः**—तुला पटला काय ?

**बिंबसारः**—होय, भगवन् ! मला तो अगदीं आवडला नि संपूर्ण पटला ! धर्मविचारांत व आचारांत आजकाल जी उलथापालथ झाली आहे ती भगवंतांनीं जुळवून विसकटलेली घडी पुनः व्यवस्थित बसविलेली आहे. आजपर्यंत जें कांहीं गुप्त ठेवण्यांत आलें होतें तें भगवंतांनीं उघड करून दाखवून सामान्य माणसाचा भ्रम दूर केला आहे, वाट चुकलेल्या मुमुक्षूला सत्यज्ञानाचा सरळ मार्ग दाखवून त्याला शाश्वतशांतीचा पूर्ण लाभ करून दिला आहे. अज्ञानांधकारांत भगवंतांनीं ज्ञानदीप पाजळून सर्वत्र प्रकाशच प्रकाश उजळून सोडला आहे ! मी बुद्धांला शरण आलों आहें ! धर्माला शरण आहें ! संघाला शरण आलों आहें ! !

असें म्हणून तो बुद्धाचा उपासक झाला.

नंतर तेथून निघावयाच्या वेळीं हात जोडून भगवंतास म्हणाला:—'भगवन् ! गुरुदेवांनीं आपल्या सर्व भिक्षुगणांसहित उदईक माझे घरीं भोजनास येण्याची कृपा करावी.' या विनंतीस तथागतांनीं मौन स्वीकारून मूक सम्मति दिली.

दुसरे दिवशीं वाड्यांत भोजनाचे उत्तम उत्तम पदार्थ तयार करवून भोजनाची सर्व सिद्धता झाल्यावर भगवंतास त्याप्रमाणें वर्दी पोंचविण्यांत आली. वर्दी येतांच भगवान उठून चीवर धारण करून, हातांत भिक्षापात्र घेऊन आपल्या भिक्षुपरिवारासहित राजवाड्याकडे निघाले.

राजा वाड्याच्या मुख्य दारावर त्यांची मार्गप्रतीक्षा करीत उभा होता. बुद्ध तेथें येतांच दोन्ही हात जोडून नमस्कार करून आदरसत्कारपूर्वक त्यांना वाड्यांत घेऊन जाऊन भोजनशाळेंत योग्य ठिकाणीं नेऊन बसविलें. नंतर सर्व भिक्षु लोक आपापल्या स्थानावर बसल्यावर सर्वांना सुग्रास भोजनाची उत्तम मेजवानी दिली.

भोजन करून सर्वजण संतृप्त व संतुष्ट झाल्यावर राजा हात जोडून भगवंतास नम्रतापूर्वक म्हणाला, भदंत ! माझी वेळुवन नांवाची सुंदर बाग गांवापासून थोडयाच अंतरावर आहे. भगवान येथें आले म्हणजे त्यांस उतरण्याची व राहण्याची तशी चांगली सोय नाहीं. ती अडचण दूर व्हावी म्हणून मी माझी ती वेळुवन बाग आपल्या भिक्षुसंघास दान देतों. त्याचा स्वीकार करून मला धन्य करावें !

असें म्हणून ती सुंदर ऐषआरामाची बाग राजानें भगवंतास अर्पण केली व त्यांनीं तिचा स्वीकार केला. तेव्हांपासून बुद्ध जेव्हां जेव्हां म्हणून राजगृहास येत, तेव्हां तेव्हां ते बहुतेक या वेळुवनांतच मुक्काम करून राहत.

राजा बिंबसार भगवानाचा भक्त व उपासक झाला ही बातमी राजगृहांत व त्याच्या राज्यांत हां हां म्हणतां पसरली. मग आता विचारतां काय ? जो उठला तो बुद्धभगवंताच्या दर्शनास म्हणून येऊन त्यांचा उपदेश ऐकून,दीक्षा घेऊन तेथल्या तेथेंच संघांत प्रवेश करूं लागला.कोणाचा नवरा, कोणाचा मुलगा,कोणाचा बाप, कोणाचा भाऊ असे कैक कर्ते लोक दर्शनास म्हणून येऊन तेथल्या तेथेंच प्रपंच त्याग करून भिक्षु होऊं लागले ! वेळुवनांत प्रव्रज्या देणेचा धूमधडाका चालू झाला. अशा रीतीनें थोडयाच अवधींत भगवंताच्या भिक्षुसंघांत बरीच भर पडून तो चांगला बाळसेदार दिसूं लागला !

यानंतर मगध राज्यांतील महातीर्थ या गांवचा महाकाश्यप नांवाचा व उज्जयिनीचा महाकात्यायन नांवाचा असे दोन विद्वान ब्राम्हण बुद्धाचें शिष्यत्व ग्रहण करून संघांत प्रविष्ट झाले.

याप्रमाणें संघ दिनेदिने वाढत चालला. याचा परिणाम पुढें असा झाला कीं भिक्षूंच्या स्वभाववैचित्र्यामुळें व विचारभिन्नतेमुळें वर्तनांत फरक पडत जाऊन संघांत गोंधळ, धुसफुस, तंटेबखेडे व बजबजपुरी माजून राहिली. ही गोष्ट भगवंताच्या कानावर गेली. तेव्हां त्यांनीं

संघांत शिस्त व व्यवस्था नांदण्यासाठीं म्हणून कांहीं नियम केले. आचार्य अगर अध्यापक यांनीं पाळावयाचे नियम, शिष्यांनीं पाळावयाचे नियम, भिक्षूंनी पाळावयाचे सामान्य नियम, दिनचर्येचे नियम, भिक्षेचे नियम, उपसंपदेचे नियम, उपासकांनीं पाळावयाचे नियम असे अनेक नियम व उपनियम करून सर्व भिक्षूंची सभा बोलावून त्या सभेंत ते नियम जाहीर केले. त्याबरोबरच थोडासा धर्मोपदेश केला. आणि शेवटीं आपल्या धर्माचें सारसर्वस्व म्हणून ही पुढील गाथा म्हणून दाखविली.

**सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।**
**सचित्त-परियोदपनं एतं बुद्धानुसासनं ॥**

ध. प. १४–५

भावार्थः—सर्व पापाचा त्याग, सर्व पुण्यकर्माचा संचय व तसेंच चित्त सदैव निर्मळ व पवित्र राखणें हेंच बुद्धाचें अनुशासन आहे.

याप्रमाणें त्या वाढत्या संघाला यमनियमाचें बंधन घालून तो सुव्यवस्थित व सुसंघटित केला. हे सर्व नियम पुढें विनयपिटक ग्रंथांत सूत्ररूपानें संग्रहीत करून ठेवण्यांत आले आहेत.

---

## सारीपुत्र व मौद्गलायन यांचें शिष्यत्व

महावग्ग १–१–१८

या बिंबसार राजाच्या कारकीर्दींत राजगृहांत फार मोठे विद्वान व कर्मठ ब्राह्मण व परिव्राजक राहत असल्यामुळें त्या काळीं ती राजधानी विद्येसाठीं म्हणून फार नांवाजलेली होती. त्यांपैकीं संजय नांवाचा एक जाडा विद्वान आचार्य होता. त्याच्याजवळ पुष्कळ विद्यार्थी विद्या शिकावयास म्हणून येऊन राहिले होते. त्यांत सारीपुत्र व मौद्गलायन हे प्रमुख शिष्य होते. दोघेहि ब्राह्मण असून त्यांच्यांत दाट मैत्री होती. ते अत्यंत बुद्धिमान असून स्वभावानें फार प्रेमळ व

भाविक होते. त्यांना सत्यधर्म समजून घेण्याची फार उत्कंठा लागली होती. त्यांनीं आपापसांत असें बोलून घेतलें होतें कीं, त्या दोघांपैकीं ज्यास अगोदर मोक्षज्ञान होईल, त्यानें तें दुसऱ्यास शिकवावें.

एके दिवशीं सारीपुत्र हा भिक्षेसाठीं गांवांत फिरत असतां त्याला वाटेंत भगवान बुद्धदेवाचा अश्वजित् नांवाचा शिष्य भेटला. तोही नगरांत भिक्षाटनार्थ चालला होता. सारीपुत्रानें त्यास पाहिलें. त्याचा तो गंभीर व प्रसन्न चेहरा पाहून सारीपुत्रास तो कोण आहे हें समजून घेण्याची इच्छा झाली. व म्हणून तो त्याच्याजवळ आला व म्हणाला, हे बंधो! आपली मुद्रा तेजस्वी व शांत दिसत आहे. आपण कोण आहा व कोणता धर्म पाळता हें मला कृपा करून सांगाल का? आपलें नांव काय? त्याला अश्वजित् उत्तरला—माझें नांव अश्वजित आहे.

सारीपुत्रः—आपण कोणाचे शिष्य आहा?

अश्वजित्ः—मी भगवान बुद्ध देवाचा शिष्य आहे.

सारीपुत्रः—आपला धर्म?

अश्वजित्ः—मी त्या भगवंताचा धर्म पाळतो.

सारीपुत्रः—मला तो धर्म समजावून सांगाल का?

अश्वजित्ः—नाहीं, मला तितकें ज्ञान अजून आलें नाहीं. मी अगदीं नवीन शिष्य आहे.

सारीपुत्रः—बुद्धानें आपणास काय सांगितलें? कोणता उपदेश दिला?

अश्वजित्ः—तें सर्व आतां मला इथें सांगतां यावयाचें नाहीं. पण त्याचें सार थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तें असें:—

**ये धम्मा हेतुप्पभवा हेतुं तेसां तथागतो।**
**तेसांच यो निरोधो एवं वादी महासमनो॥**

अर्थ—सगळ्या वस्तु ज्या कारणापासून उत्पन्न होतात तें कारण तथागतानें आम्हास सांगितले आहे व त्या कारणाचा नाश कसा होतो हेंहि पण त्या महाश्रमणानें आम्हास उपदेशिलें आहे.

**सारीपुत्रः**—म्हणजे ? त्यांत तुला काय बोध झाला ?

**अश्वजित्ः**—संसारांतील सर्व पदार्थ हेतुप्रभव आहेत, म्हणजे त्यांच्या उत्पत्तीला कांहीं तरी एक कारण आहे; त्या कारणाची उत्पत्ति, त्याची निवृत्ति व त्या उत्पत्ति व निवृत्तीचा मार्ग त्यांनीं आम्हांस उत्तम प्रकारें समजावून दिला व तो आम्हांला समजला व पटला.

**सारीपुत्रः**—ठीक, पण गड्या ! आपले बुद्ध भगवान आम्हालाहि उपदेश देतील का ? आमचें अज्ञान दूर करतील का ?

**अश्वजित्ः**—( मान हालवून ) हो हो. अलबत्. कां नाहीं ? जरूर करतील. तुम्ही या तर खरे. म्हणजे तुमची सहजच खात्री पटेल.

**सारीपुत्रः**—भगवान कोठें राहतात हल्लीं ?

**अश्वजित्ः**—त्यांचा मुक्काम वेणुवनांत आहे सांप्रत.

**सारीपुत्रः**—बरें. आम्ही तेथें येऊन भगवंताचें दर्शन घेऊं.

असें म्हणून सारीपुत्र तेथून पुढें झटकला व अश्वजित्नें आपला रस्ता सुधारला.

सारीपुत्र तेथून जो निघाला तो सरळ मौद्गलायनाजवळ आला व त्याला वाटेंत घडलेली सर्व हकीकत त्यानें सांगितली. मौद्गलायनासहि ती ऐकून आनंद झाला. व त्या दोघांनीं मिळून भगवंताकडे जाण्याचा निश्चय करून ती गोष्ट आपल्या इतर सोबत्यांसहि कळविली. संध्याकाळ होईतोंपर्यंत ही बातमी मुखावाटे अडीचशें शिष्यांत पसरून, ते सर्वजण त्यांच्याबरोबर निघण्यास तयार झाले.

आपले सर्व शिष्य बरोबर घेऊन सारीपुत्र व मौद्गलायन बुद्ध भगवानाच्या दर्शनास जात आहेत ही गोष्ट आचार्य संजयास कळतांच धांवतच तो सारीपुत्राजवळ आला. व त्यास म्हणाला–'सारीपुत्रा ! तुम्ही बुद्धाच्या दर्शनाला जात आहा म्हणे. हें खरें काय ?

**सारीपुत्रः**—होय, तें खरें आहे.

**संजयः**—माझी गोष्ट ऐकाल तर तुम्ही तेथें जाऊं नये.

**सारीपुत्रः**—कां ? त्यांत काय वाईट आहे ?

**संजयः**—अरे ! तो मोठा मायावी आहे ! पक्का लबाड आहे ! वाटेल त्या थापा मारतो व अज्ञ लोकांस फासांत पकडतो ! !

**सारीपुत्रः**—मग आम्ही काय अल्लड आहों कीं काय ? आपल्याच हाताखालीं तयार झालों आहो कीं ! थापांना आम्ही थोडेच भीक घालणार आहो. तो मोठा श्रमण आहे म्हणतात. जातो झालं. त्यांत आपल्याला काय इतकं वाईट वाटतं ?

**संजयः**—माझं मत विचाराल तर तुम्ही तेथें जाऊं नका. काय तुम्हास पाहिजे असेल तें मला विचारा कीं. मी सर्व सांगतो तुम्हांला. आम्ही तिघे मिळून आपल्या संघाची जोपासना करूंया.

**सारीपुत्रः**—आमचा निश्चय ठरलाय जाण्याचा. त्याप्रमाणें आम्ही जाणार नि भगवान बुद्धाचें दर्शन घेणार !

असें म्हणून सारीपुत्र व मौद्गलायन अडीचशें सहाध्यायी बरोबर घेऊन बुद्ध दर्शनार्थ वेणुवनाकडे चालते झाले.

तेथें गेल्यावर भगवंताचें दर्शन घेऊन त्यांच्या चरणावर मस्तक ठेऊन ते म्हणाले–भदंत, आम्ही आपले शिष्य होऊन संघांत येवूं इच्छितों. तर आम्हास उपदेश देऊन प्रव्रज्या नि उपसंपदा द्या.

हें त्यांचें भाषण ऐकून बुद्धास आनंद झाला व ते त्यांना यथोचित उपदेश करून म्हणाले— आयुष्मन् ! हा माझा धर्म सुव्याख्यात आहे. म्हणजे सुप्रतिपादित आहे. दुःखशमनार्थ उत्तम प्रकारें तुम्ही ब्रम्हचर्याचें म्हणजे आर्य अष्टांगिक मार्गाचें पालन करा ! म्हणजे तुम्ही संसारमुक्त अर्थात् दुःखमुक्त व्हाल.

या उपदेशानेंच त्यांची उपसंपदा झाली.

याप्रमाणें सारीपुत्र व मौद्गलायन आपल्या अडीचशें सहाध्यायांनिशीं भिक्षुदीक्षा घेऊन बौद्ध संघांत दाखल झाले.

---

# दानशूर श्रेष्ठी अनाथपिंडक

चुल्लवग्ग ६-३-१

सुदत्त नांवाचा दानशूर श्रेष्ठी श्रावस्तीचा राहणारा. तो क्रोडोपति असून श्रास्वतीचा नगरशेट होता. कांहीं कारणावरून तो राजगृहीं आपल्या मेहुण्यास भेटण्यास म्हणून आला होता. या खेपेस तो आला, त्या वेळीं त्या मेहुण्याची बरीच धांदल उडाली होती. तो कोणत्या तरी महत्त्वाच्या कामांत गुंतल्यासारखा दिसत होता. क्षणोक्षणीं आंतबाहेर अशा त्याच्या सारख्या येरझारा चालल्या होत्या.

त्याची ती गडबड पाहून तो आपल्या मेहुण्यास म्हणाला, 'या खेपेस आपली फार गडबड दिसते. माझ्याशीं शब्द देखील बोलण्यास आपणास फुरसत दिसत नाहीं. घरीं कांहीं उत्सव समारंभ आहे कीं काय?'

मेहुणा म्हणाला:—सुदत्त! तुम्हीं म्हणतां तें खरें आहे. मात्र उत्सव समारंभ असा कांहीं नाहीं. पण गडबड आहे हें खरें. उदईक भगवान बुद्ध देव येणार आहेत माझ्या घरीं भिक्षेला. त्या तयारीच्या गडबडींत आहे मी तूर्त गुंतलेला. तेवढ्याचसाठीं मला तुमच्याशीं बोलून तुमचा समाचार घेतां आला नाहीं. इतकेंच. क्षमा करा.

सुदत्ताला बुद्ध देवाची कीर्ति व महिमा ऐकून माहीत होता. तथागताची प्रशंसा त्याच्या कानावर विपुल आली होती. पण त्या सर्वांवर त्याचा बसावा तितका विश्वास बसला नव्हता. तथापि भगवंताविषयीं त्याची आदरबुद्धि मात्र कांहीं कमी नव्हती. तो त्यांचा प्रत्यक्ष उपासक जरी झाला नव्हता, तरी त्याची भक्ति व निष्ठा त्यांच्यावर पूर्ण होती, यांत कांहीं संदेह नव्हता. त्यांना प्रत्यक्ष पाहण्याचा प्रसंग त्याचा हा पहिलाच. ही आयती संधि अनायासे चालून आलेली पाहून त्यास मोठें समाधान वाटलें. व तेथें आल्यावर त्यांची थोडीशी परीक्षा पाह-

ण्याचें त्यानें मनांत ठरविलें. हेतु हा कीं तथागत त्या कसास उतरल्यास आपण त्यांचा उपदेश घेऊन त्यांचें शिष्यत्व पत्करावयाचें.

अलीकडे अशी गम्मत झाली होती कीं त्याचें मूळचें सुदत्त हें नांव प्रचारांतून पूर्ण बुजून जाऊन अनाथपिंडक हेंच नांव सर्वत्र रूढ झालें होतें. व त्या नांवानेंच तो तेव्हां ओळखला जात होता.

दुसरे दिवशीं भगवान हातांत भिक्षापात्र घेऊन व चीवर धारण करून संघासहित श्रेष्ठीच्या घरीं आले. श्रेष्ठीनें घरीं येतांच त्यांचा चांगला आदरसत्कार करून योग्य स्थानीं त्यांना आणून बसविलें व त्यांची पूजा वगैरे केली. नंतर भोजनाची तयारी चालली. अर्थात् जेवणाची व्यवस्था अत्युत्तम होती हें निराळें सांगावयास नकोच. भगवान भोजन करून संतृप्त व संतुष्ट झाले. व हस्तप्रक्षालन करून सभास्थानी येऊन बसले. त्या वेळीं त्या श्रेष्ठीचे आप्तइष्ट व इतर ज्ञातिबांधव तथागताचा उपदेश ऐकण्यास म्हणून आपापल्या जागीं येऊन बसले होते. त्यांतच अनाथपिंडक हाही जाऊन बसला.

भगवान सभास्थानीं येऊन स्वस्थानीं विराजमान झाल्यावर त्यांनीं एकवार श्रोतृवृंदावरून बारकाईनें दृष्टि फिरविली. तों त्या वैश्य समाजांत बसलेला अनाथपिंडक त्यांना दिसला. त्याला पाहतांच स्मितहास्य करून बुद्धदेव त्याला म्हणाले ' सुदत्ता ! तितका लांब कां ? ये असा माझ्याजवळ ! इथं समोर बैस माझ्या ! कारण आज तूं इथं अतिथि म्हणून आला आहेस. ये, असा पुढें येऊन बैस ! तुला माझा धर्मोपदेश ऐकावयाचा आहे ना ? मग, लांब कां ? इथं जवळ ये !'

' सुदत्त ' या नांवानें भगवान त्यास हांक मारतांच तो विस्मयचकित होऊन मनांत फार ओशाळल्यासारखा झाला. भगवंतानें आपल्या मनांतील विचार नेमका ओळखला हें पाहून त्यास महदाश्चर्य वाटलें. व तथागत हे सर्वज्ञ सुगत आहेत अशी त्याची खात्री झाली. चटकन तो तेथून उठला व भगवंताजवळ जाऊन भक्तिपूर्वक त्यांच्या पायावर

आपलें डोकें ठेऊन साष्टांग नमस्कार घालून त्यांच्या शेजारीं जाऊन बसला. बुद्धांनीं त्या श्रोतृवृंदाला साजेल असा प्रसंगोचित मधुर धर्मोपदेश केला व तो तेथील श्रोतृवृंदाला फार फार आवडला.

धर्मोपदेश संपल्यावर अनाथपिंडक उठून उभा राहिला व हात जोडून म्हणाला, 'भदंत! आपला उपदेश ऐकून मी धन्य झालों. मी भगवंतास शरण आलों आहे. धर्मास शरण आलों आहे. संघास शरण आलों आहे. माझा उपासक म्हणून स्वीकार करावा. आणि उदईक संघासहित माझ्याकडे भोजनास यावे.'

बुद्धांनीं हें त्याचें आमंत्रण मौन धरून स्वीकारलें.

नंतर अनाथपिंडकानें श्रेष्ठीच्या घरीं उत्तम भोजन तयार करवून भगवंतास बोलावून आणून त्यांस व त्यांच्या संघास उत्तम सुग्रासाचें भोजन घातलें. आणि भोजन झाल्यावर बुद्धास हात जोडून म्हटलें कीं, 'भदंत! येता पावसाळा आपण आमच्या श्रावस्ती येथेंच काढवा. त्या वेळीं मी जरूर भगवंताची योग्य बरदास्त राखीन. आमचा राजा प्रसेनजित असून तो फार धार्मिक व उदार आहे. मी तेथील रहिवासी असून माझा जमीनजुमला व घरदार सर्व तेथेंच आहे. या माझ्या आमंत्रणाचा स्वीकार करून भगवंतानें मला धन्य करावें!' त्या अनाथपिंडकाचें हें भाषण एकून भगवान थोडेसे हंसले व त्याच्या विनंतीस मानेनेंच आपला रुकार दिला.

---

## पिता-पुत्र--भेट

जातक अट्ठकथा ( निदान )

भगवान बुद्धाच्या धर्मचक्रप्रवर्तनाची वार्ता सर्व देशभर प्रसृत झाली. दूरदूरचे व ठिकठिकाणचे विद्वान व धर्मजिज्ञासु लोक लांबलांबचा प्रवास करून त्यांचा उपदेश ऐकण्यास व धर्म समजावून घेण्यास

त्यांच्या दर्शनास येऊं लागले. होतां होतां ही शुभवार्ता पुढें कपिलवस्तूसहि जाऊन थडकली. अर्थात् शुद्धोदनाच्या कानावर ती नित्य जाऊं लागली. रोज त्याच्या कानावर बुद्धाच्या अलौकिक चमत्काराच्या व दिव्य उपदेशाच्या कांहीं ना कांहीं तरी गोष्टी जाऊं लागल्या. त्या गोष्टी ऐकून तो त्यांतल्या त्यांत आपल्या दुःखांत सुख मानीत असे.

याप्रमाणें सिद्धार्थ बुद्ध झाल्यावर जवळ जवळ चार पांच वर्षें लोटलीं. शुद्धोदनाचें या वेळीं वय ९५–९६ वर्षांचें होतें व तो फार थकला होता. अर्थात् त्याला पुत्र दर्शनाची इच्छा होऊन सिद्धार्थाचें मुखावलोकन करण्यास तो मोठा उत्सुक झाला असल्यास त्यांत काहीं नवल नाहीं. त्याला पुत्रदर्शनाची तीव्र इच्छा झाली आणि म्हणून त्यानें आपली इच्छा त्यास श्रुत करण्यास आपला एक सरदार पाठविला; पण तो भगवंताजवळ जाऊन त्यांचा उपदेश ऐकून तेथेंच भिक्षु होऊन राहिला. नंतर सिद्धार्थाचा परममित्र कालउदायी नांवाचा होता. त्यास त्याजकडे पाठविण्यांत आलें.

या वेळीं भगवान राजगृह येथें राहत होते. तो मित्र तेथें जाऊन भगवंतांस भेटून त्यांस म्हणाला :— भगवन्, मी आपल्या पिताजीकडून आलों आहें.

**भगवान**:—अस्सं, ठीक. पिताजी कुशल आहेत ना? कपिलवस्तु सुखी आहे ना? सर्व ठीक आहे ना?

**उदायी** :— होय भगवन्.

**भगवान** :— पिताजीचा काय निरोप आहे?

**उदायी** :— त्यांची इच्छा अशी आहे कीं आपण एकवार कपिलवस्तूस येऊन त्यांस दर्शन द्यावें! ते आतां फार वृद्ध झाले आहेत! अगदीं थकले आहेत! भगवंताच्या विरहानें फार कष्टी व दुःखी झाले आहेत! मरणापूर्वी एकदा तरी भगवंताला डोळे भरून पाहवें असें त्यांच्या मनांत फार फार आहे. नि आपला धर्म आपल्या तोंडून ऐकावा

असा सारखा ध्यास लागला आहे. त्यांनीं मला मुद्दाम भगवंताकडे पाठवून आपला निरोप कळविण्यास आज्ञापिलें आहे. मग भगवान पिताजींची ही इच्छा तडीस नेणार नाहींत काय ? कपिलवस्तूस भेट देऊन तेथील लोकांचे डोळे धन्य करणार नाहींत काय ?

**भगवान** :— येईन, येईन, अगदीं अवश्य येईन. जा, पिताजीस कळव की तथागत तेथें लवकरच येणार आहे. व पिताजीस भेटणार आहे.

असें सांगून त्या काल–उदायीस परत पाठवून दिलें.

भगवान बुद्ध देव लवकरच कपिलवस्तूस येणार ही बातमी वाऱ्याप्रमाणें गावांत हां हां म्हणतां सर्वत्र पसरली. मग काय सांगावा त्या लोकांचा आनंद ! आपला युवराज घर सोडून वनांत जाऊन तपश्चर्या करून श्रेष्ठ धर्मज्ञान मिळवून, फिरून कपिलवस्तुस येऊन दर्शन देत आहे, ही आनंददायक बातमी कानावर येतांच जो तों आनंदानें व संभ्रमानें नाचूं लागला !! काय त्यांचा उत्साह नि केवढा त्यांचा उल्हास !! भगवंताचें सुस्वागत करण्यास म्हणून त्यांनीं रात्रंदिवस खपून आपलें नगर स्वर्गाप्रमाणें शृंगारून त्याचें दर्शन घेण्यास चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा करीत बसले.

इतक्यांत बातमी आली कीं भगवान कपिलवस्तूजवळ येऊन उतरले आहेत. ही बातमी समजतांच गावांत एकच आनंद उफाळला ! मंगल-वाद्यें वाजूं लागलीं ! लोक हर्षनिर्भर होऊन रस्त्यावर, मैदानावर, माडीवर, गच्चीवर, जेथें जागा सांपडेल तेथें जमून गर्दी करूं लागले ! राजा शुद्धोदन आपली दरबारी मंडळी बरोबर घेऊन राजवैभवानें आपल्या विजयी पुत्रास–सिद्धार्थास–आतां भगवान बुद्ध देवास–भेटण्यास सामोरा गेला.

काय सांगावा तो अपूर्व प्रसंग ! पितापुत्राची भेट ! तशांत वृद्ध पित्याची व विजयी पुत्राची भेट !! फार दिवसाची भेट !! वाचक हो,

तो प्रसंग तुम्हीं आपल्या कल्पनेनेंच ओळखा ! ! आम्हास तो वर्णनातीत आहे ! ! भगवंताचें तें दिव्य सौंदर्य नि ती अपूर्व कांति आणि तसेंच तो त्यांचा प्रशांत व सुप्रसन्न मुखचंद्र दूरूनच पाहून त्या पिताजीचा आनंदसागर उचंबळूं लागला तर त्यांत अश्चर्य तें काय ?

खरोखर चातकावर आतां अमृतवृष्टि झाली ! दरिद्र्याला कामधेनु भेटली ! मोराला मेघदर्शन झालें ! आणि शुद्धोदनाला भगवान बुद्धदेव दिसला ! येतां येतां भगवान अगदी जवळ आला ! शुद्धोदनाचे डोळे धन्य झाले ! व त्याचा जन्म कृतकृत्य झाला ! !

भगवान पिताजीच्या जवळ येतांच शुद्धोदनास जें काय झालें तें सांगून पुरवत नाहीं. त्याचा कंठ दाटून आला—डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले—वाणी कुंठित झाली—सर्व शरीर रोमांचित झालें ! तोंच पितापुत्राची दृष्टादृष्ट झाली ! शुद्धोदन—सिद्धार्थाची भेट झाली ! होय, सिद्धार्थच तो त्या शुद्धोदनाचा ! ! जगाचा जगद्वंद्य जगद्गुरु, श्रेष्ठ धर्माचा महामहोपदेशक, सत्यज्ञानाचा श्रेष्ठ प्रवक्ता, मानवांचा उद्धारकर्ता, त्रैलोक्यवंद्य भगवान बुद्धदेव ! ! पण त्याच वेळेस शुद्धोदनाचा तो सिद्धार्थच ! ! !

पितापुत्राची भेट झाल्यावर बुद्धाच्या इच्छेप्रमाणें सर्वजण तेथील न्यग्रोधारामांत आले. तेथें गेल्यावर भगवान आपल्या आसनावर जाऊन बसले. त्यांच्यासमोरच जवळ शुद्धोदनही बसला, व इतर मंडळी जरा अंतरावर जागा पाहून स्थानापन्न झाली.

शुद्धोदनाच्या मनांत त्यास पूर्वीच्या आवडत्या नांवानें 'सिद्धार्थ' म्हणून हाक मारावी असें आलें; पण भगवंताची ती शांत, तेजस्वी व गंभीर मूर्ति पाहून तो विचार मनांतल्या मनांतच जिरला ! भगवंतानें मात्र हें जाणलें. इतक्यांत शुद्धोदन म्हणाला : भगवंता, मी आतां फार म्हातारा झालों आहे. माझ्याकडून तो राज्यकारभार आतां निभाऊन

नेणें होत नाहीं. तुझ्यावर तो सोंपवावा म्हणतों. पण मीं तें तुला दिल्यास तूं तें कसपटाप्रमाणें मानणार नाहींस ना ?

**भगवान उत्तरला** :— मला राजाचें अंतःकरण ठाऊक आहे. तें फार प्रेमळ आहे. कोमल आहे. तें पुत्रासाठीं तिळ तिळ तुटत आहे. पण पिताजीचें हें जें प्रेम मजवर अत्यंत व अलोट आहे, तसेंच तें आतां सर्व मनुष्यांवर जडलें तर या एका पुत्रापेक्षां असंख्य पुत्र मिळविल्याचा त्याला आनंद होईल ! सत्यज्ञानाचा, सद्धर्माचा उपदेश करणाऱ्या तथागताचा आपण योग्य सत्कार केल्याचें श्रेय लाभेल !! व पुत्रशोकानें रात्रंदिवस तळमळणाऱ्या अंतःकरणांत श्रेष्ठ निर्वाणसुखाचा—परमशांतीचा—नवोदय होईल !!

आपल्या मुलाचें—सिद्धार्थाचें—बुद्ध भगवानाचें—हें मधुर भाषण ऐकून शुद्धोदनाला परम हर्ष झाला. व अंतःकरणांत धर्माचा प्रकाश उजळून तें निर्विकार झालें ! मनावरील दुःखाचा भार हलुवार होऊन तें आनंदसागरांत तरंगूं लागलें !

त्याच्यांत विलक्षण क्रांति घडून आली. अन् कां नाहीं घडून येणार ? भगवंतानें कृपादृष्टीनें पाहिल्यावर काय नाहीं होणार ? विषाचें अमृत होईल ! लोहाचें सुवर्ण बनेल आणि नरकाचा स्वर्ग उठेल !!! भगवंतानें पिताजीवर अनुग्रह दृष्टीनें पाहतांच त्याच्या कष्टी अंतरंगांत एकदम पालट झाला !!! तें शांत, तृप्त व हृष्ट झालें !! नंतर शुद्धोदन म्हणाला, ‘ माझें अंतःकरण पुत्रप्रेमानें प्रथम विव्हल झालें होतें. आतां भगवंताच्या दर्शनानें तें शांत झालें आहे. तुझ्या प्रव्रज्येचें मला फळ मिळालें. लोकांवर दया करण्याची तुझी प्रवृत्ति प्रबळ होऊन प्रपंचसुखोपभोग त्याग करावयास तयार झालास हें ठीकच झालें. त्याप्रमाणें धर्मप्रसाराचा उदात्त उद्देश तडीस न्यावयास झटत आहेस हेंही योग्यच आहे. तुला धर्मज्ञानाचा साक्षात्कार झाल्यामुळें मुमुक्षुजगास तूं अमर ज्ञानाचा असाच उपदेश करीत

जा!' इतकें भाषण झाल्यावर भगवंतास त्या दिवशीं तेथेंच सोडून तो राजवाड्याकडे परतला. भगवानाचा मुक्काम त्या दिवशीं न्यग्रोधारामांतच झाला.

---

## राजवाड्यांत भिक्षाग्रहण

जातक अट्ठकथा (निदान)

दुसरे दिवशीं सकाळीं भगवान पीत चीवर धारण करून हातांत मातीचें भिक्षापात्र घेऊन आपल्या भिक्षुगणासमवेत गावांत भिक्षा मागावयास निघाले व घरोघर जाऊन भिक्षा मागत फिरूं लागले!! आपला राजपुत्र आपला सत्कार न घेतां गांवांत स्वत: भिक्षापात्र घेऊन घरोघर भीक मगत हिंडत आहे हें पाहून नागरिकांस मोठें आश्चर्य व खेद वाटला, व ही बातमी ताबडतोब राजवाड्यांत शुद्धोदनास कळविण्यांत आली. राजा त्या वेळीं वाड्यांत भगवंताचें मोठ्या थाटानें सुस्वागत करण्याच्या तयारींत गुंतला होता.

ही बातमी त्यास लागतांच चटकन् तो तेथून निघून भगवंताजवळ आला आणि म्हणाला, 'भगवंता, हें तूं काय करीत आहेस? तूं राजपुत्र असून गावांत भिक्षा मागत हिंडतोस, काय तुला माझ्या वाड्यांत अन्न नाहीं म्हणून? तुझ्या या कृतीनें माझा अपमान होत आहे! सर्वत्र माझी नाचक्की होत आहे! तुला व तुझ्या भिक्षुसंघाला नित्य यथेच्छ भोजन घालण्याइतकी माझ्या घरांत अन्नसमृद्धि आहे, हें तुला माहीत नाहीं काय?

**भगवान** :—पिताजी! माझ्या कुलांत भिक्षा मागणें हें व्रतच आहे. हा माझा धर्म आहे!

**शुद्धोदन** :—काय? भिक्षा मागणें हा धर्म आहे! क्षत्रियांचा धर्म आहे!! राजपुत्राचा धर्म आहे!! भगवंता! हें तूं काय म्हणत आहेस?

क्षत्रिय वंशांत आणि तशांत राजकुलांत तूं जन्मला आहेस हें तूं विसरलास काय? तुझ्या कुलांत आजपर्यंत कोणीहि भिक्षा मागितली नाहीं!

**भगवान** :—हे महाराजा, तूं आणि तुझें कुल राजघराण्याचें आहे हें खरें; पण तथागताचा जन्म जुन्या बुद्ध घराण्यांतला आहे. माझ्या पूर्वज बुद्धांनीं घरोघर भिक्षा मागून त्या भिक्षेवर आपला उदर–निर्वाह चालविलेला होता. तेंच व्रत मीहि पाळत आहें यांत चुकलें कोठें?

यावर राजा कांहीं बोलला नाहीं.

**नंतर भगवान म्हणाले**—राजा, एकाद्याला जर मोठा गुप्त द्रव्यनिधि सांपडला, तर तो त्यांतील अत्यंत सुंदर सुंदर वस्तु आपल्या बापाला अर्पण करतो. आणि हें स्वाभाविकच आहे. त्याचप्रमाणें मीहि हा जो अत्यंत थोर व गुप्त ज्ञाननिधि प्राप्त करून घेतला आहे त्यांतला उत्तमांतला उत्तमोत्तम भाग तुला अर्पण करूं इच्छितों.' असें म्हणून त्यानें त्याला निर्वाणाचा सुंदर धर्मोपदेश केला. आणि शेवटीं म्हटलें.

**उत्तिट्ठे नप्पमज्जेय्य धम्मं सुचरितं चरे।**
**धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च॥**
**धम्मं चरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे।**
**धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च॥**

धम्मपद, १३,२–३

हे पिताजी! आतां ऊठ! आलस्य करूं नकोस! सद्धर्माचें आचरण कर! धर्माचरण करणारा या लोकीं व परलोकीं सुखानें राहतो. सद्धर्माचें आचरण कर. मोहावश होऊन अधर्माचें केव्हांहि आचरण करूं नकोस! सद्धर्माचें अनुष्ठान करणारा या लोकीं व परलोकीं सुखानें कालक्रमणा करतो. ( धम्मपद १३-२,-३ )

याप्रमाणें धर्मोपदेश केल्यावर राजाचा मोहपाश नष्ट होऊन तो चांगला शुद्धीवर आला. आणि हर्षनिर्भर अंतःकरणानें चटकन् पुढें होऊन भगवंताचें भिक्षापात्र स्वतः आपल्या हातांत घेऊन त्याला व



**त्यागराज**

**भगवान गौतम बुद्ध**

(ध्यानमूर्ति, तक्षशिला)

भगवंतास दिसलें नाहीं. कोणी पाहिलें नाहीं. सर्वांत अत्यंत प्रिय माणूस तें! अत्यंत प्रेमळ नि अत्यंत मायाळु! अगदीं जवळचें नि अत्यंत जिव्हाळ्याचें!! वाचक हो, तें कोण हें आपण ओळखिलें काय?

यशोधरा! सती यशोधरा!! महासती यशोधरा!! प्रत्यक्ष भगवंताची सहधर्मचारिणी यशोधरा! महापतिव्रता महासती यशोधरा!! सर्व गांव बुद्धदेवाच्या दर्शनास लोटला होता, तरी ती सती कांहीं आपल्या महालांतून जागची हलली नव्हती!!

होय, काय म्हणून हलेल नि हलावें? सिद्धार्थानें तिचा काय लहान सहान अपराध केला होता? होय, महान अपराध तो! मोठा भयंकर अपराध! महानिष्क्रमणाच्या वेळीं तिला न सांगतां—न भेटतां, न पुसतां—न बोलतां, सात दिवसांची अगदी ओली बाळंतीण असतांना—बाळाला पोटाशीं घेऊन मंचकावर झोंपलेली असतांना—फक्त दुरूनच डूंकून पाहून तिचा कांहींच अपराध नसतां दगडासारखें कठोर हृदय करून रातोरात गुप्तरीतीनें पळ काढला! हा सतीचा अक्षम्य गुन्हा नव्हे तर काय?

हा काय पतीचा धर्म झाला? सतीचा केवढा अपमान तो! पतीव्रतेचा केवढा अपमान! पति झाला म्हणून काय झालें? चारी वाटा मोकळ्या नि अठरा खून माफ असें थोडेंच आहे! त्यालाहि बंधनें म्हणून कांहीं आहेतच कीं नाहींत?

मोठी मानी सती ती!! आतां पतिदेव खुद्द घरीं आला असतांदेखील तिनें त्यास आपलें तोंड दाखविलें नाहीं!! त्याच्या दर्शनास गेली नाहीं!! मानी सतीचा योग्य रुसवा तो!! 'असेल मनांत तर येऊन भेटेल माझ्या महालांत,' असें म्हणून ती मानी स्त्री जागची हलली नाहीं!!

वाचकहो, सिद्धार्थाचा आतां भगवान बुद्ध झाला होता खरा. पण जन्म होता तो पूर्वींचाच. मग मागील आठवण—तशांत प्रिय जनाची मधुर स्मृति—अजीबात बुजणार कशी? मागचे मधुर प्रसंग मावळणार कसे? बुद्ध झाला म्हणून काय झालें? त्याला मन होतेंच कीं नाहीं? मग ती आठवण कशानें बुजणार नि कशी बुजणार? नाहींच बुजावयाची अन् नाहींच बुजली ती.

यशोधरा आली नाहीं हें पाहून भगवंतांचें मन जरा अस्थिर झालें. तिला भेटण्याची—पाहण्याची—समाचार घेण्याची—त्यांना इच्छा झाली. नव्हे, आतां अवश्यच झालें. आपण तिचा एकापरी अपराध केला आहे ही जाणीव त्यांच्या मनाला चाटून गेल्यामुळें तो धर्मराज आपल्या रुष्ट सहचारिणीच्या समाधानार्थ—तिच्या विरहदग्ध अंतःकरणाच्या सांत्वनार्थ—आपण होऊनच तिच्या भेटीस निघाला! त्या पुण्य सतीच्या पवित्र दर्शनार्थ स्वतःच निघाला!! सर्व जग—नव्हे अखंड त्रैलोक्य—ज्याच्या दर्शनलाभासाठीं जीव सोडीत असे—धांवून येत असे—असा तो त्रैलोक्यवंद्य—महापुरुष—भगवान बुद्ध देव—त्या महापतिव्रतेच्या पवित्र दर्शनास—यशोधरेच्या भेटीस —आपण होऊन पायानें चालत निघला!!!

अहाहा! केवढा सतीचा विजय तो! पतिव्रतेचा केवढा अधिकार तो!! पति झाला म्हणून काय झालें? राजा झाला म्हणून काय झालें? ज्ञानी झाला किंवा बुद्ध झाला म्हणून तरी काय झालें? सतीच्या रास्त रुसाव्यापुढें सूज्ञपतीला नम्र झालेंच पाहिजे! तेथें मान लवविलीच पाहिजे! तो तिचा हट्ट पुरवलाच पाहिजे! मूक आग्रहाला खडा मान हा दिलाच पाहिजे! तरच तो तिचा पति! तरच तो तिचा देव! तरच तो तिचा नाथ!! हें भारतीय दाम्पत्य धर्माचें मधुर वैशिष्ट्य मार्मिक नाहीं असें कोण म्हणेल?

यशोधरा आपणास भेटावयास आली नाहीं तर नाहीं, आपणच जाऊन तिला भेटावें असा विचार करून भगवान तेथून उठून तिच्या महालाकडे निघाले. बरोबर सारीपुत्त व मोग्गल्लान हेही होते. तिच्या महालाच्या दरवाजाजवळ येतांच ते त्यांना म्हणाले–भिक्षुहो, आतां तुम्ही येथें बाहेरच असा. मी एकटाच आंत जातों. मी एकटाच आंत गेलों म्हणून मनांत कांहीं काळेंबेरें आणूं नका. मी स्वतंत्र व निर्विकार आहे. पण यशोधरा तशी नाहीं. ती विकारवश आहे. विरहदुःखानें दुःखित आहे. तिचें सांत्वन–समाधान–मला केलें पाहिजे. मला प्रत्यक्ष पाहून तिचा दुःखावेग अधिकच तीव्र होईल. तो ओसरल्याशिवाय मला तिचें समाधान करतां येणें शक्य नाहीं. ती जर येऊन तथागताला स्पर्श करील, तर तुम्हीं येऊन तिला अडवूं नका ! तिच्या इच्छेचा भंग करूं नका !' असें सांगून त्यांस बाहेर सोडून भगवान एकटेच आंत गेले.

तेथें त्यांनीं काय पाहिलें ? त्यांना काय दिसलें ? त्यांच्या डोळ्यांपुढें जी यशोधरा होती, ती तेथें दिसली काय ? ती सुंदर दिव्य देवता आतां दिसली काय ? ती हास्यरुचिर मुग्धमूर्ति दिसली काय ? ती दिव्य वस्त्रालंकार विभूषित मधुर पुतळी दिसली काय ?

नाहीं म्हाणायला दिसली; एक दिसली. पण ती पूर्वींची सिद्धार्थाची मंगल देवता–ती सुहास्य यशोधरा–नव्हे ! छे, मुळींच नव्हे !! तो तेजस्वी प्रफुल्ल मुखचंद्र आतां कोठें होता ? तो काळा कुळकुळीत सुंदर केशकलाप–तीं सुंदर रेशमी वस्त्रें–ते चकाकणारे दिव्य रत्नालंकार–त्या मधुर पुष्पमाला–ती सुंदर शरीरकांति–तें सुरुचिर स्मित हास्य–हें सगळें आतां तेथें कोठें होतें ?

यांपैकीं कांहींच भगवंतांना दिसलें नाहीं ! उलट एक अत्यंत दीन व करुण सजीव चित्र मात्र डोळ्यापुढें उभें राहिलें ! सर्व शरीर कृश झालेलें–मलिन वस्त्र नेसलेलें–मुखसौंदर्य मावळलेलें–अश

एक कृश व करुण मूर्ति त्यांना दिसली! त्यांनीं पाहिली! यशोधरा होती ती !!

भगवान आंत येतांच ती सती चटकन् उठून उभी राहिली व वर मान करून त्यांच्याकडे पाहिलें. नेत्राला नेत्र भिडले, तों तिच्या अंगांत एकदम विद्युत संचार झाला! वाचकहो! काय सांगावी त्या वेळची त्या सतीची ती स्थिति! सर्व ब्रह्मांड तिच्या डोळ्यांपुढें आतां उभें राहिलें!! नव्हे, नाचूं लागलें !! किती तरी विचार, किती तरी विकार, किती तरी प्रसंग, तिच्या हृदयपटलावर चमकून विद्युद्वेगानें पुन्हा परतून गेले !! एक, दोन, तीन अशा किती तरी गोष्टी आणिं किती तरी प्रसंग !! सर्व ब्रम्हांडाचें ब्रम्हांडच पुढें येऊन उभें राहिलें !! अंतःकरणांत विविध विकारांचा हलकल्लोळ उठला !! मनांत अनेक सुष्ट दुष्ट विचारांची खळबळ उडून गेली !! डोळ्यांपुढें कुट्ट अंधेरी आली आणि मस्तक भणभणूं लागलें !!!

हें सर्व किती वेळ? क्षणमात्र—अगदीं क्षणमात्रच!! अखेर ती सती शुद्धीवर आली आणि धांवत जाऊन पतिदेवाच्या पायांवर—आतां भगवंताच्या पायांवर—जगदुद्धारक बुद्ध देवाच्या पायांवर—आपलें मस्तक ठेवून त्रैलोक्य वंद्य पूज्य पाद आपल्या पवित्र अश्रूंनीं भिजवून टाकले! नव्हे, धुवून काढले !! भगवंतांनीं लगेच तिला आदरानें धरून वर उठविली आणि पाठीवरून आपला अमृततुल्य दिव्य हस्त फिरविला !!!

तों इतक्यांत शुद्धोधन आंत आला. यशोधरा बाजूला सरून खालीं मान घालून उभी राहिली. भगवान तिच्याकडे पाहूं लागले. दोघांच्याहि तोंडातून शब्द निघेना! क्षणभर दोघेंहि स्वतःसच विसरलीं असेंच कां म्हणा ना? पण ही स्तब्धता फार वेळ टिकली नाहीं. पुढें शुद्धोदनानें ती मोडली.

तो भगवंताला उद्देशून म्हणालाः—भगवन्, किती सांगूं आणि काय सांगू या सतीचे सद्गुण ! माझ्या सुनेचे सद्गुण ! ! खरी पतिव्रता ती ! तूं गेल्यापासून तिनें सर्व कांहीं सोडून दिलें आहे. तूं केंस छाटून टाकले आहेस असें समजतांच तिनेंहि आपला सुंदर केशभार उतरवून सोडला. तूं अलंकार व पुष्पगंधादि द्रव्यें वापरीत नाहींस हें समजतांच तिनेंहि अलंकार व पुष्पमाळा टाकून दिल्या. तूं पीतवस्त्र धारण करतोस असें समजतांच तिनेंहि सुंदर वस्त्राचा त्याग करून पीत वस्त्र धारण केलें. तूं मृण्मय पात्रांत जेवतोस हें कळतांच तीहि त्याच पात्रांत अन्नग्रहण करूं लागली. तूं जमीनीवर निजतोस हें ऐकून तींही सुखशय्या सोडून खालीं जमीनीवर निजूं लागली. तूं एक वेळ जेवतोस असें समजतांच तीही एकच वेळ जेवूं लागली. इतकेंच काय, तूं गेल्यावर पुष्कळ राजपुत्रांनीं तिला आपल्याबरोबर पुन्हा विवाह करावयास पुष्कळ विनवून पाहिलें. पण त्या सर्वांना 'मी सिद्धार्थाचीच आहें व शेवटपर्यंत त्याचीच राहणार !' असा रोखठोक जबाब देऊन त्यांच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लाविल्या. अशी ही पुण्यशील साध्वी पतिव्रता आहे ! ! तिचें तूं आतां सांत्वन कर ! त्या सतीला शाश्वत सुखाचा मार्ग दाखीव ! तिच्या तप्त मनाला उदंड शांतीचा लाभ करून दे ! !

भगवंतांनीं तें सर्व लक्ष देऊन ऐकून घेऊन, अंतःकरणांत संतुष्ट होऊन तिच्याकडे दिव्य दृष्टीनें पाहिलें. आणि तिच्या संतप्त हृदयावर शांतिसुखाचा अमृतवर्षाव केला ! ! यशोधरा धन्य झाली ! ! तिचा दुःखशोक पार आटून गेला ! अंतःकरण शांत झालें ! मन प्रसन्न बनलें ! बुद्धि उजळली आणि सर्वत्र तिला स्वर्ग दिसूं लागला ! !

भगवंतांनी आदरानें तिच्या पाठीवरून आपला अमृत हस्त फिरवून म्हटलें, 'यशोधरे ! धन्य तूं ! या जन्मीं तूं माझी पत्नी झालीस हें योग्यच झालें. तुला तुझ्या पूर्वजन्माची स्मृति नाहीं. ती मला आहे.

मागच्या अनेक जन्मांत तूं मला सहाय्य केलें आहेस ! माझी सेवा केली आहेस. त्याचें फळ तुला या जन्मी लाभलें आहे !

असें सांगून भगवंतानें तिला योग्य उपदेश करून तिचें सांत्वन केलें आणि मग तेथून निघून आपल्या भिक्षुगणासहित न्यग्रोधारामाकडे प्रमाण केलें.

---

## कपिलवस्तूंत

महावग्ग १-३-११ व चुल्लवग्ग ७-१-१

भगवान बुद्धांचा मुक्काम वसंत व ग्रीष्म या दोन ऋतूपर्यंत म्हणजे चार महिने तेथेंच होता. त्या समयांत दररोज त्यांचा धर्मोपदेश होत असे. त्यांच्या दर्शनास नित्य शेकडो स्त्रीपुरुष येत जात असत. धर्म–प्रवचनाच्या वेळीं तर न्यग्रोधाराम श्रोतृवृंदानें खुलून जाई. जे जे म्हणून तेथें येत ते ते त्यांचा धर्मोपदेश ऐकून बहुतेक त्यांचे उपासक बनत. पुष्कळ शाक्य युवक घरदार सोडून, डोकें–दाढी मुंडून भिक्षु होऊन भगवंताच्या भिक्षु संघांत दाखल होत. गांवांत जिकडे तिकडे बुद्ध भगवंताच्या गोष्टीच गोष्टी. त्यांचा प्रभाव, त्यांचा महिमा, त्यांचा धर्म, त्यांचा उपदेश, त्यांचा संघ हाच एक विषय सर्व स्त्रीपुरुषांच्या तोंडीं होऊन बसला.

शुद्धोदन राजाला आतांपर्यंत आशा होती कीं सिद्धार्थ हा मागेंपुढें केव्हां तरी परत येऊन राज्यभार ग्रहण करील. पण ती त्याची आशा भगवंताची ती वैराग्यपर वृत्ति पाहून पार मावळून गेली. तो अगदीं निराश झाला. वय पहावें तर ९५ वर्षांचें. अगदीं पिकलेलें पान ! केव्हां गळून पडेल याचा नेम नाहीं. तेव्हां घरचा प्रपंच व राज्यकारभार संभाळून नेणारा मागें कोणीतरी एक असावा म्हणून याचा दुसरा पुत्र जो नंद त्यास युवराजपदीं स्थापन करून त्याच्या-

कडे राज्यभार सोंपविण्याचा मनांत निश्चय करून ज्योतिषांकडून तो मुहूर्तहि त्यानें ठरविला.

तो मंगल दिवस उजाडला. राजवाड्यांत मोठा उत्सव सुरू झाला. भगवान व त्यांचा भिक्षुसंघ त्या दिवशीं वाड्यांत भोजनास आला होता. भोजन वगैरे आटपल्यावर परत जातेसमयीं नंदास हाक मारून त्यांनी त्याच्या हातीं आपलें भिक्षापात्र दिलें. नंद तें हातांत घेऊन पुढें चालूं लागला. न्यग्रोधारामांत येऊन पोंचल्यावर भगवंतांनी आपलें भिक्षापात्र त्याच्याकडून घेऊन त्यास म्हटलें–'नंदा ! तुझ्याकडून ब्रह्मचर्यव्रत पालन होऊं शकणार नाहीं काय ?' नंदानें त्यांना 'न व्हायला काय झालें ? अवश्य होईल !' असें मोठ्या ऐटींत उत्तर दिलें. तेव्हां भगवंतांनी ताबडतोब त्याचें मुंडण करवून त्यास भिक्षु बनवून संघांत दाखल करून घेतलें !

ही बातमी गावांत समजतांच लोकांना मोठें आश्चर्य झालें. जो तो तोंडांत बोट घालून 'हें काय झालें, नि कसें झालें' असे उद्गार काढून विस्मय करूं लागला. शुद्धोदन तर ही वार्ता ऐकून जवळ जवळ दुःखशोकानें अर्धवेडाच बनला ! सिद्धार्थाच्या नंतर तेवढा एकच आशांकुर त्याचा शिल्लक राहिला होता. तोही आतां करपून गेला ! मग त्यास वेड लागणार नाहीं तर काय होईल ? पुढें बुद्धांनी त्याच्याजवळ येऊन त्यास यथोचित धर्मोपदेश करून कसेंबसें त्याचें सांत्वन केलें.

यानंतर पुढें कांहीं थोडक्याच दिवसाची गोष्ट. राजवाड्यांत निमंत्रण आल्यावरून भगवान तेथें भोजनास आले होते. या वेळीं त्यांचा मुलगा राहुल हा आठ–नऊ वर्षांचा झाला होता. भोजन आटपून परत जात असतां यशोधरेनें त्या बालकाला जवळ घेऊन भगवंताकडे बोट करून त्याला म्हणाली 'बाळ ! तो पहा, तो तेजस्वी योगिराज चालला आहे ना ? तो तुझा पिता आहे ! त्याच्याजवळ जा आणि तूं आपला पैतृक हिस्सा माग'

राहुल धांवतच बुद्धाकडे गेला व त्यांच्याजवळ गेल्यावर त्यांना अडवून म्हणाला, 'पिताजी !'

बुद्ध:—काय ? बेटा !

राहुल:—मला माझा हिस्सा द्या ना ?

बुद्ध:—तुला हिस्सा पाहिजे ? पण बाळा, माझ्याजवळ सोने रुपें कांही नाहीं. ज्ञानभांडार मात्र विपुल आहे. तें तुला हवें असल्यास देतों. त्यापासून तुला शाश्वत सुखशांति लाभेल. हवें कां तुला तें धर्मज्ञान ? होतोस कां तूं भिक्षु ? राहशील कां तूं आमच्या संघांत येऊन ?

राहुल:—हो हो ! राहीन कीं आपल्याजवळ भिक्षु होऊन मी !

नंतर बुद्ध सारिपुत्राकडे वळून म्हणाले:—माझा मुलगा आपला दायभाग मागतो. तेव्हां त्याला मी नश्वर व चंचल असा द्रव्यनिधि न देतां, कधींहि नाश न पावणारें असलें अमर ज्ञानधन देऊं इच्छितो. तर त्याला बरोबर घेऊन चल.'

असें म्हणून राहुलला बरोबर घेऊन भगवान न्यग्रोधारामांत गेले व नंतर त्यास श्रमणेर करून संघांत दाखल करून घेते झाले.

ही बातमी शुद्धोदनास समजतांच त्याचें अवसानच खचलें! पहिला मुलगा सिद्धार्थ हातचा सुटला ! दुसरा नंदहि गेला. आणि आतां शेवटचा आशातंतु जो राहुल तोहि तुटून पडला ! मग त्या म्हाताऱ्याला आकाश कोसळल्याचा भास होऊं नये तर काय व्हावें ?

दु:खित अंत:करणानें व खिन्न मनानें धांवतच तो भगवंताजवळ आला आणि म्हणाला, 'भगवंता ! हें तूं काय आरंभिले आहेस ? तुझ्यावर माझी सर्व भिस्त होती. तो तूं मला सोडून गेलास ! परवा नंदासहि फितवून नेलेस ! आणि आतां माझा एकुलता तेवढा नातू, ताहि मला न विचारतां येथें घेऊन येऊन त्यासहि श्रमणेर–दीक्षा

दिलीस ! आतां माझा वंश नष्ट झाला ! निदान आतां एवढें तरी कर, याउप्पर लहान मुलांना त्यांच्या आईबापाला विचारल्याशिवाय संघात सामील करून घेऊं नकोस !

बुद्धांनी पित्याची ही प्रार्थना मान्य केली व त्यास चार समजुतीच्या गोष्टी सांगून त्याचें समाधान केलें. त्या दिवसापासून अज्ञान मुलांनां आईबापांच्या सम्मतीशिवाय दीक्षा देऊन संघात घेण्यास बंदी केली.

ग्रीष्मऋतू संपत आला. तेव्हां भगवंतांनी तेथून तळ हलवून अंतपानदीच्या कांठावर असलेल्या अनुपीय नांवाच्या आम्रवनांत येऊन मुक्काम केला. तेथें असतां अनिरुद्ध, आनंद, भद्रिय, किमिल, भृगु व देवदत्त असे सहा शाक्यवंशीय राजपुत्र भगवंताजवळ येऊन भिक्षुसंघांत दाखल होण्याची त्यांनी आपली इच्छा दर्शविली. त्यांच्या-बरोबर उपाली नांवाचा एक न्हावीहि आला होता. प्रथम त्यानेंच ही गोष्ट काढिली. म्हणून त्यास अगोदर दीक्षा देऊन त्यास संघांत दाखल करून घेतलें आणि नंतर वरील सहा राजपुत्रांसहि प्रव्रज्या देऊन त्यांनाहि संघांत समाविष्ट करून घेण्यांत आलें.

त्यांत आनंद हा भगवंताचा चुलत भाऊ व देवदत्त हा त्यांचा आतेभाऊ व चुलत मेहुणा लागतो. पुढें आनंद हा भगवंताचा अखेर-पर्यंत एकनिष्ठ शिष्य व सेवक होऊन त्यांच्या अगदीं सन्निध राहूं लागला. पुढें बुद्धानंतर त्यानेंच त्रिपिटकाचा संग्रह केला. उपाली हा महाज्ञानी होऊन विनय पिटकाचा आचार्य झाला. अनिरुद्धाला दिव्य दृष्टीचा लाभ होऊन तो पूर्ण ज्ञानी बनला. देवदत्ताची गोष्ट मात्र अगदीं निराळी झाली. तो इतिहास पुढें येईलच.

भगवान कपिलवस्तु येथें असतांना राहुलास दीक्षा दिल्यावर यशो-धरेनें आपणहि भिक्षुणी होऊन संघांत येऊन राहण्याची भगवंतापाशी इच्छा प्रदर्शित केली. पण भगवंतांनी स्त्रियांना तें शक्य नाहीं असें सांगून तिची समजूत करून तिला परत पाठविली.

सहा राजकुमारांना संघांत दाखल करून घेतल्यावर भगवान तेथून निघून राजगृह येथें जाण्यास निघाले. या वेळीं त्यांचा भिक्षुसंघ बराच वाढला होता.

---

## जेतवन--विहार

चुल्लवग्ग ६–३–१ व ६

अनाथपिंडक म्हणजे कांहीं लहान सहान व्यक्ति नव्हती. नवकोट नारायण तो ! मग त्याची श्रीमंती नि वैभव काय व किती म्हणून सांगावें ! जितका तो श्रीमंत तितकाच तो उदार ! गोरगरिबांचा व अनाथ दीन जनांचा मोठा कनवाळू ! भुकेल्यांचा अन्नदाता व अडल्या-नडल्यांचा आश्रयदाता ! त्याचें मूळचें नांव सुदत्त पण त्याच्या औदार्यवृत्तीमुळे व दीनवत्सलतेमुळें अनाथपिंडक हें उपनांव त्यास प्राप्त झालें होतें व त्याच नांवानें तो लोकांत त्यावेळीं ओळखिला जात असे.

राजगृहीं असतांना भगवान बुद्धाला येत्या वर्षाकाळीं श्रावस्ती येथें मुक्काम करण्यास आमंत्रण देऊन तो घरीं परतला. श्रावस्ती येथें आल्यावर भगवंताची सोय कोठें करावी, त्यांना राहण्यास कोणती जागा प्रशस्त व सोइस्कर आहे याबद्दल विचार करीत असतां त्याला तेथील राजपुत्राचें सुंदर उद्यान दृष्टीसमोर दिसलें. तें विविध फलपुष्पादिकांनी सुसंपन्न असून शिवाय इतर दृष्टीनेंहि श्रेयस्कर असें दिसलें. तें राजपुत्राकडून विकत घेऊन, तेथें एक सुंदर विहार बांधून तेथें भगवंताची उतरण्याची सोय करावी आणि तें भिक्षुसंघास दान देऊन टाकावें म्हणजे श्रावस्ती येथें बुद्ध आल्यावेळीं त्यांना राहण्याचें एक कायम स्थान झालें असा विचार करून त्या नगरशेटाची दृष्टि त्यावर खिळून बसली.

पण ती गोष्ट सहज घडून येईल इतकी सोपी नव्हती. प्रत्यक्ष जेत राजकुमाराचें विलासी उद्यान तें ! पाण्यासारखा पैसा खर्च करून त्याला नंदनवनाची स्वर्गीय शोभा आणलेली ! मग त्या श्रेष्ठीचें मनोराज्य सहज सत्यसृष्टींत कसें उतरणार? हें अनाथपिंडकास कळत नव्हतें असें नव्हे. ती गोष्ट सहज--साध्य नाहीं, हें तो पूर्ण ओळखून होता. पण बुद्धावरील त्याच्या अलोट निष्ठेमुळें त्या दिव्य स्थानाव्यतिरिक्त त्याला इतर जागा प्रशस्त व पसंत वाटेना. म्हणून त्यानें मनाचा हिय्या करून राजपुत्राजवळ ती गोष्ट काढली. राजपुत्राच्या मनांत तें उद्यान द्यावयाचें नव्हतें. पण सहज त्या श्रेष्ठीचें मन पाहवें म्हणून तो म्हणाला--शेटजी ! कांहीं हरकत नाहीं. मी तुला उद्यान खरेदी देतो. पण लक्षांत ठेव कीं त्या जमीनीवर तूं सोन्याच्या मोहरा सारख्या पसरल्या पाहिजेस. जेवढी जमीन तूं सुवर्णमुद्रांनीं भरून काढशील तितकी जागा तुझ्या मालकीची होईल ! आहे कबूल ?

अनाथपिंडकाला काय, हेंच पाहिजे होतें ! चटकन् त्यानें नोकराला हुकूम करून गाडींतून मोहरांच्या थैल्या भरून आणल्या आणि त्यांच्या गांठी उकलून आंतील मोहरांनीं जमीन झांकून काढली ! हा प्रकार पाहून जेत राजपुत्र विस्मकचकित झाला ! आपण योजलें काय नि हें झालें काय ? अनाथपिंडकानें आपणास वचनांत पकडलें आणि आतां त्यांतून सुटका नाहीं हें पाहून त्याला क्षणभर विषाद वाटला. आणलेल्या मोहरा सर्व पसरून झाल्यावर आणखी थोडी जमीन उघडी राहिली. तेव्हां तीही भरून काढावी या इराद्यानें त्या श्रेष्ठीनें पुनः मोहरा आणण्यास सांगितलें.

तेव्हां राजपुत्राची दृष्टि निवळली व त्यानें इतका पैसा खर्च करून तें उद्यान विकत घेण्याचें कारण काय हें त्या श्रेष्ठीस विचारलें. श्रेष्ठीनें तें उद्यान घेऊन तेथें एक विहार बांधून ती सर्व जागा बुद्ध भगवंतास

अर्पण करावयाची आहे असें सांगितल्यावर राजपुत्राला त्या श्रेष्ठीचें औदार्य पाहून मोठा सविस्मय आनंद झाला.

बुद्धाची कीर्ति जेतानें लोकांच्या तोंडून ऐकली होती. व त्याचीहि भगवंतावर श्रद्धा जडली होती. श्रेष्ठीच्या या पुण्यकर्मांत भागीदार होण्याची ही आयती आलेली संधि वाया दवडूं नये असा विचार त्याच्या मनांत एकदम चमकला व त्यासरशी तो त्या शेटजीस म्हणाला –'शेटजी! आतां मोहरा आणण्याची तसदी घेऊं नका! आपण फार उदार पुरुष आहा. व आपण अंगिकारिलेलें कार्य मोठें पुण्यकारक आहे. तेव्हां मी आपणास असें सुचवितो कीं मला तुमचा इतका पैका नको. यांतील अर्धी रकम मी घेतो व उद्यानातील सर्व जमीन तुम्हास देतो. पण त्यांत झाडें जीं असतील तीं माझ्या मालकीचीं राहतील आणि तीं मी माझी अल्पसेवा म्हणून बुद्ध भगवंतास अर्पण करतो. म्हणजे बुद्ध भगवंताची सोयची सोय झाली आणि आपण दोघेहि त्या पुण्यकर्माचे भागीदार झालो. ही माझी सूचना अपणास मान्य होणार नाहीं काय?

जेतराजपुत्राचें हें भाषण ऐकून अनाथपिंडकास संतोष झाला व मोठ्या आनंदानें त्यानें राजपुत्राच्या त्या सूचनेस आपली सम्मति दिली. नंतर त्या श्रेष्ठीनें तेथें अगणित पैसा खर्च करून एक सुंदर विहार बांधून त्यास जेतवन–विहार असें नांव दिलें. आणि त्यामुळें त्या जेत राजपुत्राचें नांव पुढें अजरामर झालें!

विहार तयार झाल्यावर ही बातमी भगवंतास त्यांच्या मुक्कामांत कळविणेंत आली. आणि त्यास आतां श्रावस्तीस निघून येण्यास आमंत्रण देण्यांत आलें. त्याप्रमाणें बुद्ध भगवान आपल्या भिक्षुसंघासहित श्रावस्तीस जावयास निघाले.

तेथें पोंचल्यावर अनाथपिंडक त्यांस सामोरा गेला व त्यांना मोठ्या थाटानें मिरवीत मिरवीत, त्या जेतवन विहारांत घेऊन आला. तेथें

त्यांची उतरण्याची सोय करून दुसरे दिवशी आपलें घरीं भोजनास येण्यास भगवंतास त्यानें आमंत्रण दिलें. व त्याप्रमाणे भगवान आपल्या भिक्षुसंघासहित ठरल्यावेळी श्रेष्टीचें घरीं येऊन भोजन करून संतुष्ट झाल्यावर तो अत्यंत रमणीय विहार भिक्षुसंघाकरतां म्हणून भगवंतास दान दिला.

हा विहार बुद्ध देवांस इतका पसंत पडला कीं पुढें त्यांनी तेथें वीस पावसाळे काढले. व अनेक धार्मिक घडामोडी केल्या. बौद्धधर्माच्या इतिहासांत या जेतवन विहारास पुढें फार मोठें महत्त्व प्राप्त झालें. बुद्धकालीं तें एक प्रमुख धर्मपीठच होऊन बसलें.

---

## राजा प्रसेनजितांस उपदेश

अश्वघोष

प्रसेनजित राजाला भगवान बुद्धदेव श्रावस्ती येथें जेतवनांत येऊन राहिले आहेत ही बातमी समजतांच तो आपल्या रथांत बसून त्यांच्या भेटीस निघाला. व जेतवनाजवळ आल्यावर रथांतून उतरून भगवंताच्या जवळ जाऊन त्यांना नमस्कार करून तेथेंच जरा बाजूला बसून म्हणाला—भदंत ! आपला पवित्र पाय माझ्या राज्याला लागला त्या अर्थी माझें राज्य धन्य झालें ! मला आपलें पवित्र दर्शन झालें त्या अर्थी मीहि धन्य झालो ! आतां भगवंतांनी मला ज्ञानामृत पाजून कृतकृत्य करावें. सांसारिक सुखलाभ केव्हांही चंचल व नश्वर आहे. पण धर्मज्ञान हें शाश्वत व अक्षय आहे. प्रपंचांत असलेला मनुष्य —तो राजा जरी असला तरी—उपाधिग्रस्त असतोच. त्याला केव्हांहि मनःशांति अशी ठाऊकच नसते. पण जो निरिच्छ व धर्मप्रवण असतो —तो अगदीं सामान्य मनुष्य जरी असला तरी—तो शांत व प्रसन्नचित्त असतो. नव्हे का ?

भगवंतांनी राजाचें हृद्गत जाणून व तो प्रपंचसुखलालसेला विटला आहे असें समजून त्या प्रसंगाचा फायदा घ्यावा या इराद्यानें त्यास म्हटलें—राजा ! तुझें म्हणणें बरोबर आहे. आपल्या वाईट कर्मानें ज्यांना नीच योनींत जन्म प्राप्त झाला असेल अशा पतित लोकांना देखील सत्पुरुषाचें दर्शन झालें असतां मोठा आनंद नि धन्यता वाटते. मग तुझ्यासारख्या स्वतंत्र व पुण्यवान राजाला तथागताचें दर्शन झाल्यावर आनंद व धन्यता वाटणार नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे ? आतां मी राजेश्वराला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगतों. तिकडे त्याचें अवधान असावें. राजन् ! आमचीं चांगलीं अगर वाईट कर्में सावली-प्रमाणें आमच्यामागें चिकटून राहत असतात. राजाला कशाची अवश्यकता असेल तर ती प्रेमळ अंतःकरणाची होय. तुझी जी प्रजा आहे तिला तुझ्या एकुलत्या पुत्राप्रमाणें समज ! तिच्यावर जुलुम जबरदस्ती करूं नकोस ! किंवा तिला छळूं व गांजूं नकोस ! तूं स्वतः इंद्रियनिग्रहानें रहा व प्रेमानें व न्यायबुद्धीनें राज्य कर ! असत्य गोष्टीचा त्याग कर ! आणि सन्मार्गानें वाग ! अशक्तांना पायाखाली तुडवून आनंद मानूं नकोस ! दुःखितांवर कृपादृष्टि ठेवून त्यांना सुखी कर ! तूं आपल्या राजेपणाच्या इज्जतीवर न जाशील तर तुझें कल्याण होईल ! व तसेंच जे स्तुतिपाठक असतात त्यांच्या गोड भाषणाला न भुलशील तर त्यांत तुझें हितच आहे ! राजा, मनुष्य हा जन्म, जरा, रोग नि मरण यांनी चोहोबाजूंनी वेढलेला आहे. त्यांतून सुटून पार व्हावयास सत्यज्ञान व पवित्राचरण यांशिवाय दुसरा मार्ग नाहीं. जे शाहणे व विचारी आहेत ते शारीरिक सुखोपभोग तुच्छ व त्याज्य लेखतात. आळसाची निंदा करतात. आत्मोत्कर्ष नि आत्मोद्धार हेंच त्यांचें ध्येय असतें व त्यासाठींच त्यांचा सगळा प्रयत्न असतो.

**राजा**:—खरी गोष्ट, भदंत !

**बुद्ध**:—जेथें विषयवासना आहे तेथें सत्य राहूं शकत नाहीं. सत्यज्ञानाशिवाय मनुष्य कितीहि विद्वान व बहुश्रुत असला तरी तो अज्ञानीच होय ! ज्याला खरें धर्मज्ञान झालें तोच ज्ञानी ! सत्यज्ञान मिळविणें हेंच मनुष्याचें एकमेव ध्येय असावयास पाहिजे. तिकडे जो दुर्लक्ष करील त्याचें जिवित विफल आहे ! कोणताहि धर्म असो, त्याची शिकवण या मुद्यावर केंद्रित असली तरच तो धर्म !

**राजा**:—हें धर्मज्ञान केवळ श्रमण अगर सन्यासी करतांच आहे काय ?

**बुद्ध**:—नाहीं, राजा, तसा कांहीं प्रकार नाहीं. तें प्रत्येक मनुष्या-साठीं आहे. मग तो ब्राह्मण असो वा शेतकरी असो. या बाबतीत भिक्षु व सामान्य जन असा भेद नाहीं. कित्येक सन्यासी असूनहि ते संसारांत पडतात व कित्येक संसारी असूनहि ते ऋषीपद प्राप्त करून घेतात ! सुखलालसा—देहतर्पण बुद्धि—ही सर्वांना सारखीच मागें पुढें आपत्तिजनक आहे ! सर्व जग तिच्या प्रवाहांत सांपडून धडपडत आहे व असतें ! त्यांत जो सांपडला त्याला तरणोपाय नाहींच ! फक्त सत्यज्ञान हेंच नावेप्रमाणें तारक आहे. म्हणून धर्माची हांक अशी आहे कीं 'मनुष्य हो, उठा नि माराच्या तडाक्यांतून आपलें रक्षण करा !' राजा, कर्माची गति फार विलक्षण आहे. ती चुकविणें फार कठीण, किंबहुना शक्यच नाहीं. म्हणून शहाण्यानें सत्कर्में आचरावींत. दुष्कर्माचा त्याग करावा. कारण जगाचा हा न्यायच आहे कीं पेरावें तसें उगवतें. म्हणून म्हणतों कीं, सत्कर्म व सद्बुद्धि यांच्या योगानें तूं श्रेष्ठपद संपादन कर. सर्व जागतिक व प्रापंचिक वस्तु नश्वर आहेत आणि जीवित हें क्षणभंगुर आहे. म्हणून, राजा ! मनाचा विकास कर ! दृढ श्रद्धा ठेव ! राजधर्माचें अतिक्रमण करूं नकोस ! बाह्य विषयांत सुख मानूं नकोस ! आत्मोन्नति हेंच खरें सुख आहे. अशा रीतीनें वागशील तर तुझी कीर्ति दिगंत होऊन तूं

अमर होशील ! ! आणि तथागताचा तुजवर प्रसाद होईल !! इतकें सांगून झाल्यावर आपल्या उपदेशाचें सार म्हणून त्यांनी ही पुढील गाथा म्हणून दाखविली:—

**आरोग्यपरमा लाभा सन्तुट्ठी परमं धनं**
**विस्सासपरमा ञाति निब्बाणं परमं सुखं**

( धम्मपद १५–८ )

आरोग्य हा श्रेष्ठ लाभ आहे. संतोष हें श्रेष्ठ धन आहे. विश्वास हा श्रेष्ठ सखा आहे आणि निर्वाण हें श्रेष्ठ सुख आहे ! ! हा उपदेश ऐकून राजाला महानंद झाला व भगवंतावर त्याची अधिक भक्ति जडली.

याप्रमाणें राजास उपदेश केल्यावर भगवान तेथें कांहीं दिवस मुक्काम करून मग तेथून तळ हालवून राजगृहाकडे वळले. वाटेवर अनेक ठिकाणीं उतरून लोकांस उपदेश करून धर्मप्रसार करण्याचें कार्य त्यांनी नेटानें चालू ठेविलें. आणि वर्षावासाच्या प्रारंभी राजगृह गांठलें.

---

## वैशाली येथील चमत्कार

( सुत्तनिपात २–१ )

राजगृह येथें भगवंतांनीं तो सबंध वर्षावास तेथें राहूनच काढला. त्या वर्षीं मेघराजाची इतराजी झाल्यामुळें लिच्छवी राज्यांत दुष्काळाचें प्रचंड व उग्र स्वरूप माजून, लोक फार त्रस्त व ग्रस्त झाले होते. खावयास अन्न नाहीं व प्यावयास पाणी नाहीं. घरदार सोडून अन्नान्न करीत गरीब रयत गांवोगांव फिरत सुटले. तशांतच मनुष्य संहारक रोग व व्याधि यांनी उचल खाल्ली ! मग आतां काय सांगावें त्या बिचाऱ्यांचे हाल व दैना ? दुर्भिक्ष व महारोग या दोहोंच्या

कैचींत सांपडून वैशालीची सुखी प्रजा मोठ्या संकटांत व पेचांत पडली. गांवोगांव व रस्तोरस्तीं लोकांचीं प्रेतें पडून सर्वत्र हाहाकार माजून राहिला !

खुद्द वैशाली येथें दुर्भिक्षानें मोठा कहरच माजविला. केवढें तिचें वैभव नि कोण तिची भरभराट ! पण या दुष्काळामुळें व रोगाच्या भडिमारामुळें ही नगरी ओस पडून स्मशानवत् भासूं लागली ! आपल्या प्रजेची ही दुर्दशा पाहून लिच्छवी महाराज फार दुःखित व चिंताक्रांत झा[illegible] करावें हें त्यांना सुचेना. मंत्र्यांची सल्ला घेतली. ज्योतिषां[illegible]रून पाहिलें. देवतानुष्ठान चालूं केलें. मांत्रिकांकडून मंत्रतंत्र क[illegible] पाहिलें. पण कोणालाच नि कशालाच यश येईना ! सर्व उपाय थकले ! सर्व प्रयत्न फसले ! सर्व दैवी उपचार निरर्थक ठरले ! ! प्रजा फार हवालदील झाली ! ! व पटापट मृत्युमुखी जाऊन पडूं लागली ! !

महाराजानें या दैवी विपत्तींतून आपल्या प्रजेला वांचविण्यासाठीं हरप्रयत्न केले. अनेक महात्म्यांचा त्यानी सल्ला घेतला. निर्ग्रन्थनाथपुत्र झाला. पूर्ण कश्यप झाला. मस्करी गोशाल झाला. अजितकेश कंबल झाला. ककुध कात्यायन झाला. या सर्वांची सल्ला घेवून झाली. पण कोणाचाच मंत्र प्रभावी ठरेना ! व कशालाच यश येईना ! महाराजांस मोठी चिंता लागून राहिली व ते रात्रंदिवस बेचैन झाले. अशा निराशमय स्थितींत काळ कंठत असतां चर्चेच्या वेळीं एकानें सहज त्यांस भगवान गोतम बुद्धाचें नांव सुचवून म्हटलें कीं 'महाराज ! आपण सर्व कांहीं केलें. कशालाच यश आलें नाहीं. माझ्या मतें एक गोष्ट राहिली. ती तेवढी करून साधल्यास पाहा. भगवान गोतमबुद्ध येथें शेजारीच आहेत. त्यांचा मुक्काम राजगृहांत आहे. ते मोठे महात्मे आहेत ! त्यांना दिव्य शक्ति लाभली आहे म्हणतात. त्यांच्या दैवी चमत्कृतीच्या अनेक गोष्टी लोक बोलून दाखवितात. त्यांना बोलावून आणून त्यांचा एकदा

सल्ला घेऊन पहा ना. न जाणो, यातून ते कदाचित् कांही अचूक मार्ग दाखवूं शकतील !'

महाराजांना ही सूचना पसंत पडली. व ताबडतोब भगवंतांना आणण्यासाठीं आपला एक राजमंत्री त्यांनीं त्यांच्याकडे पाठवून दिला. त्याप्रमाणें मंत्री दौड करून राजगृहास आला व वेणुवनांत प्रवेश करून त्यानें भगवंताची भेट घेतली. भगवंतांनी त्याला प्रेमपूर्वक जवळ घेवून सामोपचाराचे कुशल प्रश्न विचारून झाल्यावर इकडे येण्याचें कारण विचारलें. तेव्हां मंत्र्यांनी सर्व हकीकत सांगून भगवंतांनी वैशालीस येऊन भेट द्यावी अशी महाराजांची अत्यंत आग्रहपूर्वक विनंति आहे असा निरोप कळविला व त्यांस वैशालीस येण्याचें आमंत्रण दिलें. भगवंतांनी तें मौन धारण करून मान्य केलें.

पुढें लौकरच भगवान वैशालीकडे निघाले. ही बातमी बिंबसारास कळतांच तोहि भगवंतास पोंचविण्यासाठीं म्हणून स्वतः गंगानदीपर्यंत आला. लिच्छवी महाराजास ही वार्ता आधींच कळविण्यांत आली असल्यामुळें तोहि भगवंताचें दरबारी थाटानें स्वागत करण्यासाठीं म्हणून आपल्या सर्व परिवारासहित गंगेच्या पलीकडच्या तीरावर येऊन दाखल झाला. भगवान गंगानदी ओलांडून परतीरावर आल्यावर महाराजांनीं त्यांचा अत्यंत गौरवपूर्वक सत्कार केला. व त्यांस बरोबर घेऊन तेथून प्रस्थान हलविलें.

खऱ्या महात्म्यांचा प्रभाव कांहीं औरच असतो ! त्यांच्या दर्शनमात्रें करूनच दुःखितांचें दुःख पार वितळून जातें ! असा भारतीय महात्म्यांचा अलौकिक प्रभाव आहे ! मग तुम्ही आजचे सुशिक्षित लोक खरा माना अगर मानूं नका. त्याचें आतां काय ? वैशालीस भगवंताचे पाय लागले न लागले तोंच आकाश भरून आलें व मेघराजानें भगवंताचे पाय स्वर्गीय गंगेनें धुवून काढले ! विजा त्यांच्या स्वागतार्थ कडाडूं लागल्या व मुसळधार पावसाची सारखी सरबत्ती लागली ! क्षणार्धांत

जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें. तहानेनें तळमळणारी वैशाली नगरी हां हां म्हणतां त्या अमृत वर्षावाने संतृप्त झाली व जिकडे तिकडे आनंदाचे फवारे उफाळूं लागले! मोठा चमत्कार झाला व वैशालीचें नष्टचर्य क्षणार्धांत नष्ट झालें! या वेळीं भगवंताच्या तोंडातून जे उद्गार निघाले ते पुढे रतन सुत्तांत संग्रहीत करून ठेवण्यांत आले असून अवर्षण काळीं किंवा इतर प्रसंगीं बौद्ध त्याचें मोठ्या भक्तीनें आजहि पठण करतात. ऋग्वेदांत पर्जन्यसूक्त म्हणून कांहीं सूक्तें आहेत त्यांच्याच तोडीचें बौद्धाचें हें रतनसुत्त होय. याप्रमाणें भगवंताच्या पादस्पर्शाने दुर्भिक्ष्य व रोगराई यांनीं त्रस्त झालेलें तें लिच्छवी राज्य पीकपाण्याने पुनः समृद्ध होऊन शांतिसमाधानानें विलसूं लागलें.

यानंतर भगवान तेथें काहीं दिवस राहून वैशाली महाराजाचा पाहुणचार घेतल्यावर पुनः त्यांचा मुक्काम तेथून राजगृही वेळु वनांत येऊन पडला. पुढील वर्षावास लिच्छवी महाराजाच्या विनंतीवरून वैशाली येथें काढण्याचें ठरवून त्याप्रमाणें योग्य वेळीं पुनः ते वैशालीस येऊन दाखल झाले व तो वर्षावास कूटागार विहारांत राहून काढला.

---

## शुद्धोदनाचा अंतकाल

अश्वघोष

भगवान कूटागार विहारांत असतांना कपिलवस्तूहून बातमी आली की राजा शुद्धोदन हा अत्यंत अस्वस्थ असून भगवंतांचें एकवार शेवटचें दर्शन घेऊं इच्छितो. दूतानें ही बातमी कळवितांच त्यांनी तांतडीनें कपिलवस्तूकडे धांव घेतली. पिताजींची शेवटची इच्छा ती! कदाचित अतृप्त राहिली तर तेवढ्याचसाठीं पुनः गर्भवास!! पिताजींची ती दगदग व यातायात टाळण्यासाठीं भगवान शरपंजरी पडलेल्या पिताजींची ती शेवटची इच्छा तृप्त करण्यासाठीं ताबडतोब आपल्या जन्मस्थानाकडे वळले.

विचारा शुद्धोदन ! आतां अगदीं थकला व भागला होता. वयाला ९७ वर्षे झालीं असून सर्व शरीर पिकून अगदीं जर्जर झालें होतें. धड उठतां येत नव्हतें कीं बसतां येत नव्हतें. मग चालण्याची गोष्ट तर बाजूसच राहिली. सर्व गात्रें शिथिल झालीं असून, इंद्रियांनी आपापलीं कर्तव्यें जवळ जवळ झुगारूनच दिलीं होतीं. अर्थात् सर्व बाजूने म्हातारा अगदीं पराधीन झाला होता. भगवान बुद्ध जेव्हां त्याच्या दर्शनास आले तेव्हां तो आंथरुणास अगदी खिळून राहिला होता.

भगवान आल्याची बातमी त्यास कळविणेंत आली तेव्हां त्यानें मिटलेले डोळे उघडून बाजूस पाहिलें तो प्रत्यक्ष भगवान बुद्ध देव पुढें उभे ! त्यांचें दर्शन डोळे भरून घेतलें. आणि बोलण्याचा प्रयत्न केला पण तोंडातून शब्द निघेना ! डोळे पाण्यानें डबडबून आले आणि कंठ गद्गदित झाला ! भगवंतानी आपला अमृत हात त्याच्या शरीरावरून फिरवून थोडक्यांत शेवटचा उपदेश केला. याचा असा परिणाम झाला कीं त्यास एकदम सत्यज्ञान होऊन अर्हतावस्था प्राप्त झाली ! अर्थात् त्याचा संसार बंध सुटला व निर्वाण लाभलें ! ! पुढे तिसऱ्या दिवशीं म्हणजे श्रावण शुद्ध पौर्णिमेस महाराजाची इहलोकयात्रा संपली. भगवंतांनी यथाविधि त्याचें और्ध्वदेहिक कर्म करवून, वाड्यातील लोकांस प्रसंगोचित धर्मोपदेश करून त्यांचें समाधान केलें. पुढें कांहीं दिवस तेथें राहून मग तेथून त्यांनी आपला तळ हलविला.

---

## संघांत स्त्रीप्रवेश

चुल्लवग्ग १०–१–२ ( विनयपिटक )

शुद्धोदनाच्या पश्चात त्याचा पुतण्या म्हणजे अमृतोदनाचा मुलगा महानामा हा त्याच्या जागीं आला. महाप्रजापती गोतमीला आतां तेथें करमेना. सती यशोधरेचीहि तीच स्थिति झाली. किंबहुना अधिकच

नाजूक व करुणास्पद झाली असें म्हटलें तरी चालेल. पतिराज जिवंत पण उपयोग काय ? एकुलता एक मुलगा बाळ राहूल, पण तो आशा-तंतू असूनहि नसल्यासारखाच ! ! मग त्या सतीमनाची व मातृहृदयाची काय दशा झाली असेल ती फक्त तें सती व मातृहृदयच जाणें ! इतरांना ती अगम्य आहे असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

शुद्धोदनाच्या परलोकगमनानंतर पुढें लवकरच गोतमीनें वैराग्य वृत्ति धारण करून अवशेष आयुष्य भिक्षुणी होऊन भगवंताजवळ राहून घालविणेचें मनांत निश्चित केलें. आणि तो निर्धार कायम करून तिनें आपले केंस कापून टाकलें व अंगावरील वस्त्राभरणें टाकून साधें केशरी वस्त्र धारण केलें. तिच्याबरोबर जाण्यास यशोधरा हीहि तयार झाली. तिला व आणखी कांहीं इतर शाक्य स्त्रियांना बरोबर घेवून संघांत दाखल होण्यासाठीं म्हणून ती कपिलवस्तुहून वैशाली-कडे निघाली.

या वेळीं भगवंताचा मुक्काम वैशाली येथें कूटागर विहारांत होता. पुढें मजल दरमजल करीत पन्नास योजनें चालून कशीबशी वैशा-लीस येऊन पोंचली. या वेळीं प्रवासामुळें ती फार थकली होती. पाय चालून चालून सुजले होते. चेहरा सुकून काळवंडला होता. धुळीनें पाय माखून गेले होते. अर्थात् ती फारच श्रमली व दमली होती. अशा विपन्न स्थितींत ती कूटागार विहाराच्या पुढच्या दारांत येऊन उभी राहिली.

ही बातमी आंत भगवंतास कळविण्यांत आली. तेव्हां ते उठून तिला भेटण्यासाठीं बाहेर आले. प्रथम कुशल प्रश्न वगैरे विचारून झाल्यावर मग तिला तेथें येण्याचें कारण विचारलें. तेव्हां तिनें आपला मनोदय त्यांस कळविला. भगवंतांनी सर्व हकीकत ऐकून घेतली व पूर्वी यशोधरेस जें उत्तर दिलें होतें तेंच उत्तर तिलाहि देण्यांत आलें.

स्त्रियांना संघांत प्रवेश मिळणार नाहीं असें तिला स्पष्ट सांगून भगवान आंत निघून गेले.

आनंद तेथें जवळ उभा होता. त्याला गौतमीची ती करुणारव स्थिति पाहून मोठी दया आली. भगवान निघून गेल्यावर त्यानें तिच्याजवळ येऊन, दोन गोड शब्द बोलून तिचें समाधान केलें. व तिला तेथेंच जवळ ठेवून घेतलें. पुढें योग्य संधि पाहून भगवान प्रसन्नचित्त असतां पुन: त्यांचें मन वळविणेच्या उद्देशानें तो भगवंतास म्हणाला:—भदंत ! स्त्रिया भिक्षुणी झाल्या तर त्यांना धर्माचें फल मिळण्यासारखे नाहीं काय ? त्या अर्हत् पदाला योग्य नाहींत काय ?

बुद्ध :— तसं कां म्हणतोस, आनंदा ? त्यांनाहि धर्माचं फल मिळेल कीं ! अर्हत् पदालाहि त्या योग्य आहेत. नाहीं असं नाहीं.

आनंद:—मग तुम्ही महाप्रजापती गौतमीला तो लाभ कां नाहीं देत ? ती तुमची मावशी ना ? तिनं पोटच्या मुलाप्रमाणं लहानपणीं तुमचा संभाळ केला ना ? मग तिला हा फायदा कां बरं देऊं नये ? तिच्या मनांत भिक्षुणी होऊन राहण्याचं आहे आणि म्हणून घरदार सोडून ती इथं आपल्या आशेवर चालत रखडत प्रवास करून आली आहे. तिला संघांत दाखल करून घेतलं तर टीक नाहीं का होणार ?

बुद्ध :—आनंदा ! तुझं म्हणणं खरं आहे. पण स्त्रियांना संघाचे कडक नियम पाळणं फार कठीण आहे. त्यांना तें झेंपणार नाहीं.

आनंद :—तशी ती पाळून राहण्यास कबूल झाली तर ?

बुद्ध:—मग जा विचार तिला. हे पुढील नियम कबूल आहेत कीं काय ?

आनंद :—ते नियम तरी कोणते ? समजूं द्या मला.

बुद्ध :—ते नियम हे पुढील प्रमाणे:—

१ भिक्षुणीनं भिक्षूस नमस्कार केला पाहिजे.

२ पावसाळ्यांत जेथें भिक्षु नाहीं अशा स्थळीं तिनं राहाव-
याचं नाहीं.

३ दर पंधरवड्यास उपोसथाचा दिवस भिक्षूकडून विचारून
घेतला पाहिजे.

४ पावसाळा संपल्यावर भिक्षुणीनं संघापुढें येऊन आपली
वागणूक निर्दोष आहे असं दाखविलं पाहिजे.

५ भिक्षुणीवर गंभीर स्वरूपाचा आरोप शाबीत झाल्यास तिला
संघाकडून मनत्त प्रायश्चित्त घ्यावं लागेल.

६ भिक्षुणी ही दोन वर्षे संघांत राहून शिक्षण घेतल्यावर पुढं
उपसंपदा दीक्षा घेण्यास तिनं संघाची परवानगी मिळ-
विली पाहिजे.

७ भिक्षुणीनं भिक्षूचा निंदापमान करतां कामा नये.

८ भिक्षुणीनं भिक्षूस रागे भरतां अगर दम देतां कामा नये.
हे असे आठ नियम स्त्रिया पाळतील तर त्यांस भिक्षुणी
होऊन संघांत येऊन राहण्यास माझी ना नाहीं.

हें सर्व ऐकून घेऊन आनंद तेथून उठला. व महाप्रजापती गौतमी-जवळ जाऊन, तिला वरील आठ नियम सांगून, व समजावून त्याप्रमाणें वागण्याची तिची व तिच्याबरोबर आलेल्या इतर स्त्रियांची खुपी व तयारी आहे कीं काय हें विचारलें. तेव्हां गौतमीनें तशी आपल्या सर्वांची इच्छा व तयारी आहे असें सांगितलें.

नंतर ही गोष्ट आंत जाऊन आनंदानें भगवंतास कळविली. भगवंतांनी ती मान्य करून, प्रथम गौतमीस दीक्षा देऊन तिला संघांत दाखल करून घेतली. नंतर यशोधरेलाहि दीक्षा देऊन तिला संघांत सामील करून घेतलें. यानंतर इतर स्त्रियांना दीक्षा देऊन त्यां सर्वांचा मिळून एक स्वतंत्र भिक्षुणीसंघ तयार करण्यांत आला. तेव्हांपासून पुढें स्त्रियांना भिक्षुणी होऊन संघात येऊन राहण्याची मुभा मिळाली.

# विशाखा मिगारमाता

अट्ठकथा ( धम्मपद )

श्रावस्तीपासून सात योजनाच्या अंतरावर साकेत नांवाचें एक मोठें शहर होतें. तें ज्यानें वसविलें होतें त्या धनंजय श्रेष्ठीची नवकोट नारायणांत गणना होत होती. विशाखा नांवाची त्याला एक सुस्वरूप व सुविद्य अशी कन्या असून ती उपवर झाली होती.

श्रावस्ती येथें धनंजयश्रेष्ठीच्या तोडीचाच मिगार नावांचा एक धनाढ्य श्रेष्ठी असून त्याला पूर्णवर्धन नांवाचा एक तरुण व सुशील असा मुलगा होता. त्याच्याशी तिचा विवाह करून देण्यांत आला.

विवाह संपल्यावर धनंजयश्रेष्ठी आपल्या कन्येला बरोबर घेऊन श्रावस्तीस आला व तिला सासरी पोंचती करून परत जातांना आपल्या ज्ञातीतील आठ गृहस्थांना बोलावून आणून त्यांना व्याह्या-समोर असें सांगितलें कीं माझ्या मुलीवर सासरच्या कडून कांहीं दोषा-रोप करण्यांत आला तर तुम्ही त्याची चौकशी करून तिला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगाव्या व तिची समजूत करावी.

याप्रमाणें व्यवस्था करून तो धनंजय श्रेष्ठी परत आपल्या गांवी गेला. पुढें लवकरच मिगार श्रेष्ठीनें या नूतन लग्नसमारंभानिमित्त निर्ग्रंथ श्रमणांना आपल्या घरी भोजनास आमंत्रण दिलें. मिगार हा निर्ग्रंथाचा उपासक होता. भोजनाची सर्व तयारी झाल्यावर त्यांचें योग्य आदरातिथ्य करून त्यांस यथेच्छ भोजन घातलें. भोजन संप-ल्यावर आपल्या सुनेला सांगून पाठविलें कीं आपल्या घरीं निर्ग्रंथ अर्हत आले आहेत त्यांच्या दर्शनास यावें.

अर्हत् हा शब्द कानीं पडताच विशाखेला मोठा आनंद झाला. कारण लहानपणापासून ती बुद्धाची मोठी चाहती होती. बुद्ध व त्यांचे भिक्षु याशिवाय इतरांसहि अर्हत् म्हणतात हें तिला माहीत

नव्हतें. घाइघाईनें नीट पोषाख व वेषभूषा करून ती उल्हसित मनानें अंत:पुरांतून दिवाणखान्यांत आली. तेथें तिला अर्हत् न दिसतां नग्न-मूर्ति जैन तीर्थंकर दिसले !

तें त्यांचें किळसवाणें अश्लील ध्यान पाहून ती मनांत फारच चरकली. ती लज्जित झाली व चिडून तिरस्कार मुद्रेनें सासऱ्यास म्हणाली, 'मला आपण येथें कशाकरतां बोलाविलें ? अशा निर्लज्जांना आम्ही अर्हत् म्हणत नसतो !' असे उद्गार काढून तेथें अधिक वेळ उभी न राहतां सात्विक रागानें आली तशी झप्झप् परत निघून गेली.

इकडे त्या श्रमणांना या नववधूनें असा आपला पाणउतारा व अपमान केलेला पाहून फार वाईट वाटलें. व ते मिगार श्रेष्ठीला म्हणाले, हे गृहपते ! ही अवदसा तूं कोठून पैदा केलीस ! जणुं काय तुझ्या मुलाला दुसरी मुलगी मिळालीच नसती ! केवढी द्वाड पोर ! मोठी उद्धट !

मिगाराला हा प्रकार पाहून वाईट वाटलें. तो त्यांना हात जोडून नम्रतेनें म्हणाला--महाराज ! क्षमा करा. अजून तिचा पोरस्वभाव गेला नाहीं. पुढें ती हळूहळू सुधारत जाईल. तिच्या या अल्लड स्वभावाबद्दल आपण न रागावतां तिला क्षमा करावी. याबद्दल मी तिची नंतर चांगली कानउघाडणी करतो.

याप्रमाणें बोलून मिगारानें त्या निर्ग्रंथांची कशीबशी समजूत घालून त्यांस निरोप दिला. व नंतर तो आंत येऊन जेवावयास बसला. विशाखा पंखा घेऊन त्याला वारा घालीत बाजूला उभी राहिली.

इतक्यांत एक बौद्ध भिक्षु दरवाजांत येऊन भिक्षेसाठीं उभा राहिला. मिगार बसलेल्या ठिकाणाहून त्याला पाहत होता. पण त्याच्याकडे दुर्लक्ष करून तो खिरीवर यथेच्छ तांव मारीत होता. 'भिक्षूला वाढा' असे त्याच्या तोंडातून कांहीं शब्द निघेना. बिचारा भिक्षेची प्रतीक्षा करीत तसाच कांहीं वेळ उभा राहिला.

विशाखेला हा प्रकार आवडला नाहीं. सासऱ्याचें हें वर्तन तिला गृहस्थधर्माच्या अगदी उलट दिसलें. व उभ्या असलेल्या जागेवरूनच ती त्या भिक्षूला म्हणाली:—आर्य ! माझा सासरा जुनेपुराणें खात आहे. आपण येथें तिष्ठत न राहतां पुढे व्हा !'

विशाखेचे हे शब्द कानीं पडतांच मिगार अतिशय संतापला व नोकरांना हाक मारून म्हणाला कीं 'अरे, हें माझें भोजनपात्र येथून उचलून न्या. व या पोरीला माझ्या घरांतून याच क्षणीं हांकून द्या. पोरटी इतकी उन्मत्त झाली आहे की माझा उपमर्द करायला हिला लाज वाटत नाहीं. अगदी उद्धट पोरटी ! लाजलज्जा—विनयनम्रता—सगळी कोळून प्याली आहे ! !

मिगार फार संतापला होता. मघांच निर्ग्रंथांचा तसा अपमान नि आतां खुद्द आपलाच असा पाणउतारा ! मग कोण नाहीं चिडणार ? तो फार जळफळला, तडफडला ! पण तिच्या अंगाला हात लावण्याची त्याला किंवा त्याच्या नोकरांना छाति झाली नाहीं ! ती शांतपणें सासऱ्याला म्हणाली:—'मामंजी ! आपण माझ्यावर इतकं रागावूं नये. मी कांहीं विकत आणलेली बाजारी बटीक नव्हे ! आपल्या सारख्याच थोर कुळांत जन्मलेली मी आर्य स्त्री आहे. प्रथम माझा अपराध माझ्या पदरांत घाला आणि मग मला येथून जावयास सांगा. माझ्यावर विनाकारण तोहमत येऊं नये म्हणून माझ्या पित्याने येथें आठ कुलीन गृहस्थांना माझ्या अपराधाची चौकशी करण्यास सांगून ठेविलें आहे. तेव्हां त्यांच्या समोर माझा अपराध मांडा, त्यांनी मला जर दोषी ठरविलें तर मी खुषीनें येथून निघून जाईन. आपण कांहीं एवढी जबरदस्ती मजवर करावयास नको.'

हे सुनेचे स्पष्ट व सडेतोड बोलणें ऐकून मिगार जरासा नरमला. त्यानें त्या आठ गृहस्थांना वर्दी देऊन घरी बोलावून घेतले व ते

सर्वजण आल्यावर त्यांच्या कानावर झालेली हकीकत घालून 'तिला आतांच्या आतां माझ्या घरातून बाहेर काढा' असें सांगितलें.

त्या पंचांनीं त्याचें बोलणें ऐकून घेतल्यावर तिला म्हणाले—काय गे विशाखे ! आपला सासरा जुनें पुराणें अन्न खातो असें म्हटलेंस, तें खरें काय ?

**विशाखाः**—होय; तो जुनेंपुराणें अन्न खातो असें म्हटलें खरें.

**पंचः**—तसें कां म्हटलेंस ? त्याचा अर्थ काय ?

**विशाखाः**—म्हणजे तो नवीन पुण्य संपादन करीत नाहीं. जुन्या पुण्यावरच निर्वाह करतो असा माझ्या बोलण्याचा अर्थ होता तो.

तिचें हें उत्तर ऐकून पंच म्हणाले—तुमच्या सुनेचें म्हणणें आम्हास रास्त दिसतें. त्यांत गैरशिस्त असें कांहींच नाहीं. तेवढ्यानें तिला घरातून बाहेर काढणें हें तुम्हास उचित नाहीं !

आणखी विशाखेचे कांहीं जारीकसारीक दोष मिगारानें त्यांच्या पुढें ठेविलें. पण ते दोष नसून मिगाराचा केवळ गैरसमज होता असें चौकशी अंती दिसून आलें. तेव्हां मिगार म्हणाला—पण 'इचा बाप जेव्हां येथें आला होता तेव्हां आमच्यासमोर त्यानें हिला दहा नियम शिकविले. आम्हाला तर ते अगदी वेडेपणाचे वाटतात. मग तिला त्यांचा अर्थ काय समजला असेल तो असो ! त्यामुळें ही अशी झाली आहे पिसाट ! !

पंच विशाखेकडे तोंड वळवून म्हणाले:—काय गे विशाखे ! धनंजय श्रेष्ठीनें तुला कोणते नियम शिकविले ? व त्यांचा अर्थ काय ? मिगारला ते वेडेपणाचे वाटतात असें तो म्हणतो. तुला काय बोध झाला तो सांग.

**विशाखा**:—ठीक आहे. ऐका तर. आंतली आग बाहेर नेऊं नये. हा पहिला नियम माझ्या बापानें मला शिकविला.

**पंचः**—म्हणजे ?

**विशाखा**:—म्हणजे असें कीं घरांत कांहीं तंटे भांडणें वगैरे झालीं तर त्यांची वार्ता घराबाहेर नेऊं नये. घरांतील विंग बाहेर सांगू नये.

**पंच**:—ठीक. आतां दुसरा नियम ?

**विशाखा**:—त्याचप्रमाणें बाहेरची आग आंत आणूं नये. त्याचा अर्थ मी असा करते कीं शेजारी पाजारी सासूसासऱ्यांचे किंवा जावानणदांचे कांहीं बरें वाईट बोलत असले—निंदा नालस्ती करीत असले—तर तें वर्तमान घरीं कोणाला कळवूं नये.

**पंच**:—यांतहि कांहीं गैर नाहीं. बरें, आतां तिसरा नियम ?

**विशाखा**:—देणाऱ्यालाच द्यावें हा तिसरा नियम व न देणाऱ्यास देऊं नये हा चौथा नियम.

**पंच**:—याचा अर्थ काय ?

**विशाखा**:—जो कोणी उसनवार नेलेली वस्तु परत करतो त्यालाच उसनवार द्यावें. जो तसें करीत नाहीं त्यास पुनः देऊं नये.

**पंच**:—फार सुंदर ! विशाखे ! तुझा अर्थ फार सुंदर आहे. मिगार शेटजी ! यांत तुम्हांस वेडेपणा काय दिसला ? बरं. आतां पांचवा नियम सांग.

**विशाखा**:—देणारा अगर न देणारा असला तरी त्याला द्यावें.

**पंच**:—याचा आम्हांला कांहींच बोध होत नाहीं.

**विशाखा**:—याचा मथितार्थ असा की आपल्या आप्तइष्टांत जर कोणी गरीब अथवा दरिद्री असला तर तेथें हा उसनवारीचा नियम लागू करूं नये. आपल्या गरीब आप्तइष्टांत परत करण्याचें सामर्थ्य नसलें तरी देखील त्यास द्यावें ! नाहीं म्हणूं नये !

**पंच**:—शाबास विशाखे ! तुझें म्हणणें आमच्या सारख्या मोठ्यांनी देखील उचलण्यासारखें आहे.

**विशाखा**:—आतां पुढील नियम सांगते ऐका. सुखानें बसावें

हा सहावा नियम. सुखानें जेवावें हा सातवा नियम आणि सुखानें निजावें हा आठवा नियम.

**पंच**:—तुझे नियम मोठे गूढ आहेत कीं ! आम्हाला नाहीं यांची फोड झाली.

**विशाखा**:—त्याचा खुलासा हा असा आहे. सुखानें बसावे याचा अर्थ वडील माणसें जेथें वारंवार फिरत असतात त्या ठिकाणीं स्त्रियांनी बसूं नये. त्यांचें जेवण खाण आटपण्यापूर्वीं आपण जेऊं नये. व नंत[illegible] [illegible]रांचा परामर्श घेऊन मग जेवावें, असा ध्वनि सुखाने जेवावें या सातव्या नियमांतून उमटतो. आतां आठव्या नियमाचा आशय असा आहे कीं घरांतील वडीलधार माणसें निजण्यापूर्वी आपण निजूं नये. त्यांची व्यवस्था लावून मग निजावें.

**पंच**:—नववा नियम कोणता ?

**विशाखा**:—अग्नीची पूजा करावी.

**पंच**:--:—यांत कांहीं गूढार्थ दिसत नाहीं. तो अर्थ सरळच आहे.

**विशाखा**:--ब्राह्मणाला अग्नि जसा पूज्य तद्वत आम्हा स्त्रियांना पति पूज्य असा त्याचा गूढार्थ आहे. स्त्रियांना पतिसेवा ही अग्निसारखीच फलदायक आहे. ब्राह्मण जसे अग्नीची परिचर्या करतात तद्वत स्त्रीनें-पतिव्रता स्त्रीनें--आपल्या पतीची एकनिष्ठपणें सेवा शुश्रूषा करावी असा त्याचा अर्थ आहे.

**पंच**:—आतां दहावा नियम सांग म्हणजे झालें.

**विशाखा**:—गृहदेवतांची पूजा करावी.

**पंच**:--म्हणजे ?

**विशाखा**:—सासूसासरे इत्यादि घरांत जे वडीलधार असतील त्यांचीहि सेवाचाकरी करावी हा त्याचा अर्थ.

विशाखेनें दहा नियमाचें या प्रमाणें स्पष्टीकरण केल्यावर त्या पंचांनी तिची फार स्तुति केली. व ते मिगारला म्हणाले:—शेटजी ! आपण

रागाच्या भरांत या मुलीला घरांतून घालवून देण्यास तयार झाला आहा. पण आम्ही तर हिला घरची लक्ष्मीच समजतो ! ! इतकेंच नव्हे तर ती सरस्वतीहि आहे ! !

मिगार शेटजीचे डोळे आतां चांगले उघडले. त्यानें आपली चूक त्या लोकांपुढें कबूल केली व विशाखेची क्षमा मागितली.

विशाखा म्हणाली:—आपण वडीलच आहा. क्षमा मागण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु एक गोष्ट मात्र मी इथें स्वच्छ व स्पष्टच सांगते की निर्ग्रंथाचे बाबतींत आपलें व माझें मुळींच जमावयाचें व पटावयाचें नाहीं. मी भगवान बुद्धाची उपासिका आहे. आपण निर्ग्रंथाचे आहा. तेव्हां बौद्ध भिक्षु आमच्या घरीं भिक्षेस आले असतां तें आपणास खपावयाचें नाहीं. तसेंच निर्ग्रंथ आले असतां मलाहि खपावयाचें नाहीं. मी त्यांचें तोंडहि पाहणार नाहीं. मग नमस्काराची तर गोष्टच नको ! या बाबतींत तडजोड निघाल्याशिवाय माझ्या येथें राहण्यानें आपणाला किंवा मला सुख होणार नाहीं.

मिगार म्हणालाः—देवि ! तुझ्या इच्छेप्रमाणें वागण्याला माझी कोणतीच हरकत नाहीं. माझ्या घरीं अलोट धनसंपत्ति भरली आहे. बौद्ध भिक्षूंना आमंत्रण करून तूं त्यांना जेवूं घातलेंस तर त्यायोगें मी दरिद्र होईन अशांतला कांहीं प्रकार नाहीं. मी माझ्या निर्ग्रंथांना अन्नदान करीन व तूं तुझ्या बुद्धभिक्षूंना खुशाल जेवूं घाल ! त्याला माझी आडकाठी नाहीं.

पुढें लवकरच भगवान बुद्धाचा मुक्काम श्रावस्तीत जेतवनांत झाला. तेव्हां तिनें सासऱ्याची परवानगी घेऊन जेतवनांत जाऊन भगवंतास व त्यांच्या भिक्षुसंघास घरीं भोजनास येण्यास आमंत्रण दिलें. ही गोष्ट निर्ग्रंथांस समजतांच त्यांनीं तावडतोब मिगारास गांठून तो बेत रहित करण्याचा आग्रह केला.

मिगार त्यांना म्हणालाः—माझी सून आतां कांहीं लहान नाहीं. ती उच्च कुलातील सुविद्य स्त्री आहे. तिला दासीप्रमाणें वागविणें मला पसंत नाहीं. माझ्या घरी सौख्य व आनंद नांदावयाचा तर माझ्या सुनेचा—गृहलक्ष्मीचा—योग्य मान राखलाच पाहिजे ! अशा बाबतीत नसती भीड आपण घालूं नये.

**निर्ग्रंथः**—मग निदान इतकें तरी कर, कीं बुद्ध अगर त्याचे भिक्षू तुझ्या घरीं आले असतां त्यांच्या दर्शनाला तरी जाऊं नकोस. तुझ्या सुनेने आमचा अपमान केला हें विसरूं नकोस. तो गौतम मोठा मायावी आहे. तो लोकांना आपल्या मिठास वाणीनें मोह पाडून आपल्या पंथांत ओढून घेतो. म्हणून आम्ही तुला ही अगोदरच धोक्याची सूचना देऊन ठेवितों. विशाखेने कितीहि आग्रह केला तरी तूं कांहीं त्यांच्या दर्शनाला जाऊं नकोस.

मिगाराने त्याप्रमाणें वागण्याचें अभिवचन दिल्यावर निर्ग्रंथ तेथून निघून गेले.

दुसरे दिवशीं विशाखेनें जेवण्याची तयारी करून भगवान बुद्धाला व भिक्षूंना बोलावून आणून मोठ्या आदराने व भक्तीने त्यांना जेऊं घातलें. जेवण झाल्यावर बुद्ध देवाजवळ येऊन आपणाला व घरांतील मंडळींना धर्मोपदेश करण्याची तिने विनंती केली. सर्व मंडळी दिवाण-खान्यांत येऊन बसली. मिगार मात्र आला नाहीं.

विशाखेने त्याच्याजवळ जाऊन आग्रह केला. पण समोर येऊन बसण्यास त्याने स्पष्ट नकार दिला. मात्र पडद्याच्या आड बसून धर्मो-पदेश ऐकण्यास तो कबूल झाला. त्याप्रमाणे व्यवस्था करण्यांत येऊन मिगार पडद्याआड उपदेश ऐकावयास म्हणून येऊन बसला.

सर्व मंडळी आपापल्या जागीं येऊन बसल्यावर भगवंतांनी आपल्या अमृततुल्य मधुर वाणीनें तेथील श्रोतृसमाजास सर्वोत्तम उपदेश केला. दान, शील, भावना इत्यादि विषयांवर बुद्धांनी केलेला सुंदर बोध

ऐकून श्रेष्ठी फारच चकित झाला. व असा थोर सत्पुरुष आपणासमोर हजर असतां आपण त्याचें दर्शन घेण्यास तयार नसावें याचें त्याला वाईट वाटलें. अखेर त्याचें मन राहवेना. म्हणून चटकन् पडदा दूर करून धांवत येऊन त्यानें भगवंताच्या चरणावर डोकें ठेविलें.

तो म्हणालाः—भगवन् ! मी मोठा अपराधी आहे ! मला क्षमा करा ! या बाबतींत माझी सून विशाखा ही मला मातेसमान आहे ! ! ती महासती जर माझे घरीं नसती तर, भंदत ! आपले पूज्य पाद माझ्या घरीं लागले नसते. व आपली अमृत वाणी माझ्या कानावर पडून मी धन्य झालो नसतो ! ! म्हणून, गुरुदेवा ! आजपासून मी तिला माझी आईच समजत जाईन ! ! भदंत ! आजपासून मी आपला उपासक झालों आहे ! !

या दिवसापासून विशाखेला मिगारमाता असें म्हणण्याचा प्रघात पडला. श्रावस्तीमध्ये तिच्या शहाणपणाची व सद्भावाची सर्वत्र वाहवा होऊन लोकांत तिच्याविषयीं मोठा आदरभाव उत्पन्न झाला. मंगल कार्यांत व उत्सवसमारंभांत तिला प्रथम आमंत्रण पोंचविण्याचा बहुमान प्रचारांत आला. या विशाखेनें पुढे बौद्ध धर्माकरतां व भिक्षूंकरतां काय काय गोष्टी केल्या याविषयीं पुढें यथाप्रसंग सविस्तर हकीकत येणारच आहे. म्हणून येथें त्याचा निर्देश करणे नलगे.

---

## ब्राह्मणत्व हें जातीवर कां कर्मावर ?

वासेट्ठ सुत्त ( सुत्तनिपात, ३–९ )

भगवान बुद्ध देवांचा तळ एकदां इच्छानंगल उपवनांत पडला होता. तेथें शेजारीच इच्छानंगल नांवाचा गांव होता. त्या गावांत चांगले विद्वान व बहुश्रुत असे ब्राह्मण राहत असून, त्यांत वासिष्ठ व भारद्वाज हे दोन तरुण ब्राह्मण मोठे विद्वान व तल्लख पंडित होते. त्यांच्यांत

नेहमीं कोणत्या ना कोणत्या तरी विषयावर वाद जुंपून चांगली धूमश्चकी उडत असे. असाच एक वाद आतां त्यांच्यांत मोठ्या कडाक्यानें चालला होता. आणि तो लवकर मिटेल असें लक्षण दिसत नव्हतें. अर्थात् तो वाद म्हणजे मनुष्य श्रेष्ठ कशानें होतो ? म्हणजे श्रेष्ठत्व हें कुलावर कां शीलावर ?

भारद्वाजाचें म्हणणें असें होतें कीं मनुष्य हा जन्मानेंच ब्राह्मण होतो. म्हणजे ब्राह्मणत्व हें कुलावर अवलंबून आहे. ज्याच्या आईबापाच्या सात पूर्वज पिढ्या शुद्ध व निष्कलंक असतील व ज्याच्या कुलांत वर्णसंकर झालेला नसेल, तोच खरा ब्राह्मण ! तोच श्रेष्ठ पुरुष !

वासिष्ठाला ही विचारसरणी मान्य नव्हती. त्याचा रोख असा होता कीं मनुष्य हा केवळ जन्मानें कांहीं ब्राम्हण होऊं शकत नाहीं. जो सुशील व सुविद्य असेल तोच ब्राम्हण खरा. मग तो जातीनें कोणी कां असेना. त्याचा प्रश्न नाहीं. अर्थात् ब्राम्हणत्व हें जन्मावर नसून कर्मावर व शीलावर अवलंबून आहे.

हा वाद पुष्कळ दिवसपर्यंत तसाच धुमसत राहिला. पण कोणी कोणाचें समाधान करूं शकेना. 'कुलेन श्रेष्ठतां याति' हा एक पक्ष व 'वृत्तमेव तु कारणम्' हा दुसरा पक्ष. दोघांचीहि विचारसरणी युक्तिसिद्ध व ठसकेबाज होती. दोघांच्याहि म्हणण्यांत कांहीं अर्थ होता. पण दोन्ही पक्ष सर्वस्वी अनुभवसिद्ध नव्हते. अतएव या प्रश्नाचा आपापसांत लवकर वासलात लागण्याचा कांहीं रंग दिसेना.

तेव्हां वासिष्ठ म्हणाला—'भारद्वाजा ! हा वाद आमच्या आमच्यांतच सरळ मिटेल असें वाटत नाहीं. तर श्रमण गौतम येथें आला आहे. तो जवळच उपवनांत राहत आहे. तो बुद्ध आहे, पूज्य आहे, गुरुदेव आहे, असें लोक म्हणतात. तर आपण त्याजकडे जाऊन हा प्रश्न त्याच्यापुढें मांडून तो जो निर्णय देईल तो आपण मान्य करूं या. आहे तुला कबूल ?

**भारद्वाजः**—हो. आहे कबूल मला.

**वासिष्ठः**—मग चला तर. त्याच्यापुढें जाऊन आपलं म्हणणं तेथें मांडूं. व तो देईल तो निर्णय मुकाट्यानें मान्य करूं. होय ना ?

**भारद्वाजः**—हो. माझी तयारी आहे.

नंतर ते दोघे बुद्ध भगवानाजवळ आले. आणि त्यांना नमस्कार करून बाजूस बसले. भगवंतांनीं त्यांस कुशल प्रश्न विचारून तेथें येण्याचें कारण विचारलें. तेव्हां वासिष्ठ म्हणालाः—भदंत, आम्ही दोघेहि पंडित ब्राह्मण कुमार आहोंत. आमच्यांत ब्राह्मण कोण यावर वाद माजला आहे.

बुद्धः—तो काय ?

**वासिष्ठः**—हा भारद्वाज म्हणतो की मनुष्य हा जन्मानेंच ब्राम्हण होतो. म्हणजे श्रेष्ठ होतो. माझें म्हणणें असें कीं कर्मानेंच मनुष्य ब्राह्मण होतो. जन्मानें नाहीं. अर्थात् ब्राह्मणत्व हें कुलावर नसून शीलावर आहे. हा वाद आमच्या आमच्यांत मिटेना. म्हणून त्याचा निर्णय घेण्यास आपल्याकडे आलों आहोत. तर यावर भगवंताचें काय मत आहे हें आम्हास सांगून हा वाद मिटवावा अशी विनंति आहे.

बुद्धः—ठीक आहे. पण तुम्हास माझा निर्णग मान्य आहे ना ?

**वासिष्ठः**—होय, भदंत. आम्हास तो मान्य आहे.

बुद्धः—तुला, भारद्वाजा ?

**भारद्वाजः**—( मान हालवून ):—होय. मलाहि मान्य आहे.

बुद्धः—ठीक. आतां हें पहा. पशुपक्ष्यादिकांत आकारादिकांनी निरनिराळ्या जाती आढळतात. तशा मनुष्यांत नाहींत. सर्व मनुष्यें शरीरावयवादिकांनी सारखींच आहेत. त्यांच्या रूपांत फरक नाहीं. व नसतो. म्हणून त्यांच्यांत जातिभेद ठरवितां येत नाहीं. अर्थात् मनुष्यांत श्रेष्ठत्व–ब्राह्मणत्व–ठरवावयाचें झालें तर तें जातीवरून न ठरवितां कर्मावरूनच ठरविलें पाहिजे. व तसें ठरवितां येतें.

**वासिष्ठः**—म्हणजे ?

**बुद्धः**—म्हणजे असें. एखादा मनुष्य ब्राह्मण आईबापाच्या पोटीं जन्मास येऊन पुढें मोठा झाल्यावर ब्राह्मणकर्म न करतां—म्हणजे विद्याशील संपन्न न होतां—गाई पाळून गवळ्याप्रमाणें राहूं लागला व त्यावर आपला चरितार्थ चालवूं लागला तर त्यास ब्राह्मण न म्हणतां गवळी म्हणावें. ब्राम्हण म्हणूं नये व ब्राह्मणाचा मानसत्कार त्यास देऊं नये ! तो जर शिल्पकलेवर आपलें उपजीवन करूं लागेल तर त्यास कारागीर म्हणावें. ब्राह्मण म्हणूं नये ! तो व्यापार करून पोट भरूं लागेल, तर त्याला वाणी म्हणावें. ब्राह्मण म्हणूं नये ! याचप्रमाणें तो दूताचे काम करील, तर तो दूत झाला. ब्राह्मण नव्हे ! युद्धाचा पेशा घेईल तर तो योद्धा होईल. ब्राह्मण नव्हे ! जो यज्ञयागादि यजनकर्मावर निर्वाह करील तर तो याजक, ब्राह्मण नव्हें. राष्ट्रावर जगणारा तो राजा, ब्राह्मण नव्हे ! यांपैकी कोणालाहि—तो प्रत्यक्ष ब्राह्मण आईबापाच्या पोटी जन्मला असला तरी--त्यास ब्राह्मण म्हणूं नये ! व तसें म्हणतां येणार नाहीं ! !

**भारद्वाजः**—मग कशामुळें ब्राम्हण म्हणावें ?

**बुद्धः**—त्यालाच ब्राह्मण म्हणावें कीं ज्यानें सर्व संसारबंधनें छाटून टाकिलीं आहेत, जो कसल्याहि दुःखापत्तीला भीत नाहीं, ज्याची कोणत्याहि गोष्टीवर आशा व आसक्ति राहिली नाहीं, अशालाच मी ब्राह्मण म्हणतो. इतरांना नाहीं. दुसऱ्यांनी दिलेल्या शिवीगाळी, केलेला निंदापमान, वधबंध, इत्यादि जो शांतपणे सहन करतो व जो क्षमाशील आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. कमळपत्रावरील जलबिंदूप्रमाणें जो इहलोकीच्या सुखोपभोगापासून अलिप्त आहे व राहतो तोच खरा ब्राह्मण होय ! पंडित हो ! त्यालाच मी ब्राह्मण—उत्तम ब्राह्मण—म्हणतो.

**वासिष्ठ**—एकंदर याचा मथितार्थ काय ?

बुद्धः—याचा निष्कर्षार्थ असा की मनुष्य हा केवळ जन्माने ब्राह्मण होत नाहीं किंवा अब्राम्हण होत नाहीं. कर्मानेच तो ब्राह्मण होतो व कर्मानेच तो अब्राम्हण होतो. कर्मानेच शेतकरी होतो व कर्मानेच कारागीर होतो. कर्मानेच चोर होतो, कर्मानेच याजक होतो आणि कर्मानेच क्षत्रिय होतो. अर्थात् ब्राह्मणत्व हें जन्मावर म्हणजे कुलावर अवलंबून नाही, कर्मावर आहे. आंसेवर रथ जसा अवलंबून असतो तद्वत कर्मावरच ब्राह्मणत्व अवलंबून आहे.

**भारद्वाजः**—मग ब्राह्मणत्व हें जातीवर–जन्मावर–नाहीं, असाच ना भगवंताचा अभिप्राय?

बुद्धः—होय, माझें मत हें कीं ब्राह्मणत्व हें केवळ कुलावर अगर जन्मावर अवलंबून नसून, कर्मावर आहे. उत्तम ब्राम्हण काय तो हा! इतर सर्व नाम मात्र होत.

या वेळी भगवंतांनी आपला निर्णय म्हणून एक मोठी गाथा म्हणून दाखविली आहे. पण त्यांतील महत्वाचा भाग खालीलप्रमाणे आहे.

**'न जच्चा ब्राम्हणो होति न जच्चा होति अब्राह्मणो**
**कम्मना ब्राम्हणो होति कम्मना होति अब्राह्मणो ॥ ५७ ॥**
**कम्मना वत्तती लोको कम्मना वत्तती पजा ।**
**कम्मनिबन्धना सत्ता रथस्सा'णी'व यायतो ॥ ६१ ॥**
**तपेन ब्रह्मचरियेन संयमेन दमेन च ।**
**एतेन ब्राह्मणो होति एतं ब्राह्मणमुत्तमं ॥ ६२ ॥**
**तीहि विज्जाहि सम्पन्नो सन्तो खीणपुनब्भवो !**
**एवं वासेट्ठ जानाहि ब्रह्म सक्को विजानतं' ति ॥ ६६ ॥**

(सुत्तनिपात ३–९)

हा बुद्धाचा निर्णय दोघांनी मान्य केला व तेव्हांपासून ते त्याचे उपासक बनले. याच मताचा अनुवाद भगवंतानी अंम्बट्ठ सुत्तांतहि केला आहे.

---

# अनाथ सुश्रूषा

महावग्ग ८–७–१ ( विनय पिटक )

भगवान जेठवनांत असतां आनंदाला बरोबर घेऊन विहारातून सहज फिरत चालले होते. फिरतां फिरतां एक भिक्षु आपल्या शयन कुटींत स्वस्थ पडून राहिला होता, तेथें ते आले व सहज आंत डोकावून पाहतात तों आंत तो कण्हत असलेला दिसला. बिचारा अगदीं अंथरुणास खिळून राहिला होता. त्याला पाहून आंत जाऊन भगवान त्याला म्हणाले, भिक्षो, काय झालंय ? अजारी आहेस कीं काय ?

**भिक्षु**:—होय, भगवन् माझ्या पोटांत विकार झाला आहे. अमांशानें अस्वस्थ आहे मी.

**भगवान**:—शुश्रूषा करणारे तुझे कोणी आहेत कीं नाहींत ? तुझ्या-जवळ भिक्षु अगर परिचारक असे कोणी नाहींत काय ?

**भिक्षु**:—नाहींत, भदंत !

**भगवान**:—मग तुझं पथ्यपाणी कोण पाहतं ?

**भिक्षु**:—कोणी नाहीं.

**भगवान**:—आं ! कोणी नाहीं ? मग हे भिक्षु काय करतात ? ते तुझ्याकडं पाहात नाहींत काय ? तुझा परामर्श घेत नाहींत ?

**भिक्षु**:—नाहीं, भदंत !

**भगवान**:—कां ?

**भिक्षु**:—माझा त्यांना कांहीं उपयोग नाहीं म्हणून.

**भगवान**:—म्हणजे ?

**भिक्षु**:—माझ्याविषयीं त्यांना कांहीं वाटत नाहीं.

**भगवान**:—असं काय ? बरं.

असें म्हणून भगवंतांनी आनंदास पाणी आणावयास सांगितलें. त्याप्रमाणें आनंद जाऊन पाणी घेऊन आला. नंतर गुरुदेवांनी स्वतः

ध्याय असला तर त्यानें तो बरा होईतो पर्यंत त्याचें पथ्यपाणी पाहिलें पाहिजे. आणि त्याचा जर कोणी गुरु असला तर त्याच्या दुसऱ्या शिष्यानें तें करावें. तोही नसेल तर संघानें तें काम अवश्य करावें. यांत हयगय उपयोगाची नाहीं. आणि जो कोणी हे नियम मोडील तो गुन्हेगार म्हणून समजला जावा !! हें सर्वांनी नीट लक्षांत ठेऊन त्याप्रमाणें वागावें.

'ठीक आहे, भदंत' असें भिक्षूंनी म्हटल्यावर सभा बरखास्त करण्यांत आली.

---

## पाण्यासाठीं प्राणावर

धम्मपद. अट्ठकथा १५–१

शाक्य व कोळी हीं दोन राष्ट्रें एकमेकांच्या शेजारी असून त्या दोहोंमध्यें रोहिणी नदी वाहत होती. या नदीच्या दोन्ही कांठावर दोघांची शेती पसरली होती. एका तीरावर शाक्यांची व दुसऱ्या तीरावर कोळ्यांची असा तो प्रकार होता. एका वर्षी असें झालें कीं पाऊस पडावा तसा पडला नाहीं. योग्य वेळीं पाऊस न पडल्यामुळें पिकें सुकावयास लागलीं. रोहिणी नदींतील पाणी अटत चाललें. तेव्हां तिला बांध घालून तें पाणी पिकास द्यावें असा निश्चय करून दोन्ही तीरावरचे शेतकरी त्या उद्योगास लागले. पण प्रश्न असा होता कीं बांध घालून पाणी अडविलें तरी तें पाणी दोन्ही तीरावरील शेतींना पुरण्याइतकें नव्हतें; प्रसंग मोठा कठीण आला. तें पाणी कोणी घ्यावें हा प्रश्न उभा राहिला. दोघांनी पाणी घेतलें तर दोघांनाहि त्या पाण्यावर पिकें येण्याची आशा नसल्यामुळें व पाणी तर पिकाला जरूर असल्यामुळें दिवसेदिवस तो प्रश्न बिकट होत चालला. कोळी म्हणूं लागले कीं 'आम्हास पाणी घेवूं द्या. म्हणजे आमचीं पिकें येतील.

मग तुम्ही ध्या.' शाक्य म्हणू लागले कीं ' छान छान ! तुम्ही कोठारें भरभरून पीक ध्या आणि आम्हीं आमच्या घरातील दागदागिनें व सोनेरुपें विकून तुमच्या दारीं धान्य खरेदीस येतो ! ! चांगली युक्ति सांगता आम्हांना ! आम्हालाहि पाणी हवें आहे. आम्ही अगोदर घेतो व नंतर तुम्ही ध्या ! '

असा कांही दिवस वाद चालून अखेर कोळी शाक्यांस म्हणाले की 'आम्हीं तुम्हास पाणी घेऊं देणार नाहीं !' शाक्यांनीहि उलट तीच भाषा वापरली. याप्रमाणें तोंडाशी तोंड लागून अखेर त्याचा परिणाम मारामारींत झाला.

शेवटी हें प्रकरण इतकें चिघळलें व भडकलें कीं त्याला राष्ट्रीय स्वरूप येऊन दोनहि देशाचे राजे लढाईस सिद्ध झाले ! दोन्ही सैन्यें अमोरासमोर येऊन एकमेकांचे प्राण घेण्यास तयार झालीं. रणवाद्यें गर्जू लागलीं. वीरांच्या गर्जना निनादूं लागल्या. तलवारी म्यानेतून बाहेर पडून हवेंत चमकूं लागल्या ! सेनापतीचा हुकूम सुटायचा अवकाश कीं झाली कापाकापीस सुरवात ! शाक्य सेनापतीनें शिंग फुंकण्यास खूण केली आणि शिंग गर्जूं लागलें, तो इतक्यांत भगवंताची स्वारी अकस्मात तेथें येऊन दाखल झाली. बुद्धाला पाहतांच सर्व शाक्य वीरांनी शस्त्रें खालीं ठेवून त्यांस नमस्कार केला.

बुद्ध त्यांना म्हणाले—कशासाठीं भांडत आहा, महाराज ?

शाक्य वीरांनी उत्तर दिलें—तें आम्हास माहीत नाहीं, भदंत !

**बुद्धः**—मग कोणाला माहीत आहे ?

**वीरः**—तें सेनापति महाराज जाणतात.

**बुद्धः**—सेनापतीला बोलावून म्हणाले :—सेनापतिमहाराज ! ही लढाई कशासाठीं आहे ?

**सेनापतिः**—तें मला माहित नाहीं, भदंत. राजाला तें माहीत आहे. त्यांनी आम्हास आज्ञा दिली व आम्ही लढाईस सिद्ध झालों इतकेंच.

याप्रमाणें विचारपूस करतां करतां शेवटी ती गोष्ट शेतकऱ्यांवर येऊन ठेपली. तेव्हां भगवंतानी त्यांस प्रश्न केला असतां ते म्हणाले–भदंत, हा पाण्याचा झगडा आहे.

बुद्धः—पाण्याचा झगडा ! बरें, त्या पाण्याची किम्मत काय ?

**वीरः**—पाण्याला कसली किंमत, त्याला किंमतच नाहीं !

बुद्धः—क्षत्रियाची किम्मत काय ?

**वीरः**—तो बिनमोल आहे ! भदंत.

बुद्धः—मग, महाराज ! फुकट मिळणाऱ्या पाण्यासाठीं बिनमोल क्षत्रियांचा प्राण घेण्यास तुम्ही उद्युक्त झालां आहां नव्हे काय ? क्षत्रियाचा प्राण म्हणजे पाण्याइतका क्षुल्लक व सवंग झाला काय ? ही चुरस–महाराज–ही चुरस तुम्हा दोघांच्या दुःखास व नाशास कारण होईल.

तुम्ही दोघेहि लढाईंत भांडून मरून जाल आणि पाणी तसेंच वाहून जाईल. याचा परिणाम असा होईल कीं दोन्ही देशांत दुष्काळ पडून तुमचीं बायका मुलें अन्नान्न करीत प्राण सोडतील ! हें तुम्हांस परवडतें काय ? तसें असेल तर लढा.

हें भाषण ऐकून ते हिरमुसले झाले व त्यांच्या प्रश्नाला उत्तर न देतां स्तब्ध उभे राहिले.

नंतर बुद्ध म्हणाले:—महाराज मी सांगेन तसें तुम्ही ऐकावयास तयार आहां काय ?

सर्व शाक्य सेना–हो भदंत. तुम्ही सांगाल तसें ऐकण्यास आम्ही तयार आहो.

नंतर कोळ्यांना उद्देशून भगवंतांनी तोच प्रश्न केला व कोळ्यांनीहि वरीलप्रमाणेंच उत्तर दिलें.

नंतर भगवंतांनी दोघांना जवळ घेवून दोघांचेंहि म्हणणें ऐकून घेऊन दोघांनाहि पटेल अशी तडजोड काढली व ती दोघांनीहि आनंदानें

मान्य केली. अशा रीतीनें त्या युयुत्सु लोकांची समजूत घालून घातुक लढाईचा अनिष्ट प्रसंग–पाण्यासाठी प्राणांवर बेतलेला प्रसंग–मोठ्या खुबीने टाळला व अखेर तेथून जातांना ही पुढील गाथा त्यांना म्हणून दाखविली.

**'सुसुखं वत जीवाम वेरिनेसु अवेरिनो ।**
**वेरिनेसु मनुस्सेसु विहराम अवेरिनो'** ॥ १ ॥

( धम्मपद १५–१ )
( कुनल जातक ५३६ )

भावार्थः—जे आपणाशी द्वेष करतात त्यांच्याशी द्वेष टाकून देऊन आपण आनंदाने राहूं. तसेंच आमचे जे वैरी आहेत त्यांच्याशी वैर न करतां आम्हीं त्यांच्यामध्यें सुखाने नांदू.

याप्रमाणें दोघांचा समेट करून तेथून त्यांनी पाय काढला.

---

# भयंकर आरोप

( उदान ४–८ )

श्रावस्तीमध्यें भगवान बुद्धाचा आतां चांगला जम बसला होता. तेथें त्यांचा उपासकवर्ग बराच वाढल्यामुळें भिक्षुसंघाची योग्य बरदास्त राखिली जावून अन्नवस्त्राची खूपच रेलचेल उडाली होती. जिकडे तिकडे त्यांचा बोल–बाला होऊन लोकांत प्रतिष्ठा चांगली वाढीस लागली होती. राजा प्रसेनजित्‌ची तर भगवंतावर आतोनात श्रद्धा व भक्ति जडून तो त्यांचा जवळ जवळ उत्तम उपासकच बनला होता म्हटलें तरी चालेल. आणि म्हणून तेथें भिक्षुसंघाची भरभराट होऊन जो तो त्याच्या नादीं लागत सुटला !

अर्थात् ही गोष्ट तेथील परिव्राजकांस रुचली व मानवली नाहीं. त्यांचें तेज भिक्षुसंघापुढें फिक्कें पडत चाललें. आणि शब्दला मान उरला

नाहीं. याचा परिणाम असा झाला कीं त्यांच्या पोटापाण्यावर पाय पडूं लागला व मानपानावर गदा आली. आपल्या प्रतिपक्ष्याची चंगळ व भरभराट व आपली दैनंदिन उपासमार व अवनति पाहून त्यांच्या पोटांत दुखूं व खुपूं लागलें आणि लागावें हें स्वभाविकच आहे. तेव्हां त्यांनी बुद्धाची येनकेन प्रकारेण बदनामी व नालस्ती करण्याचा घाट घातला तर त्यांत आश्चर्य तें काय ?

आतां त्यांनीं एक गुप्त कट उभारला. त्यांच्या पंथांत सुंदरी नांवाची एक सुंदर व तरुण परिव्राजिका होती. यांत तिला सामील करून घेऊन बुद्धावर खोटा आरोप लादून त्यांची बदनामी करण्याच्या कामीं तिची योजना केली. सुंदरीनें तें काम मोठ्या अनंदानें पत्करिलें. तिनें फक्त इतकेंच करावयाचें कीं रोज रात्रीं जेतवनाकडे जाऊन तेथें ती रात्र तेथेंच शेजारच्या परिव्राजकाच्या आश्रमांत काढून पहाटेस तेथून निघून परत गावांत यावयाचें. रस्त्यांत कोणी भेटून कांहीं विचारल्यास 'बुद्धाजवळ रात्रीं राहावयास जाते व पहाटेस परत निघते,' असा जबाब द्यावयाचा.

याप्रमाणें कांहीं दिवस गेले व लोकांत हळूंच कुजबुज सुरू झाली, कीं भगवान बुद्धाचें व परिव्राजिका सुंदरीचें आंतून कसलें तरी नाजूक सूत जुळलें असून ती तरुण परिव्राजिका रोज रात्रीं त्यांच्याजवळ निजावयास जाते व सबंध रात्र तेथें काढून पहाटेस पुन: परत गांवांत येते. त्या वेळीं भगवंतांच्या वयांत चांगला उतार पडला होता. म्हणजे ते जवळ जवळ साठीच्या घरीं आले होते. तरी लोकांना काय ? असल्या कुटाळक्याची भारी हौस. खरें असो व खोटें असो, असल्या नाजूक गोष्टीवर त्यांचा फार लवकर विश्वास बसतो. आणि चांगल्या माणसा-विषयीं तर अगदीं हटकून ! येथेंहि असाच प्रकार झाला. तिखट मीठ लावून रोज खमंग बाजारगप्पांचा सुळसुळाट सुरू झाला. यांत परिव्राजकांचेंच मुख्य अंग होतें, हें निराळें सांगावयास नकोच.

पुढें कांहीं दिवसांनीं सुंदरी परिव्राजिका एकदम नाहींशी झाली ! तिचा कोठें पत्ता लागेना. गावांत बातमी उठली कीं तिचा खून झाला असावा ! तशांत कांहीं परिव्राजकांनी प्रसेनजित् राजाकडे अर्ज केला कीं अलीकडे बुद्धाच्या विहारांत सुंदरी ही रात्रीं निजावयास जात असे. ही गोष्ट आम्हांस पक्की ठाऊक आहे. तिचें व त्याचें आंतून नाजूक सूत जुळलें असल्याची लोकांत दाट वदंता आहे. कित्येकांनी ही गोष्ट खुद्द तिच्या तोंडूनच ऐकिली असून कांहींना त्याची खात्री पटली आहे. या खुनाच्या बाबतींत भगवंताचें आंतून अंग असावें अशी आम्हास बळकट शंका वाटत असून महाराजांनी याचा शोध लावावा. जेतवनांत कसून शोध केल्यास पत्ता लागण्याचा बराच संभव आहे. तर या कामी महाराजांनीं योग्य तो उपाय योजून या प्रकरणाची चौकशी करावी अशी आमची नम्र सूचना आहे.

राजानें हा अर्ज वाचून पाहिल्यावर त्याची योग्य वासलात लावण्यासाठीं तो अर्ज योग्य अधिकाऱ्याकडे पाठवून दिला. तो अर्ज घेऊन तो अधिकारी सही केलेल्या परिव्राजिकांकडे आला. त्यांनीं त्यास सर्व हकीकत सांगून जेतवन शोधून पाहण्याचा सल्ला दिला व त्या कामीं आपण शक्य ती मदत करूं असें अभिवचन दिलें.

दुसरे दिवशीं सकाळीं राजदूत व कांहीं परिव्राजक हे जेतवनांत अचानक शिरून तेथें त्यांनी या प्रकरणाची चौकशी चालविली. पण तेथील भिक्षूंना याचा कांहींच उमज न पडल्यामुळें राजदूतांना कांहींच फायदा झाला नाहीं. ही काय भानगड आहे याचा त्या भिक्षूंना कांहींच उमज पडेना. सर्व आश्चर्य चकित होऊन मुखस्तंभ झाले.

शेवटी भिक्षूंचा नाद सोडून स्वतंत्र रीतीनें चौकशी व तपास करण्याचें ठरवून राजदूतांनीं त्याप्रमाणें जेतवनभर फिरून सर्वत्र बारीक शोध चालविला. कानाकोपरा देखील जाऊन तपास केला. अखेर जेतवना शेजारील एका कोपऱ्यातील केराच्या खड्यांत तपास

करतां अकस्मात तेथें सुंदरीचें प्रेत लागलें ! ! कोणी तरी ठार मारून तिला तेथें पुरली होती ! ! पण ते दुष्ट कोण हें मात्र गुलदस्तांत !!!

आतां परिव्राजकांचा आनंद काय सांगावा ? ही बातमी वणव्या-प्रमाणें गावांत हां हां म्हणतां सर्वत्र पसरली. लोक तो देखावा पाहाव-यास धांवत सुटले. जेतवनाकडे लोकांची मुंग्याप्रमाणें एकच रीघ लागली. परिव्राजक वाटेंत भेटतील त्यांना 'पाहा हो, श्रमण गौतमाचें सत्कृत्य पाहा. तिला बिघडविली, ती बिघडविली. आणखी वर आपलें पातक झांकण्यासाठीं म्हणून बिचारीला मारूनहि टाकलें. आहे कीं नाहीं या सोद्याश्रमण महाशयाच्या सालसपणाची कमाल ! बुद्ध म्हण-वितो, पण पक्का भोंदू खरा !! अशांनाच लोक भाळतात नि भुलतात !! आमच्यासारख्या सत्पुरुषांना कोण विचारतो ? भोंदूची दुनिया खरी, साधूची नव्हे !!' असें म्हणून बुद्धाची व त्याच्या संघाची बदनामी करीत सुटले.

प्रसेनजितला ही बातमी लागली तेव्हां त्याला मोठा अचंबा वाटला. व त्यानें तें प्रेत गांवभर फिरवून लोकांना ती गोष्ट जाहीर करण्याची दूतांना आज्ञा दिली. झालें, गांवभर जिकडे तिकडे हाच एक विषय होऊन बसला. लोकांचें तोंड धरून पुरवणार तरी कोण ? आणि पुरवणार तरी किती ? त्याला ताळ ना मेळ आणि धड ना बूड ! ! उठावें त्यानें जीभ सैल सोडावी व बुद्धाला व संघाला लाखोली वाहवी. परिव्राजकांच्या जिभांना तर हाडच राहिलें नव्हतें ! त्यांची टकळी सारखी चालूच होती ! त्यांचें आतां चांगलेंच फावलें. भगवंतावर व भिक्षुसंघावर नानातऱ्हेचे दुष्ट व घाणेरडे आरोप लादून आपल्या मनाची हौस त्यांनीं यथेच्छ पुरवून घेतली, हें आतां निराळें सांगाव-यास नकोच.

पुढें जातां जातां ही गोष्ट भगवंताच्या कानावर गेली तेव्हां ते इतकेंच म्हणाले कीं, खोटे आरोप करणाऱ्याचें तोंड धरून पुरवणार तरी

कोण ? त्यांची मी मुळींच किंमत समजत नाहीं. जो खोटें बोलतो व आपण केलेलें पापकृत्य दुसऱ्याच्या माथीं मारूं पाहतो त्याला नरकावाचून अन्य गति नाहीं. त्यांनी त्या सुंदरीला व परिव्राजकांना उद्देशून अखेर ही गाथा म्हटली.—

**'अभूतवादी निरयं उपेति । यो वापि कत्वा'न करोमि' चाह ॥**
**उभो पि ते पेच्च समा भवन्ति । निहीनकम्मा मनुजा परत्थ ॥**

उदान, ४–८

अर्थ :—जो खोटी बातमी उठवितो तो नरकास जातो. तसेंच, जो आपण स्वतः करून तें केलें नाहीं म्हणतो तोही नरकास जातो. हे दोघेहि मेल्यावर परलोकी एकाच दुर्गतीप्रत प्राप्त होतात. कारण हे लोक हीनकर्मे होत.

---

## शूद्र कोण ?

( सुत्तनिपात ७–२७ )

हा अनिष्ट प्रकार घडल्यावर पुढें एके दिवशीं भगवान गावांत भिक्षाटणास निघाले असतां येतां येतां ते एका ब्राह्मणाच्या घरीं आले. त्या वेळी तो ब्राह्मण अग्नीच्या उपासनेंत मग्न असून वेदीमध्यें अग्निनारायण चांगला प्रज्वलित झाला होता. अशा वेळीं भगवान बुद्ध समोर आलेले पाहून ब्राह्मणाचें मस्तक एकदम भडकलें आणि आंबट तोंड करून तो त्यांना ओरडून म्हणाला 'हे मुंडक्या ! तेथेंच बाहेर उभा रहा ! आंत येऊं नकोस ! हे हलक्या श्रमणा ! तूं शूद्र आहेस ! तेथेंच बाहेर उभा रहा ! !

**भगवान** शांतपणे उत्तरले:—शूद्र कोण ?

**ब्राह्मण** :—कोण म्हणजे ? तूं ! तूं ! तूं श्रमण गोतम ! ! आणखी कोण ?

**भगवान** :—मी नव्हे ! ब्राह्मणा ! मी नव्हे शूद्र ! शूद्र तोच कीं जो रागावतो ! जो द्वेष करतो ! जो दुष्ट व दांभिक आहे ! जो तिरसट व चढेल आहे ! ब्राह्मणा ! तोच बरें शूद्र ! ! मी नव्हे.

**ब्राह्मण** :—( रागारागानें ) कोण ? कोण शूद्र ? मुंडक्या ! पुनः सांग पाहूं.

**भगवान** :—जो दुसऱ्यास उद्वेगकर भाषण बोलतो तो ! ब्राह्मणा ! तोच शूद्र ! ! जो दुसऱ्याचा हेवादावा करतो तो ! तोच शूद्र कीं ज्याचे विचार दुष्ट आहेत व ज्याची वाणी भ्रष्ट आहे ! जो निर्लज्ज व नीतिभ्रष्ट आहे ! जो पापी व चांडाळ आहे ! अशालाच ब्राह्मणा ! मी शूद्र समजतों ! ! ध्यानांत ठेव कीं मनुष्य हा जन्मानें शूद्र होत नाहीं. किंवा जन्मानें ब्राह्मण होत नाहीं. तर कर्मानेंच तो ब्राह्मण होतो व कर्मानेंच शूद्र होतो. जन्मानें, कुळानें, अगर जटाभारानें ब्राह्मण होत नसून सत्कर्मानें मनुष्य ब्राह्मण होतो. असें म्हणून त्यांनीं त्याला ही पुढील गाथा म्हणून दाखविली.

**'न जच्चा वसलो होति न जच्चा होति ब्राह्मणो ।**
**कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो ॥**

सुत्तनिपात ७–२७

असें म्हणून भगवान तेथें क्षणभरहि न थांबतां चटकन् पुढें पाऊल टाकते झाले.

वरील सुंदरीच्या खुनाच्या अफव्यामुळें श्रावस्तींत भगवान बुद्ध व त्यांचा संघ यांच्याविषयीं सामान्य उपासकांत व इतर सामान्य जन-समाजांत गैरसमज वाढून पराकाष्ठेचा अनादर व तिटकारा पसरून राहिला होता. पुढें पुढें तर भिक्षूंना गांवांत सरळ भिक्षाहि मिळेनाशी झाली. गावांत जिकडे तिकडे बुद्धाची व भिक्षूंची निंदा व नालस्ती, चेष्टा व थट्टा, अपमान व उपहास बेसुमार वाढून त्यांना गावांत धड

हिंडणें फिरणें देखील धोक्याचें होऊन बसले. जो तो त्यांच्या तोंडा-समोर त्यांची नालस्ती व पाणउतारा करूं लागला. अशा स्थितीत भिक्षा मागत फिरणें म्हणजे एक मोठें दिव्य होऊन बसलें. हें सर्व पाहून एक दिवस आनंद बुद्धास म्हणाला—भदंत ! लोक आपणाला व भिक्षूंना शिवीगाळी करून आमचा अपमान करतात. तर इथें राहणें हें आतां आपणास हितकर व श्रेयस्कर नाहीं. दुसरीकडे कोठें तरी जावें हें चांगलें. त्याला भगवान उत्तरले 'आनंदा ! युद्धांत हत्ती जसा शत्रूचे बाण अगांत रुतलेले सहन करतो त्याप्रमाणें मीहि दुष्ट लोकांची दुर्वचनें सहिष्णुतेनें स्वीकार करीन. कारण जगांत दुष्ट लोकांचा भरणाच अधिक असतो. असें म्हणून त्यांनी पुढील गाथा म्हटली.

**'अहं नागो'व संगामे चापतो पतितं शरम् ।**
**अति वाक्यं तितिक्खिस्सं दुस्सीलो हि बहुज्जनो ॥'**

धम्मपद, २३–१

भावार्थ: —ज्याप्रमाणें लढाईत हत्ती हा धनुष्यापासून निघून अंगांत रुतलेला बाण सहन करतो तद्वत मी झालो तरी शांतपणें लोक-निंदा सहन करतो. कारण जग हें दुष्ट आहे.

---

## स्त्री म्हणजे धर्मक्षेत्रांतील कीड !

चुल्लवग्ग ( विनयपिटिका १०–१–३ )

यानंतर पुढें कांहीं दिवसांनीं भगवान श्रावस्तीहून निघून राजगृहा-कडे आले. तेथें आल्यावर रस्त्यावरून चालले असतां बाजूला कांहीं नर्तकी स्त्रियांचा नाच चालला होता आणि त्यांच्या सभोंवती प्रेक्षकगणांचा जंगी गराडा पडला होता.

ती काय गम्मत आहे हें थोडेसें पहावें म्हणून ते तेथें कांहीं वेळ उभे राहिले. अर्थात् तेथें नाचणाऱ्या स्त्रिया फार सुंदर असून मोठ्या

कलावंत होत्या. त्यांतल्या त्यांत कुवलया नांवाची जी नर्तकी होती ती तर अत्यंत सुंदर असून मोठी नखरेबाज होती. तिनें उंची उंची अशीं अनेक सुंदर रेशमी वस्त्रें परिधान केलेलीं असून सर्वांग विविध अलंकारांनी मढवून काढिलें होतें. तिचाच नाच चालला होता आतां.

ही कुवलया नाचण्यांत मोठी निष्णात असल्यामुळें लोकांचें लक्ष सगळें तिच्यकडेच लागलें होतें. नाचतांना मधूनमधून ती गिरक्या घेई तेव्हां तिचीं वस्त्रें मोराच्या पिसाऱ्याप्रमाणें वर्तुलाकार पसरून मोठी गम्मत दिसे. तिचें देहसौंदर्य व नर्तनकौशल्य पाहून सगळा प्रेक्षकवर्ग अगदीं चित्रासारखा मंत्रमुग्ध होऊन तटस्थ उभा होता ! नाच अगदीं रंगांत आला होता. पुढें होतां होतां ती इतक्या जोरानें व कौशल्यानें नाचूं लागली कीं त्या भरांत तिचें एक एक वस्त्र हळुंहळूं सुटून खाली पडूं लागलें ! आणि शेवटीं त्या नाचण्याच्या ऐन भरांत व ढवींत अखेरचें होतें तेंहि सळकन् सुटून खळकन् खाली गळून पडले ! झालें ! शुभ्र पुतळ्याप्रमाणें ती नग्न होऊन स्तब्ध उभी राहिली ! ! तें पाहून प्रेक्षकांचा खदकन् एकच हंशा पिकला ! आणि सर्वत्र टाळ्यांचा कडकडाट उसळून राहिला ! !

भगवान तो प्रकार पाहून तेथून पुढें चालते झाले. मध्यें वाटेत चालत असतांना शेजारी भरद्वाज भिक्षु होता त्याला म्हणाले 'शीलहीन स्त्रीचें सौंदर्य म्हणजे ती एक मोहक आपत्तिच होय !'

या वेळीं स्त्रीसंघांत बरीच भर पडली होती. सुंदर व तरुण स्त्रिया भिक्षुणी होऊन संघात दाखल झाल्या होत्या. त्याचप्रमाणें भिक्षुसंघातहि तरुण व तेजस्वी भिक्षूंचा भरणा दिने दिने वाढत चालला होता. अर्थात् वेळोवेळीं हे तरुण भिक्षू व भिक्षुणी एकत्र जमण्याचा व राहण्याचा प्रसंग येई. त्या वेळीं त्यांच्या मनांत मानवस्वभावाला अनुसरून चल-बिचल व गोंधळ उडत असल्यास त्यांत आश्चर्य मानण्यासरखें कांहीं अस्वाभाविक नाहीं.

वरील नर्तकी स्त्रियांचा नाच पाहून कांहीं दिवस लोटल्यावर भगवान भिक्षूंना उपदेश करीत असतां आनंद शेवटी त्यांस म्हणाला:- भदंत, माझ्या मनांत कांहीं विचारावेसें आलें आहे. विचारूं का ?

**भगवान** :—खुशाल विचार, आनंदा ! मी असे तोपर्यंत तुम्हांला काय विचारावेसें वाटतें तें खुशाल विचारा. मनांत शंका कुढत ठेऊं नका. आलेली शंका निवळून घेणें यांतच तुमचें हित आहे. म्हणून म्हणतो की काय संशय आला असेल तो तुम्ही सर्वांनीं बिनधोक विचारून घ्यावा.

**आनंद** :—आम्ही स्त्रियांशी कसें वागावें याविषयीं भगवंतांनी आतांपर्यंत कांहीं सांगितलेलें नाहीं. तेव्हां याविषयीं आम्हास स्पष्ट आदेश द्यावा.

**भगवान** :—आनंदा ! यांत काय मोठेसें ? अरे, भिक्षूनें स्त्रीकडे पहावयाचेंच नाहीं.

**आनंद** :—पण ती होऊनच पुढें येऊन उभी राहिली तर ?

**भगवान** :—तर तिच्याशी बोलूं नये. अगदी मौन असावें.

**आनंद** :—तीच बोलण्यास सुरवात करील तर ?

**भगवान** :—तसा प्रसंगच आला तर मनांत कसलाहि कुविचार न आणतां जरूरीपुरतेंच तिच्याशी बोलावें. कमळ-पत्रावरील जलबिंदू-प्रमाणें, भिक्षूहो, तुम्ही स्त्रियांच्या बाबतीत अगदी निर्लेप व निर्मळ असावें. नाहीं तर मोठी आपत्ति ओढवेल.

**भिक्षु** :—म्हणजे ?

**भगवान** :—म्हणजे असें. स्त्रियांशी केलेल्या भाषणापासून प्रेमांकुर उत्पन्न होतो आणि पुढें तोच बंधनास कारण होतो !

**आनंद** :—हा मोठा पेंचप्रसंग आला कीं ! सर्व स्त्रियांशी सारखीच भावना ठेवावयाची का ?

**भगवान** :—त्यांतहि पर्याय आहे. जी स्त्री तुमच्यापेक्षां वडील असेल तिला आईप्रमाणें माना. तुमच्या बरोबरीची अथवा थोडी लहान असेल तिला बहीण समजा. आणि अगदींच लहान असेल तर मुलीप्रमाणें समजा ! याहून इतर दृष्टि क्षेमकर नाहीं. मनुष्यांत विषयेच्छा मोठी प्रबळ असते. म्हणून भिक्षूने या बाबतींत मोठ्या संयमाने व सावधगिरीने वागलें पाहिजे. भिक्षूहो, कुमारीकडे कामुक दृष्टीने पाहण्यापेक्षां डोळे तापलेल्या सळईने फोडून काढलेले बरे !! स्त्रियांशी वागतांना फार मोठी सावधगिरी बाळगिली पाहिजे. मनाचा फार मोठा संयम केला पाहिजे.

**भिक्षु** :—कां बरें ?

**भगवान** :—त्यांचें सौंदर्य फार मोहक व मादक असतें ! पुरुषांना मोह पाडून त्यांना आपल्या सौंदर्यपाशांत खेंचण्याची त्यांची कला व मोहिनी मोठी अजब असते ! ! त्यांचें सुमधुर हास्य नि प्रेमकटाक्ष पाहून मोठमोठे योगी व पराक्रमी वीरहि प्रेममूढ व मोहमुग्ध होऊन त्यांच्या सौंदर्यपाशांत अडकून लटपटूं लागतात ! तशांत तरुण महिलेचें मधुर हास्य तर खरोखर दुर्दमनीयच होय ! ! मनुष्य एखादे वेळेस घोर व दाट अरण्यांतून सुरक्षित पार होऊन येईल. पण सुहास्य रमणींच्या विलासोत्सुख कोमल हस्तपाशांतून तो कधीहि निसटणार नाहीं; म्हणून सांगतो, भिक्षू हो ! तुम्ही स्त्रियांशी वागतांना फार सावधगिरी ठेवा ! व तसेंच मोठ्या संयमानें वागा ! नाहीं तर तुमचें शील भ्रष्ट होऊन अखेर अध:पात होईल ! ! समजलें काय सांगितलें तें ?

'होय भदंत' असें म्हणून त्या सर्व भिक्षूंनी आपापली मान हलविली व ते तेथून उठून आपापल्या स्थानीं गेले.

सर्व भिक्षू तेथून निघून गेल्यावर भगवानाच्या मनांत नवीन प्रकाश पडून नवीन विचार तरंगू लागले. आपण स्त्रियांना भिक्षुणी होण्याची संधि व परवानगी दिली ती धर्मस्थिरतेच्या दृष्टीनें चांगली झाली नाहीं

असा विचार त्यांच्या मनांत चमकून गेला. आणि यामुळें त्यांचें मन जरा अस्थिर नि अस्वस्थ झालें. नंतर थोड्या वेळानें आनंदास हाक मारून तो आल्यावर ते त्याला म्हणाले:—'आनंदा ! एक गोष्ट सांगावी म्हणतो तुला'

**आनंद** :—ती काय, भदंत ?

**भगवान** :—स्त्रियांना संघांत येऊन राहण्यास परवानगी दिली, हें आतां होऊन गेलें. पण मला वाटतें तें मी चांगलें केलें नाहीं.

**आनंद** :—कां, भदंत ?

**भगवान** :—त्यांना घर सोडून भिक्षुणी होऊन संघांत येऊन राहण्यास परवानगी दिली नसती तर बरें झालें असतें, असें आतां मला वाटूं लागलें आहे आनंदा ! हा माझा धर्म शुद्ध राहून फार दिवस टिकला असता. निदान हजार वर्षें तरी टिकला असता.

**आनंद** :—मग आतां काय झालें तसें न व्हायला ?

**भगवान** :—तो धर्म आतां तसा टिकेल कीं नाहीं याची मला शंका वाटते. फार तर तो आतां पांचशें वर्षें टिकेल ! पुष्कळ बायका व थोडे पुरुष असलेल्या घरांत चोर व दरोडेखोर शिरून जसें तें लुटून फस्त करतात तद्वत स्त्रियांना घर सोडून भिक्षेवर निर्वाह करून राहण्यास परवानगी दिल्यानें माझ्या धर्माचेंहि होणार आहे !

**आनंद** :—म्हणजे ?

**भगवान** :—म्हणजे आतां माझा धर्म फार दिवस टिकणार नाहीं. भाताच्या शेताला किंवा उसाच्या मळयाला कीड लागली तर तें पीक फार दिवस टिकून राहत नाहीं. त्याचा लवकरच नाश होतो. तशीच गोष्ट माझ्या धर्माची सुद्धां होणार ! धर्मक्षेत्रांत स्त्री म्हणजे कीड होय !! आनंदा ! ती कीड आहे !! ( चुल्लवग्ग )

---

## ग्रहण सुटलें !

उदान ४–८

संध्याकाळची वेळ होती ती. श्रावस्ती येथील दारूच्या गुत्त्यांत कांहीं लोक मिळून सुरापान करीत बसले होते. त्यांतच कांहीं दारूबाजांचा तांडा एका बाजूला बसून कोणत्या तरी गोष्टीवर चर्चा करीत होता. चर्चा कसली म्हणा, चांगलें भांडणच होतें तें. अखेर भांडतां भांडतां, बोलाबोली वाढतां वाढतां प्रकरण हातघाईवर जाण्याचा रंग दिसला. म्हणून तेथें शेजारी बसलेला एक मनुष्य त्यांच्या जवळ जाऊन तें काय प्रकरण आहे याची चौकशी करूं लागला. अर्थात् पैशाबद्दल भांडण होतें तें.

त्या लोकांनी त्याला विशेष दाद दिली नाहीं. पण तें भांडण मात्र त्यांच्या त्यांच्यांत अगदी निकरावरच जात चाललें. त्या भरांत त्यांतला एकजण म्हणाला :—मलाच त्या पैशांतला मोठा हिस्सा मिळाला पाहिजे. कारण सुंदरीला मारणारा मी ! तेव्हां मलाच अधिक हिस्सा मिळाला पाहिजे.

त्याला दुसरा उठून मोठ्या आवेशांत म्हणाला:—बस्स करा राव, मी जर तिचा गळा दाबला नसतां तर तिनें आरडा ओरड करून, आमचें कृत्य केव्हांच उघडकीस आणलें असतें. तेव्हां माझा वाटांच मोठा असला पाहिजे.

तिसरा म्हणाला :—तें सर्व खरें. पण परिव्राजकांशी संधान बांधून सौदा ठरवून पैसे मिळवून दिले ते मी ! माझ्यामुळें तुम्हास हे पैसे मिळाले. तेव्हां मला त्यांत अधिक हिस्सा मिळाला पाहिजे.

त्या मारेकऱ्यांचें हें भाषण राजाच्या त्या गुप्त हेरानें ऐकलें व लागलीच नगर-रक्षकांच्या मदतीनें त्यांना पकडून राजसभेंत नेलें. तेथें त्यांना दटावून विचारतां त्या लोकांनी इत्थंभूत हकीकत सांगून, आपला गुन्हा कबूल केला.

याप्रमाणें बुद्धावर आळ घालण्यासाठी त्यांच्या गुप्त शत्रूंनी—म्हणजे परिव्राजकांनी— उभारलेला कट याप्रमाणे उघडकीस आला, व भगवंतांच्या कीर्तिचंद्रास लागलेलें ग्रहण सुटलें !

ही वार्ता पुढें जगभर पसरली व जो तो ती ऐकून परिव्राजकांची निंदा व निर्भर्त्सना करूं लागला. आणि भगवंताविषयी सर्वांची पूज्य बुद्धि द्विगुणित झाली. प्रसेनजितला तर फारच आनंद झाला.

सुंदरीच्या खुनाचा याप्रमाणें तपास लागून त्याचा निकाल लागल्यावर पुढें एके दिवशीं भगवान भिक्षूंस उपदेश करीत असतां म्हणाले:— भिक्षु हो ! मनुष्याचें कर्म पापी होतें त्याला दहा गोष्टी कारण आहेत.

**भिक्षु** :—त्या कोणत्या, भदंत ?

**भगवान** :—तीन शारीरिक कर्में, चार वाचिक कर्में, आणि तीन मानसिक कर्में, मिळून या दहा गोष्टीमुळें मनुष्याचें कर्म पापमूलक होतें.

**सारीपुत्त** :—तीं शारीरिक कर्मे कोणतीं ?

**भगवान** :—तीं हीं, आयुष्मन्. खून, चोरी नि व्यभिचार. ही तीन शारीरिक कर्मे पापात्मक आहेत.

**आनंद** :—आणि वाचिक कर्में ?

**भगवान** :—खोटें बोलणें, निंदा करणें, शिवी देणें आणि गप्पा मारणें.

**सारीपुत्त** :—मानसिक कर्में कोणतीं ?

**भगवान** :—लोभ, द्वेष नि दुष्ट विचार

आनंद :—खरें, भदंत !

**भगवान** :—या दहा गोष्टी—हीं दहा पातकें—प्रत्येक मनुष्यानें—तशांत भिक्षूनें—अवश्य टाळलीं पाहिजेत. या गोष्टी आत्मकल्याणेच्छु माणसानें अवश्य टाळाव्यात असा तथागताचा आग्रहपूर्वक उपदेश आहे. समजलें काय सांगितलें तें ?

**सारीपुत्त** :—समजलें, भदंत.

**भगवान** :—मग सांग तर काय समजलें तें.

**सारीपुत्त** :—हिंसा करावयाची नाहीं. चोरी करावयाची नाहीं. अनीतिमूलक वर्तन करावयाचें नाहीं. खोटें बोलावयाचें नाहीं. खोट्या वार्ता उठवावयाच्या नाहींत. शपथ घ्यावयाची नाहीं. गप्पा मारावयाच्या नाहींत. लोभ धरावयाचा नाहीं. दुसऱ्याचा हेवा दावा करावयाचा नाहीं. मनांत दुष्ट विचार आणावयाचे नाहींत.

**भगवान** :—बरोबर; भिक्षू हो ! तुम्ही हीं दहा पातकें टाळा. म्हणजे तुमचें कल्याण होईल.

असें सांगून भगवान तेथून उठून गेले. ( सूक्त संग्रह )

---

## शाक्यकन्या सम्राज्ञी झाली !

( १ ) भद्रसाल जातक ४६५
( २ ) धम्मपद अट्ठकथा, ४,३

प्रसेनजित् हा कोसलाधिपति असून तो मोठा सम्राट होता. त्याच्या हाताखाली अनेक लहानथोर मांडलिक असून त्यांपैकीच शाक्यांचा राजा हाही एक होता. प्रसेनिजित् हा वैदिक सांप्रदायी असून मोठा उदार व धार्मिक होता. तो वैदिक परंपरेचा अभिमानी होता तरी इतर धर्माविषयीं—त्यांतल्या त्यांत बौद्ध धर्माविषयीं—त्याची आदरबुद्धि व सहानुभूति विशेष प्रशंसनीय होती. भगवान बुद्धाला तो फार मानीत असे. व त्यांचा मुक्काम श्रावस्तीस पडला म्हणजे त्यांना घरी आणून प्रेमानें व आदरानें भोजन घाली व त्यांचा उपदेश ऐके.

एकदां असें झालें कीं भगवान श्रावस्तीत असतांना संघाला आमंत्रण देऊन घरी जेवावयास बोलाविलें. उत्तम भोजन तयार करवून भोजनशालेंत जेवायला.बसण्याची सुंदर व्यवस्था केली. आणि विहा-

रांत निरोप पाठविला. भोजनाची वेळ झाली पण कोणीच भिक्षु आला नाहीं. शेवटीं जेवणाची वेळहि टळून गेली. तरी एकाहि भिक्षूंचें दर्शन नाहीं. तेव्हां त्यानें चौकशी केली आणि त्या चौकशींत असे बाहेर आलें कीं सर्व भिक्षु आपल्या मर्जीतल्या एका उपासकाच्या घरीं जेवावयास गेले आहेत.

नंतर तो आपलें भोजन आटपून संध्याकाळी भगवंतास भेटावयास गेला. त्या वेळीं त्यानें बुद्धास विचारलें कीं भदंत ! श्रेष्ठ अन्न कोणतें ? त्याला भगवान उत्तरले, राजा ! प्रेमानें दिलेलें अन्न फार उत्तम होय ! मग ती भाताची कांजीच कां असेना ! ! तें अन्नच आम्हांला अमृत वाटतें ! !

'ठीक आहे' राजा म्हणाला 'आतां मला असें सांगा कीं भिक्षुलोक कोणाचें आमंत्रण विशेष पसंत करतात ?' याला भगवंतांनीं उत्तर दिलें कीं, राजा ! भिक्षूंना आपल्या आप्ताचें किंवा शाक्याचें आमंत्रण विशेष आदरणीय वाटतें ! यावर राजा पुन: कांहीं बोलला नाहीं. नंतर तो उठून भगवंताला नमस्कार करून तेथून परत निघून गेला.

वरील प्रश्नोत्तरावरून त्याला एक गोष्ट निश्चित समजली कीं भगवंताला व त्याच्या भिक्षुसंघाला शाक्याच्या घरचें किंवा आपल्या आप्तइष्टाचें अन्न विशेष प्रिय आहे व असतें. तेव्हां ती गोष्ट आपणास कशी शक्य होईल हा विचार त्याच्या मनांत मधून मधून घोळूं लागला. अखेर त्याला एक युक्ति सुचली. ती म्हणजे ही कीं शाक्य कुलाशी आपला शरीरसंबंध जोडावा. हा विचार त्याचा पुढें दृढ झाल्यावर त्यानें आपली मनीषा आपल्या वकीला मार्फत शाक्यराजास कळविली.

शाक्य लोक हे प्रसेनजितचे मांडलिक खरे, पण कुलाभिमानांत मोठे कट्टर होते. त्यांना आपल्या जातीचा फार मोठा अभिमान. शाक्याच्या

बाहेर ते सहसा बेटीव्यवहार करीत नसत. तो त्यांना कमीपणा वाटे! पण येथें तसें करणें मोठें कठीण काम होतें. प्रत्यक्ष सम्राटची मागणी! त्याला 'ना' कसें म्हणावयाचें? मोठा पेंच येऊन पडला त्यांना. 'हो' म्हणावें तर जातीचा प्रश्न आड अन् ना म्हणावें तर थोराशी प्रसंग!! मोठी पंचाईत पडली. 'हो' 'ना,' दोन्ही म्हणवेना.

पण कांहीं झालें तरी बोलून चालून मांडलिकच पडले ते! मग सार्वभौमाची मागणी—होय ती विनंतिवजा मागणीच होती—धुडकावून लावण्याचें धैर्य कोणास होणार? अर्थात् शाक्यांना तें झालें नाहीं. त्या वेळीं शुद्धोदनाचा पुतण्या महानामा हा गादीवर होता. त्याला वासव क्षत्रिया नांवाची एक सुंदर व सुस्वरूप मुलगी होती. ती उपवर झालेली असून अद्याप तिचें कोठेंहि जुळलेलें नव्हतें. ती सुंदर व सुस्वरूप कन्या देऊन सम्राटाची इच्छा पूर्ण करावी असें ठरून त्याप्रमाणें वकीलास कळविणेंत आलें.

पुढें योग्य मुहूर्तावर वासवक्षत्रियेचा प्रसेनजित्शी विवाह होऊन तिला सम्राज्ञीपद प्राप्त झालें.

---

## विशाखेचें स्पृहणीय औदार्य

महावग्ग–८–४–६

विशाखा–मिगारमाता ही बुद्धाची अनन्य उपासिका होती. तिची भगवंतावर पूर्ण भक्ति जडली असून त्यांच्या उपदेशावर पूर्ण श्रद्धा होती. ती मोठी उदार व सच्छील असून बुद्धासाठीं तिनें श्रावस्ती येथें आपल्या खर्चानें 'पूर्वाराम' नांवाचा एक सुंदर विहार बांधून तो संघाला दान दिला होता. तिचा संसार सुखांत व आनंदांत मोहरत जाऊन मुलाबाळांनी तो सुसमृद्ध झाला होता. शिवाय प्रत्यक्ष लक्ष्मीदेवीच तिच्या येथें अखंड नांदत होती. महाभाग्यवती खरी ती विशाखा!!

राजगृह सोडल्यावर पुढें लवकरच भगवंताचा मुक्काम जेतवनांत येऊन पडला. त्या वेळीं त्या उदार विशाखा—मिगारमातेच्या मनांत भिक्षूंच्या सुखसोईसाठीं आणखी कांहीं गोष्टी करण्याचें भरल्यावरून एके दिवशीं तिनें भगवंतास व भिक्षुसंघास आपल्या घरीं भोजनास यावयास आमंत्रण दिलें. त्याप्रमाणें येऊन, भोजन वगैरे आटपून भगवान प्रसन्नचित्त होऊन तेथें बसले असतां ती सती त्यांच्याजवळ येऊन हात जोडून नम्रपणें म्हणाली:—भदंत ! माझी तथागताजवळ एक नम्र विनंति आहे. ती भगवान मान्य करतील काय ?

**भगवान** :—ती काय ? विशाखे ! प्रथम कळूंदे मला.

**विशाखा** :—मी भगवंताजवळ पांच गोष्टी मागतें.

**भगवान** :—कोणत्या त्या ?

**विशाखा** :—माझं पहिलं मागणं हें कीं पावसाळ्यांत वस्त्रहीन भिक्षूंचे फारच हाल होतात. अंगावरचं वस्त्र भिजलं म्हणजे तें काढून बाहेर वाळत घालावं लागतं. अशा वेळीं त्यांना नागडं उघडं राहण्याचा प्रसंग येतो. भदंत, तसं राहणं मला योग्य दिसत नाहीं.

**भगवान** :—मग तुझं म्हणणं काय ?

**विशाखा** :—तसा प्रसंग भिक्षूंवर याउप्पर न यावा या हेतूनें मी सर्वांना वस्त्रदान करणार आहे. नग्न राहणं हें खरोखरच लज्जास्पद आहे. लोक त्यांची थट्टा व चेष्टा करतात. तसं होऊं नये, असं माझं म्हणणं आहे.

**भगवान** :—फार उत्तम विचार आहे तुझा.

**विशाखा** :—आतां माझी दुसरी विनंति अशी कीं, श्रावस्ती येथें नवखे भिक्षु आले म्हणजे भिक्षेसाठीं ते गांवांत इकडे तिकडे फिरतात. त्यांचे कष्ट मला पाहवत नाहींत.

**बुद्ध** :—मग तुझा विचार काय आहे ?

**विशाखा** :—त्या सर्वांना मी आयतं भोजन तयार करून वाढावं म्हणते. म्हणजे त्यांचा त्रास नि दगदग नाहींशी होईल.

**बुद्ध** :—ठीक. आतां तुझं तिसरं म्हणणं काय तें सांग.

**विशाखा** :—श्रावस्तीहून बाहेर प्रवासास निघालेल्या भिक्षूंना भिक्षेमुळं वेळेवर जावयास मिळत नाहीं. त्यामुळं आपल्या उद्दिष्ट स्थळीं जाऊन पोंचण्यास उशीर होतो. तसं होऊं नये म्हणून प्रवासेच्छु भिक्षूंना मी आयतं अन्न पुरवूं इच्छितें.

**बुद्ध** :—विशाखे, तुझे विचार फार सुंदर आहेत. तुझी चौथी इच्छा काय ती सांग.

**विशाखा** :—गुरुदेवा ! माझी चौथी इच्छा अशी आहे कीं जे भिक्षू रोगी व आजारी असतील त्यांच्या औषधोपचाराची व पथ्यपाण्याची व्यवस्था व्हावी तशी होत नाहीं. ती अडचण दूर करावी असं माझ्या मनांत आहे. आतां अखेरची मागणी म्हणजे ही कीं अजारी भिक्षूंची सेवासुश्रूषा करण्यांत जे भिक्षु गुंतलेले असतात त्यांना वेळेवर जाऊन भिक्षा मागण्यास फावत नाहीं व त्यामुळं त्यांच्या पोटापाण्याची खोटी होते. असा प्रकार होऊं नये म्हणून मी अशा भिक्षूंची सुद्धां भोजन व्यवस्था करूं इच्छितें. या सर्व गोष्टी करण्यास भगवंतांनी मला अनुज्ञा द्यावी.

**बुद्ध** :—विशाखे ! हें सर्व तुझं म्हणणं खरं ! पण या गोष्टी तुला कशा सुचल्या हें मला सांग पाहूं.

**विशाखा** :—भदंत ! माझ्या घरीं भोजनाची तयारी झाली हें कळविण्यासाठीं मी माझ्या दासीला भिक्षूंकडे पाठविलें होतें. ती गेली त्या वेळीं सर्व भिक्षु पावसांत भिजल्यामुळं अंगावरचे कपडे काढून बाहेर वाळत टाकून तसेच नागडे उघडे फिरत होते. त्यांना पाहून दासी लज्जित झाली व ती तशीच मागे परतून आली. गुरुदेवा ! नग्न राहणं हें खरोखर लोकविरुद्ध व किळसवाणं आहे. म्हणून त्यांची वस्त्राची अड-

चण दूर करावी असं माझ्या मनानं घेतलं. त्याचप्रमाणं जे भिक्षू नवीनच संघात आले असतात त्यांच्या नवखेपणामुळं गावांत भिक्षा कशी व कोठें मागावी हें माहीत नसतं. त्यामुळं त्यांची कुचंबणा होऊन मोठी गैरसोय होते. तसं होऊं नये म्हणून माझी दुसरी सूचना आहे. अशीच गोष्ट बाहेर गावीं जाऊं पाहणाऱ्या भिक्षूंची सुद्धां आहे. भिक्षा मागण्यांत वेळ जात असल्यामुळं त्यांना लवकर आपल्या इष्ट स्थळीं जाऊन पोंचतां येत नाहीं. ही अडचण माझ्या अन्नदानानं दूर होणारी आहे. आतां आजारी भिक्षुसंबंधानं सांगावयाचं म्हणजे असं की त्यांना वेळेवर औषधोपचार व पथ्यपाणी मिळालं नाहीं तर त्यांचा आजार वाढून प्रसंगोपात प्राण जाण्याचाहि संभव असतो. ही आपत्ति टाळण्यासाठी माझी चौथी सूचना. त्याचप्रमाणं जो भिक्षु आजाऱ्याच्या सेवासुश्रूषेंत मग्न झालेला असतो त्याला भिक्षा मागून वेळेवर अन्न मिळविण्याची पंचाइत पडते. तो त्रास चुकविण्यासाठीं माझी पांचवी सूचना. याप्रमाणं भिक्षूंच्या अडीअडचणी दूर करून त्यांचं जीवित शक्य तेवढं सुखमय करावं या इच्छेनं मी भगवंतापुढं वरील सूचना मांडल्या आहेत. हां, विसरलें. आणखी एक महत्वाची सूचना तशीच राहून गेली.

बुद्ध :—ती काय ?

**विशाखा** :—ती म्हणजे ही. भिक्षुणी स्त्रिया नदींत अंघोळ करतांना नग्न होऊन अंघोळ करतात. त्यांत कित्येक तरुण असतात. अशा स्त्रियांना नग्न होऊन अंघोळ करतांना पाहून सामान्य स्त्रिया त्यांची थट्टा व कुचेष्टा करतात. भगवन् ! नग्न राहणं हें स्त्रियांना खरोखर भूषणावह नाहीं ! तें अत्यंत अश्लाघ्य आहे ! तसंच किळसवाणं आहे ! उद्वेगकर नि लज्जास्पद आहे ! नाहीं काय ? तेव्हां भिक्षुणींनी नग्न होऊन स्नान करूं नये या इराद्यानं त्यांना दुसरं वस्त्र

पुरवावं अशी माझी फार इच्छा आहे. हे सर्व माझे मनोरथ तडीस नेण्यास गुरुदेव मला परवानगी देतील काय ?

बुद्ध :—छान ! छान ! विशाखे ! तुझे विचार अत्यंत सुंदर नि उदात्त आहेत ! ते पवित्र व पुण्यप्रद आहेत ! जे सत्पात्र आहेत त्यांना दान करणं म्हणजे सुपीक जमीनींत चांगलं बीं पेरण्यासारखं होय ! त्यापासून चांगलं पीक आलंच पाहिजे. मात्र तें दान कुपात्रीं नसावं. जी स्त्री सद्वृत्त असून निष्कामबुद्धीनं व परोपकार दृष्टीनं सज्जनांच्या अडीअडचणी निवारण करते ती मरणोत्तर सद्गतीस जाते. व या लोकीं सुखासमाधानांत कालक्रमणा करते. तिला आपल्या उदार कृत्याचा परमानंद वाटतो व ती सदैव प्रफुल्ल असते. तुझ्या सूचना मला मान्य आहेत. त्या मी मंजूर करतों. इतकंच नव्हे तर त्यांना नियमाचं स्वरूप देऊन माझ्या विनयशास्त्रांत समाविष्ट करतो !

असें म्हणून त्यांनी खालील गाथा म्हटली—

**‘ न वे कदरिया देवलोकं वजन्ति**
**बाला हवे न प्पसंसन्ति दानं ।**
**धीरो च दानं अनुमोदमानो**
**तेनेव सो होति सुखी परत्थ ॥**

( महावग्ग, ४–८–६ )

**भावार्थ** :—जे कवडीचुंबक असतात ते देवलोकाप्रत जात नाहींत. जे मूर्ख असतात तेच तेवढे दानाची प्रशंसा करीत नाहींत. पण जे शाहणे असतात त्यांना दानधर्म करणें यांतच आनंद वाटतो आणि त्या सत्कृत्यामुळें परलोकीं ते सुखी होतात.

---

# जन्मला तो मरणारच !

( थेरी–अपादान, तृतीय भाणवार )

कृशा गोतमी ही एका नवकोट नारायणाची बायको. तिला एकुलता एकच मुलगा होता. अर्थात् तो तिचा जीव कीं प्राण असे. पण दैवगति किती विलक्षण ! पुढें तो मुलगा अकस्मात सर्पदंशानें मृत्यु पावला ! पुत्रवात्सल्यामुळें तिला वाटलें कीं मुलगा कांहीं मेला नाहीं. नुसता बेशुद्ध होऊन पडला आहे. म्हणून ती माउली त्याला खांद्यावर घेऊन कोणाला तरी दाखवून औषधोपचार करावा या हेतूनें ती घरोघर फिरूं लागली. जो तो त्या मुलाकडे पाहून तो बेशुद्ध नसून प्रेत झाला आहे असें पाहून तिला ती गोष्ट न कळवितां आपल्याकडे द्यावयाला औषध नाहीं इतकेंच सांगून तिला परत लावून देई. व ती गेल्यावर म्हणे कीं ' गोतमीला वेड लागलें आहे ! मुलगा मेलेला आहे ! तो कसचा आतां जिवंत होणार ! !'

बिचारी गोतमी ! अगदीच वेडी ! खरोखरच ती माउली पुत्रमोहानें भ्रमिष्ट झाली होती ! ! जाई तेथें तिला उत्तर मिळे कीं आपल्याजवळ तसलें औषध नाहीं. पण एकाचेंहि तिला निक्षून सांगण्याचें धैर्य होईना कीं, तो मुलगा मेलेला आहे. शेवटी एकानें सूचना दिली कीं, गोतमी ! मजजवळ कांहीं तसलें औषध नाहीं. पण येथें शेजारींच जेठवनांत गोतम बुद्ध राहत आहेत. त्यांच्याकडे जा म्हणजे ते त्याला औषध देऊन शुद्धीवर आणतील.

हें ऐकून तिला जो आनंद झाला तो सांगून पुरवत नाहीं. धांवतच ती माउली बुद्धाजवळ गेली. व त्यांना नमस्कार करून खांद्यावरचा मुलगा त्यांच्यापुढें ठेवून म्हणाली :—भदंत ! हा माझा मुलगा पाहा हो ! बेशुद्ध होऊन पडला आहे ! तो पुनः शुद्धीवर येईल, असें कांहीं तरी त्याला औषध द्या ! !

भगवंतांनी त्या मुलास पाहिलें. तो बेशुद्ध नसून मेलेला आहे अशी त्यांची खात्री झाली. पण तसें तिला एकदम सांगणें म्हणजे तिला एकदम दु:खाच्या डोहांत लोटणें होय असें समजून तिची निराळ्या तऱ्हेनें समजूत घालावी या इराद्यानें त्यांनी तिला म्हटलें:— गोतमी ! ठीक आहे. तुझ्या मुलाला मी औषध देऊन शुद्धीवर आणतों. पण त्यासाठीं एक मूठभर मोहरी पाहिजे. तेवढी घेऊन ये. मात्र इतकं लक्षांत ठेव कीं ज्या घरांत माणूस मेलेलं नाहीं अशा घरांतलीच ती असावी. दुसरीकडची चालणार नाहीं.

केवढा आनंद तिचा ! त्या माउलीचा ! तिला वाटलें की आतां आपला मुलगा लवकरच शुद्धीवर येईल ! 'बरं. देवा, आत्तां आणून देते' असें म्हणून मुलाला घेऊन मोठ्या उल्हासानें ती मोहरी आणावयास गेली. गावांत आल्यावर प्रथमच एक घर लागलें. त्या घरांत चटकन् शिरली आणि आंत जाऊन घरातील बायकांजवळ 'बाई, एक मूठभर मोहरी द्या हो, बाळाच्या औषधाकरतां पाहिजे आहे.' असें म्हणतांच त्यांनी तिला एक मूठभर मोहरी आणून दिली. ती पदरांत घेतांना तिला बुद्धवचनाची आठवण झाली व त्या बाईला म्हणाली, —'हो खरंच, विसरलें होतें. तुमच्या घरी मागपुढं कोणीतरी मेलं आहे काय ?' त्यासरशी ती बाई डोळ्यांत आसवें आणून म्हणाली:—काय सांगू , बया ! नुकताच आमचा बाप वारला ! !

'अरेरे ! तर मग तुमची मोहरी नको मला' असें म्हणून ती तेथून निघाली व पुढच्या घरी गेली. तेथें तिला समजलें कीं मागच्या वर्षीच त्या घरांत एक म्हातारी वारली ! पुढें तेथून बाहेर पडून तिसऱ्या घरी गेली. तेथें तिला बातमी मिळाली की तेथें थोड्याच दिवसामागें मालकाची बायको वारली ! पुढच्या घरीं गेली तेथे समजलें कीं, त्या घरीहि एक मुलगी वारली ! चार घरें सोडून पुढल्या घरीं गेली. तेथें कळलें कीं मालकाची एक बहिण होती ती वारली ! या प्रमाणे सर्व गांव ती

हिंडलीच हिंडली. पण असें एकहि घर सांपडेना की ज्या घरांत माणूस वारलें नाहीं. जावें तेथें कोणीतरी मेलेलेंच !

शेवटी ती थकली, दमली, निराश झाली ! आणि रस्त्याच्या कडेला जाऊन 'हुश्य' करून बसली. यावेळीं दिवस मावळून रात्र झाली होती. गांवभर फिरून फिरून तिला फार थकवा आला होता. शिवाय उभ्या दिवसांत पोटांत अन्नाचें शीतहि नव्हतें ! यामुळें ती फार हैराण झाली होती. मुलाला मांडीवर घेऊन उदास मनानें केव्हां आकाशाकडे बघ, केव्हां गांवावरून नजर फिरव, केव्हां मुलाच्या अंगावरून हात कुरवाळ, केव्हां मधेंच हात जोडून देवाची प्रार्थना कर, असे चाळे ती तेथें बसून करूं लागली.

शेवटीं शेवटीं तिची दृष्टि जातां जातां गावांतील दिव्यांकडे गेली. त्यांत कांहीं मिणमिण करीत होते. कांहीं विझण्याच्या बेतांत होते. कांहीं कांहीं मधेंच पटकन् विझूनहि जात होते. असें होतां होतां पुढें कांहीं वेळानें ते सर्व दिवे विझून जाऊन सर्वत्र कुट्ट अंधार पसरून राहिला ! हें पाहून तिच्या अंतःकरणांत एकदम प्रकाश चमकला अन् ती भ्रमिष्टाची नीट शुद्धीवर आली.

तिला आतां वाटूं लागलें कीं, त्या दिव्यांप्रमाणेच आपल्या मुलाचीहि आत्मज्योत विझून गेली असावी. मग ती परत येणार कशी ? छे, मुळींच नाहीं. आपलं बाळ मेलं हेंच खरं. 'देवा ! केवढी खुळी मी !' ती आपल्याशीच म्हणूं लागली, 'मरण हें कोणाला चुकलं आहे ? जो जन्मला तो मरणारच ! आपलं बाळहि असंच मेलेलं आहे ! ! तें आतां जिवंत होणं नाहीं ! ! हें मानवी जीवित किती अनित्य आहे ! संसार हा खोटा आहे ! मग त्याविषयीं दुःखशोक करीत बसण्यांत काय अर्थ ? प्राप्त प्रसंगास तोंड द्यावं यांतच शाहणपणा आहे,' असा विचार व विवेक करून ती तेथून उठली व मुलाला स्मशानांत नेऊन त्याला मूठमाती दिली.

दुसरे दिवशीं सकाळीं उठून ती पुनः बुद्ध भगवंताकडे आली. तिला पाहून भगवान म्हणाले 'गोतमी ! आलीस, ठीक झालं. पण मोहरी आणलीस कां ? तुझ्या मुलाला औषध हवं ना ? मग आण कुठं आहे ती. '

गोतमी हात जोडून म्हणाली: भदंत ! आतां मला मोहरीची जरूरी राहिली नाहीं. '

**भगवान**:—नाहीं ? कां बरं ?

**गोतमी**:—देवा ! आपल्या म्हणण्याचा अर्थ कळला मला. मी त्या वेळीं पुत्रमोहानं वेडी बनले होते. आतां माझे डोळे चांगले उघडले, भदंत ! पूर्वीची गोतमी राहिले नाहीं आतां मी ! नीट शुद्धीवर आलेली आहे ! !

**भगवानः**—( हंसून ) अस्सं. मग छान. बरं. गोतमी ! कां आलीस आतां तूं ?

**गोतमी**:—भगवंताकडून उपदेश ऐकायला.

**भगवान**:—तुला उपदेश ऐकावयाचा आहे माझा ? ठीक. मग बैस इथं. तुला उपदेश सांगतो. नीट मन देऊन ऐक.

**गोतमी** (मान हालवून):—होय, भदंत. माझं लक्ष आहे तिकडं.

**भगवानः**—हें बघ;गोतमी, जगाचा हा जो क्रम आहे तो मोठा विलक्षण आहे. तो कोणाला चुकवीन म्हणजे चुकवितां येणार नाहीं. जो जन्मला तो मागे पुढे केव्हां तरी मरणारच ! मरण कोणाला चुकलेलं नाहीं. जन्मणं, वाढणं, फुलणं, फळणं, जीर्ण होणं आणि अखेर मरून जाणं, अशी ही या जगाची जीवनकथा आहे.

**गोतमीः**—होय भदंत, गोष्ट खरी आहे.

**भगवानः**—मातीची मडकी नसतात का ? तशीच गत जन्मलेल्या या सर्व प्राण्यांची आहे. मडकें केव्हां फुटेल याचा नेम नसतो. तद्वत मनुष्याचेंहि आहे. जन्मला तो केव्हा तरी मरणारच ! मृत्यूच्या मगर-

मिठींतून कोणीहि सुटलेला नाहीं व कोणीहि सोडविणार नाहीं !! बाप ही गोष्ट करूं शकत नाहीं, आईला हें शक्य नाहीं, आप्त-इष्टांना तें साध्य नाहीं !! आणि मला सुद्धां तें करतां येत नाहीं !! ही गोष्ट देव मानव शक्तीच्या बाहेरची आहे !! ब्रह्मासुद्धां हें करूं शकत नाहीं !!! आणि म्हणून जग हें या दृष्टीनें पाहिलें असतां अत्यंत अस्थिर व म्हणून दु:खशोकानं भरून गेलं आहे.

**गोतमी**:—अगदी बरोबर, भदंत !

**भगवान**:— आणि म्हणून मी तुला असं सांगतो कीं मेलेल्याबद्दल रडून, दु:ख करून, आक्रोश करून मनाला कधीहि शांति लाभावयाची नाहीं. उलट त्यापासून दु:ख मात्र अधिक वाढेल. कमी व्हावयाचें नाहीं. शरीर व्याकुल होईल आणि मन उदास व निरास बनेल. पण अशा दु:खशोकापासून तो मृत मनुष्य कांहीं पुन: जिवंत होणार नाहीं. मेला तो गेलाच ! कायमचा गेला !! पुनः तो कधीं भेटणार नाहीं !! म्हणून त्या विषयी आशा धरणं, शोक करणं, अश्रु गाळणं व्यर्थ—अगदीं व्यर्थ—आहे !! पायांत रुतलेला कांटा बाहेर काढून टाकला तरच मनाला शांति लाभते. जो पर्यंत शरीरांत तो आहे तो पर्यंत मनाला दु:ख व क्लेश होणारच. म्हणून म्हणतो, गोतमी ! तूंहि हा पुत्रविरहजन्य—मायामोहजन्य—दु:खशोक—रूपकांटा झुगारून दे, म्हणजे तुलाहि शांति समाधान लाभेल व तूं सुखी होशील !! गोतमी हें मी सांगितलेलं नीट लक्षांत ठेव व घरीं जाऊन शांतिसमाधानांत रहा. गोतमी ! जा आतां, घरीं जा हो.

**गोतमी**:—कुठं जाऊं भदंत ? भगवंताला सोडून मी आतां कुठं जाऊं ? माझं घरदार सगळं आतां आपणच आहां !! भदंत, मला आतां प्रव्रज्या द्या अणि आपल्या पायासंनिध राहूंद्या मला !!

ही तिची इच्छा पाहून भगवंतांनी तिला प्रव्रज्या देऊन तिला संघांत दाखल करून घेतलें.

या प्रसंगीं त्यांनी तिला ही पुढील गाथा म्हणून दाखविली :—

**'तं पुत्तपसुसम्मत्तं ब्यासत्तमानसं नरं।**
**सुत्तं गामं महोघो व मच्चु आदाय गच्छति ॥ १५ ॥**

(धम्मपद २०-१५)

**अर्थ**:—रात्रीं निद्रित असलेल्या ग्रामास ज्याप्रमाणें महापूर वाहून नेतो त्याप्रमाणें मुलाबाळांविषयीं व गुराढोरांविषयीं जो आसक्त आहे व ज्याचें मन त्यांत अगदी गढून गेलें आहे अशा असावध मनुष्याला मृत्यु अचानक पकडून उचलून नेतो!

पुढें ही किसा गोतमी प्रसिद्ध बौद्ध पंडिता झाली व थेरीगाथेंत तिची ही पुढील सुंदर गाथा प्रसिद्ध आहे:—

**'न गामधम्मा नो निगमस्स धम्मो**
**न चापियं एककुलस्स धम्मो।**
**सब्ब-लोकस्स सदेवकस्स**
**एसेव धम्मो यदिदं अनिच्चता' ति ॥**

भगवान बुद्धांनी प्राकृतजनांना धर्मज्ञानाचीं गूढ तत्त्वें दृष्टांतरूपानें कसे पटवून देत, याचा ही कथा एक उत्तम मासला आहे. याप्रमाणें त्यांनी आपला धर्म समजावून देण्यासाठीं दृष्टांताचा अनेक ठिकाणी मोठया कौशल्यानें उपयोग केला आहे.

---

## ज्ञानोदधि अपार नि अगाध आहे

संयुत्त-निकाय ५-४३७

भगवान कौशांबी येथें सिंसप अरण्यांत येऊन राहिले होते. त्या वेळीं असें झालें कीं भिक्षूंना संभोवती बसवून घेऊन उपदेश करीत असतां सिंसप झाडाचीं पानें आपल्या मुठींत भरून घेऊन ती मूठ पुढें करून म्हटलें 'भिक्षू हो! सांगा, माझ्या मुठीतील पानें अधिक आहेत कीं या समोरच्या झाडावरचीं अधिक आहेत?

भिक्षु :—हें काय विचारावें, भदंत ? अरण्यातील झाडांवरचीं अधिक आहेत.

बुद्ध :—खरें ना ?

भिक्षु :—होय, भदंत. अगदी खरें.

बुद्ध :—त्याचप्रमाणें, भिक्षु हो, मी जें कांहीं जाणलें आहे पण तुम्हास अद्याप कळविलें नाहीं असें ज्ञान अपार नि अनंत आहे. तें सगळें तुम्हांस सांगणें मला इष्ट वाटत नाहीं.

भिक्षु :—आम्हांस तें सांगतां येण्यासारखें नाहीं काय ?

बुद्ध :—त्यापासून तुम्हाला फायदा नाहीं, उपयोग नाहीं. म्हणून मी तें तुम्हास कळविलें नाहीं. व कळवूं इच्छित नाहीं. ज्या ज्ञानोपदेशानें तुमचें चारित्र्य उच्चतर व पवित्रतर होणार नाहीं, तुम्हांला जगाचा कंटाळा व वीट येणार नाहीं, तुमची तृष्णा शमणार नाहीं व इच्छा मरणार नाहीं, शांति लाभणार नाहीं व निर्वाण साधणार नाहीं असें रुक्ष व नीरस ज्ञान सांगून काय होणार आहे ?

भिक्षु :—म्हणूनच आपण तें आम्हास उपदेशिलें नाहीं असाच ना त्याचा भावार्थ ?

बुद्ध :—होय, मी जें कांहीं तुम्हांला सांगितलें आहे, उपदेशिलें आहे, तेवढें तुमच्या मनांत ठसलें म्हणजे पुरें आहे. अधिक सांगण्याची जरूरी नाहीं. माझा उपदेश ध्यानांत ठेऊन त्याप्रमाणें वर्तन करा म्हणजे निर्वाण खात्रीनें तुम्हांला प्राप्त झालेंच म्हणून समजा.

भिक्षु :—म्हणजे तीं चार आर्य सत्येंच ना ?

बुद्ध :—होय, दुःख म्हणजे काय, दुःखसमुदय म्हणजे काय, दुःखनिरोध म्हणजे काय व दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा म्हणजे काय हीं चार आर्यसत्यें ओळखून त्याप्रमाणें तुम्ही आचरण करीत गेलांत म्हणजे इतर ज्ञानाची—चार आर्यसत्यापलीकडील ज्ञानाची—तुम्हांस जरूरी नाहीं. माझ्या धर्माचें सारसर्वस्व म्हणजे काय तीं

हीं चार आर्य सत्यें होत. तीं नीट समजून घेऊन त्याप्रमाणें तुमचें वर्तन घडल्यास तुम्ही संसारमुक्त—दुःखमुक्त—होऊन निर्वाण खात्रीने गांठालच गांठाल.

या संवादावरून असें अनुमानण्यास जागा आहे कीं बुद्धांनी जें ज्ञान जगाला सांगितलें व शिकविलें त्यापेक्षां अधिक ज्ञान त्यांच्या-जवळ होतें अगर असावें. चार आर्यसत्यापेक्षां अधिक प्रगति त्यांची ज्ञानक्षेत्रांत झाली होती ही गोष्ट निर्विवाद म्हणतां येईल. फक्त इतकेंच कीं आर्यसत्यापेक्षां अधिक ज्ञान त्यांनी शिष्यांस उपदेशिलें नाहीं.

याचें कारण उघडच आहे. अतींद्रिय ज्ञानापासून—तर्कातीत ज्ञाना-पासून—मनुष्याला त्यांच्यामतें अनुभवदृष्टीनें म्हणण्यासारखा फायदा नाहीं. ते म्हणत कीं उपनिषदांतील आत्मज्ञान म्हणजे सूक्ष्म बुद्धीचा केवळ कल्पना—खेळ आहे! पोकळ तर्काचा नुसता विलास आहे! शुष्क तत्त्वज्ञानाचा सावळागोंधळ आहे! अनेक मतामतांचा पोकळ गलबला आहे! तेव्हां अशा भ्रामक ज्ञानाचा अंगिकार करून नीरस व रुक्ष विषयांत गढून गेल्यास त्यापासून खरी शांति व समाधान लाभेल हें शक्य नाहीं.

याप्रमाणें त्यांची समजूत व निश्चय झाला असल्यामुळें ते या वैदिक ऋषींच्या पारमार्थिक व पारमात्मिक गहन व सूक्ष्म आत्म-ज्ञानाच्या भरीस पडले नाहींत. त्यांनी उपदेशिलेला धर्म अगदी व्यावहा-रिक सत्य असून कोणालाही त्याचा अनुभव पडताळून पाहतां येण्यासारखा होता व आहे. त्यांच्या धर्माचीं तत्त्वें कोणत्याहि टोंकाला पोंचलेलीं नसून तीं सुवर्ण मध्यावर अधिष्ठित झालीं आहेत. आणि म्हणून तीं चार आर्यसत्यें व त्याला उपकारक असें तत्त्वज्ञान याचाच तेवढा त्यांनी अंगिकार व पुरस्कार करून सर्व जगभर आपल्या धर्माचा प्रसार केला.

---

# डाळ शिजली नाहीं

चुल्लवग्ग (विनय पिटक, ७–१–६)

देवदत्त हा जितका शाहाणा व कर्तबगार होता तितकाच तो मत्सरी व महत्वाकांक्षी होता. आतां त्याला भिक्षुसंघाचा पुढारी होण्याची हांव सुटली. भगवान बुद्धदेव या वेळीं जवळ जवळ सत्तराच्या घरीं आले होते. पूर्वीप्रमाणें त्यांच्यांत कामाची रग व उत्साह राहिलेला नव्हता. तेव्हां संघाचें नायकत्व आपल्याकडे घेऊन भगवंताचा मानमरातब आपण बळकावावा अशी त्यास आशा–नव्हे, दुराशा–सुटली.

पण भगवंताची मर्जी व प्रेम हें सगळे आनंद व सारीपुत्त या दोघांवरच असल्यामुळें त्यांची सगळी भिस्त व विश्वास त्यांवरच होता. देवदत्तावरहि त्यांचा लोभ होता. नव्हता असें नव्हे. पण आनंद व सारीपुत्त म्हणजे हे त्यांचे प्राण. आणि म्हणून त्या दोघांवर गुरुदेवांचा लोभ व विश्वास सर्वांत अधिक.

देवदत्ताला आतां पट्ट शिष्य होण्याची फारच हांव सुटली. तो याविषयीं फार अधीर झाला होता व म्हणून आपला मनोदय गुरुदेवांस कळवून त्याची एकदाची शहानिशा करून टाकावी असें त्याच्या मनांत फार भरलें. पुढें लवकरच भगवंताचा मुक्काम राजगृहीं वेळुवनांत येऊन पडला तेव्हां तो संधि साधून त्यांच्याकडे आला.

त्या वेळीं गुरुदेव शिष्यांना संभोंवती बसवून घेऊन त्यांना उपदेश करण्यांत गुंतले होते. त्या श्रोतृवृंदात राजा बिंबसार हाहि आपल्या परिवारासहित उपस्थित होता. तेथें आल्यावर तो भगवंतांस नमस्कार करून जवळच एका बाजूला जाऊन बसला.

पुढें प्रवचन संपल्यावर तो आपल्या जागेवर उठून उभा राहून दोन्ही हात जोडून नमस्कार करून भगवंतास म्हणाला 'गुरुदेव! माझी एक नम्र विनंति आहे.

**भगवान**:—ती काय? देवदत्ता!

**देवदत्त**:—ती आपल्यापुढं मांडूं का ?

**भगवान**:—खुशाल. तुला मोकळीक आहे. देवदत्ता ! खुशाल मांड.

**देवदत्त**:—गुरुदेव आतां वृद्ध झाले आहेत. त्यांचं आतां उतार वय झालं आहे. धर्मचक्रवर्ती राजानं काय करावयाचं ते सर्व त्यांनी करून टाकलं आहे.

**भगवान** :—मग तुझं म्हणणं काय ?

**देवदत्त** :—माझी नम्र सूचना भगवंताच्या पायापाशीं आहे कीं गुरुदेवांनी आतां विश्रांति घ्यावी. व राहिलेलं आयुष्य सुखसमाधानांत घालवावं.

**भगवान** :—म्हणजे ? तूं काय म्हणतोस त्याचा अर्थ कळला नाहीं मला.

**देवदत्त** :—आपण धर्मराज आहा. राजे लोकांना उत्तराधिकारी म्हणून जसा युवराज असतो तद्वत धर्मराजालाहि तसाच एक उत्तर अधिकारी शिष्य असावा हें सांगण्याचा माझा भावार्थ.

**भगवान** :—फार छान ! अगदी योग्य सूचना आहे तुझी. मग पुढं मी काय करावं म्हणतोस तूं ?

**देवदत्त** :—विशेष कांहीं नाहीं. फक्त इतकंच कीं आत्तांच आपण तसा एक पट्ट शिष्य नेमून घ्यावा. म्हणजे पुढं वाद उपस्थित होणार नाहीं. आणि तो नेमावयाचा तर तो अनुग्रह भगवंतानी मजवरच करावा ! ही गोष्ट करून भगवंतानी आतां कार्य-निवृत्त व्हावं व अवशेष आयुष्य ध्यानयोगांत घालवावं. मला तो मान देऊन भिक्षुसंघाचा नायक केल्यास मी खात्रीनं सांगतो कीं भगवंताचं अंगीकृत कार्य भगवंताप्रमाणंच तितक्याच नेटानं व उत्साहानं पुढं चालूं ठेवून भगवंताच्या धर्माची वाढ व विकास जरूर करीन. अगदी खात्रीनं करीन.

**भगवान** :—बस्स कर, देवदत्ता ! तुझी वटवट बंद कर !

भिक्षुसंघाचा नायक होण्याची पात्रता तुझ्यांत मुळींच नाहीं! ती आशा देखील तूं करूं नकोस ! तुला तें मुळींच जुळावयाचं व म्हणून मिळावयाचं नाहीं ! ! सारीपुत्त व मोग्गलायन हे केवढे तरी कर्तबगार व विश्वासू शिष्य आहेत. या कामास ते किती तरी लायख आहेत. पण त्याना सुद्धां मी असे तोपर्यंत संघाचें पुढारीपण देण्यास मी तयार नाहीं. मग तुझ्यासारख्या मूर्ख बडबड्याला तो मान कसा मिळेल ? ती गोष्ट कालत्रयींहि शक्य नाहीं ! !

या भाषणानें देवदत्त अगदी चीत झाल्यासारखा झाला. त्याला फार आशा होती कीं, भगवान आपल्या विनंतीस रुकार देतील म्हणून. पण ती सपशेल घसरून निराशेंत गडप झाली.

इतकेंच नव्हे तर राजा बिंबसारासमक्ष—एवढ्या प्रचंड शिष्य-समुदायासमक्ष– भगवंतांनीं केलेली आपली निराशा व निर्भर्त्सना आणि त्याचप्रमाणें सारीपुत्र व मोग्गलायन यांची केलेली स्तुति व प्रशंसा पाहून तो मनांत फार चरकला व चरफडला. पण उघड तसें कांहीं त्यानें दाखविलें नाहीं.

मात्र हा अपमान तो पुढें जन्मभर विसरला नाहीं ! नंतर तो ' भग-वंताची मर्जी' असें म्हणून त्यांस औपचारिक नमस्कार करून स्वारी तेथून तावातावानें निघून आपल्या कुटीकडे चालती झाली.

गुरुदेव ते ! भगवान बुद्ध ! त्रिकालज्ञानी ! तसेच मानवी अंतःकर-णाचे सूक्ष्म निरीक्षक ! त्यांना अज्ञात असें काय असणार ? देवदत्ताची बाहेर जातांनाची मनस्थिति त्यांनी अगदीं बरोबर ओळखिली आणि सर्व श्रोतृवृंदाची पांगापांग झाल्यावर आनंद व सारिपुत्त यांना हांक मारून म्हटलें 'भिक्षु हो, तुम्ही आतांच्या आतां राजगृहांत जा आणि लोकांना जाहीर करा कीं, पूर्वीचा देवदत्त आतां राहिला नाहीं. तेव्हां तो एक प्रकारचा होता आणि आतां तो निराळ्या प्रकारचा झाला आहे. त्याची बुद्धि पालटली आहे व मनांत महत्वाकांक्षा नि मत्सर

उत्पन्न झाला आहे. तेव्हां, तो काय बोलेल किंवा काय करील यांत बुद्धाचा, अगर त्यांच्या धर्माचा किंवा त्यांच्या भिक्षुसंघाचा कांहीं एक संबंध नाहीं ! त्याचा तोच पूर्ण मालक व जबाबदार आहे.'

त्याप्रमाणें सारीपुत्तानें राजगृहांत जाऊन वरील गोष्ट शहरवासियांस रस्त्यावरून फिरून जाहीर केली. हें ऐकून लोक आपापसांत कुजबुजूं लागले कीं 'पाहा हो, देवदत्ताचा मान व वर्चस्व सहन न होऊन भगवान व त्यांचा संघ उगाच त्याचा द्वेष व मत्सर करीत आहेत !'

---

## देवदत्ताची महत्वाकांक्षा

चुल्लवग्ग ( विनय पिटक, ७–१–३ )

यानंतर पुढें कांहीं दिवसांनीं भगवंताचा मुक्काम कौशांबी येथें घोषितारामांत येऊन पडला. त्या वेळीं भिक्षुसंघांत कांहीं क्षुल्लक कारणावरून वाद माजून अस्वस्थता व अनवस्था माजून राहिली. तसें विचारल्यास मतभेदाचें कारण म्हणण्यासारखें महत्वाचें नव्हतें. अगदी क्षुल्लकच होतें. पण तेवढ्यावरूनच भयंकर तेढ वाढून संघात फूट पडण्यापर्यंत मजल गेली.

तें कारण म्हणजे हें कीं, भिक्षूंच्या विनय ( नियम ) शास्त्राप्रमाणें शौचविधि आटपल्यावर जलपात्र पालथें करून ठेवावयाचें असा दंडक असे. पण कोणा एका भिक्षूनें तसें न करतां तें उपडेंच ठेऊन दिलें. झालें. एवढ्यावरूनच वाद माजून त्याचें पर्यवसान अखेर विरोधांत व फुटींत झालें.

अर्थात् त्यांच्यांत दोन तट पडले. एक सौत्रांतिक व दुसरा विनयांतिक. या दोहोंत पुढें इतका विरोध वाढला कीं खुद्द भगवंतांनी मध्ये पडून मध्यस्थी केली तरी कांहीं उपयोग झाला नाहीं. भगवान त्या

प्रसंगाला भारी कंटाळले. व शेवटीं निरुपाय होऊन संघाला रामराम ठोकून कौशंबी सोडून एकटेच श्रावस्तीस चालते झाले.

यावेळी संघात आनंद सारीपुत्त व मोग्गलायन यांचे प्रस्थ व प्राबल्य भारीच माजून राहिलें होतें. प्रत्येक बाबतीत त्यांचाच वरचष्मा असल्यामुळे देवदत्ताला तें पसंत न पडून संघातून निघून तोहि बाहेर पडला व राजगृहांत येऊन दाखल झाला.

देवदत्ताची योग्यता व वर्चस्वहि संघांत बरेचसें होतें. तो योगविद्येंत अत्यंत निष्णात होता. त्याला ती विद्या इतकी साध्य झाली होती कीं, जवळ जवळ बुद्धाइतकाच तो त्यांत निष्णात झालेला होता. त्या विद्येच्या योगानें वाटेल तो चमत्कार करून दाखविणेची अलौकिक कला व सिद्धि त्यास प्राप्त झाली होती.

तो राजगृहांत येऊन राहिल्यावर त्याला अशी इच्छा झाली कीं, आपणहि एक नवीन संघ स्थापन करून त्याचा आपण पुढारी व नायक व्हावें. पण संघ स्थापन करणें ही बोलण्याइतकी कांहीं साधी व सोपी गोष्ट नव्हती. त्याला लोकांचा चांगला व भक्कम आश्रय व पाठिंबा असावा लागतो. पण तो कोठें होता त्याच्याजवळ ? म्हणून तो कसा मिळवावा अगर मिळवितां येईल या विचारांत तो मग्न झाला.

पुढें विचार करतां करतां एक व्यक्ति त्याच्या नजरेपुढें दिसली आणि ती म्हणजे राजपुत्र ! बिंबसाराचा ज्येष्ठ चिरंजीव व मगध राजाचा उत्तराधिकारी—युवराज अजातशत्रु !!

हा अजातशत्रु जेवढा शूर होता तितकाच तो भाविक व श्रद्धाळु होता. हें सावज गांठून त्याचा आपल्या कार्यीं उपयोग करून घेण्याचा त्यानें घाट घातला. व त्याप्रमाणें योग्य संधीची मार्गप्रतीक्षा करीत तो तेथेंच बस्तान घालून बसला.

एके दिवशी राजपुत्रास भेटण्यासाठीं म्हणून तो राजवाड्यांत आला.

देवदत्ताचें नांव व लौकिक राजपुत्रास ऐकून माहीत होता व दहापांच वेळां त्यानें त्यास पहिलेंहि होतें. पण प्रत्यक्ष असा संबंध त्यास एक दोन वेळांच आलेला होता. देवदत्ताविषयीं त्याचा ग्रह चांगला असल्यामुळें त्याच्या विषयीं त्याच्या (युवराजाच्या) मनांत आदरबुद्धि चांगली रुजलेली होती.

राजवाड्याजवळ येतांच देवदत्तानें आपले रूप पालटून लहान मुलाचें धारण करून कमरेसभोवती एक साप गुंडाळून घेतला व त्या वेषांत राजवाड्यांत शिरून झप झप पावलें टाकीत अजातशत्रु जेथें होता तेथें येऊन पटकन् तो त्याच्या मांडीवर जाऊन बसला. अर्थात् त्या विचित्र मुलाला पाहून युवराजाची धांदल उडाली. तो दचकला, घाबरला, ओरडला व विस्मयचकित होऊन पुतळ्याप्रमाणें स्तब्ध उभा राहिला ! !

इतक्यांत तें मूल म्हणालें :–अजातशत्रो ! तूं मला ओळखलें नाहींस काय ?

**अजातशत्रु**:––नाहीं, मुला तूं कोण ?

**देवदत्त**:––अरे, मी देवदत्त !

**अजातशत्रु**:––आं ! आपण देवदत्त !

**देवदत्त**:–होय, तोच मी. तुला इतकं घाबरण्यासारखं काय झालं ?

**अजातशत्रु**:––देवदत्त असाल तर मग पूर्वीच्या रूपांतच आपण प्रगट व्हा ना ? आपण पूर्वीचे देवदत्तच व्हा ! हें असलें विचित्र रूप नको !

अजातशत्रूचें हें भाषण ऐकून तो मांडीवरून उठला व लगेच जरा अडोशास जाऊन आपलें पूर्वीचें रूप धारण करून हंसत हंसत त्याच्यापुढें येऊन उभा राहिला ! अजातशत्रूला तें पाहून मोठें आश्चर्य वाटलें व तसाच आनंदहि झाला.

अजातशत्रु सुबुद्ध झाल्यावर तो आईच्या वळणावर जाऊन जैनांचा चाहता झाला.

बिंबसाराच्या घरांतील हा धार्मिक भेद देवदत्तास पूर्ण अवगत असल्यामुळें त्यानें अजातशत्रूवर आपली मोहिनी पसरून पुढील आपला डाव साधण्यासाठीं त्याला वश करून घेऊन त्याच्या मदतीनें गयाशिर येथें आपलें वस्तान चांगलें बसविलें. यानंतर त्यानें जें कारस्थान चालविलें त्याची हकीकत क्रमाक्रमानें यथाप्रसंग पुढें येणारच आहे. जातां जातां येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं हा घरगुती धर्मभेदच पुढें त्या बिंबसाराच्या दु:खास व नाशास बव्हंशी कारणीभूत झाला.

---

## गुप्त कारस्थान

चुल्लवग्ग (विनय पिटक, ७–२–१)

अजातशत्रूचें व देवदत्ताचें सूत्र जमल्यावर गयाशिर येथें देवदत्तानें आपलें ठाणें मांडलें. ही बातमी बुद्धसंघांत पसरतांच तेथील कांहीं असंतुष्ट व भोजनभाऊ भिक्षु तेथून फुटून देवदत्तास जाऊन मिळाले. त्याचा भिक्षुसंघ पुढें दिवसेंदिवस वाढूं लागला व राजगृहांत त्याचें प्रस्थ हळुहळू बळावत चाललें. छेलना राणीवरहि त्याची छाप बसून तीहि त्याला अनुकूल होऊन राहिली. याप्रमाणें थोड्याच अवधींत त्याची राजगृहांत प्रतिष्ठा वाढून जिकडे तिकडे त्याचा बोलबाला सुरू झाला.

देवदत्त व अजातशत्रु यांचा गुरुशिष्य संबंध पुढें होतां होतां चांगला दृढ झाला. अजातशत्रु हा नित्य नेमानें त्याच्या भेटीस येऊंजाऊं लागला. देवदत्तहि मधून–मधून त्याच्याकडे खेपा घाली. अर्थात् दोघांचें प्रेम व विश्वास एकमेकांवर दृढ झाला होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अजातशत्रु पूर्ण आपल्या कह्यांत आला आहे, अशी जेव्हां देवदत्ताची पक्की खात्री झाली, तेव्हां एके दिवशीं ते दोघे एकांतांत बसले असतां सहज बोलण्यावरून बोलणें काढून देवदत्त युवराजास म्हणाला, 'युवराजा! हल्ली मनुष्याचं आयुष्य किती अनिश्चित झालं आहे! पहिल्यासारखं तें आतां राहिलं नाहीं. तें फारच कमी व अनिश्चित झालं आहे, असं तुला नाहीं कां वाटत?

**अजातशत्रु** :—होय, तसा प्रकार झाला आहे खरा.

**देवदत्त** :—पूर्वीचे लोक शतायुषी होते. पण त्यांतच आणखी कांहीं जण शंभराच्या पुढंहि मजल मारीत. पण आतां ती स्थिति राहिली नाहीं. न जाणो कोण केव्हां मरेल तें! आतांशा मनुष्याचा नेमच राहिला नाहीं बघ.

**अजातशत्रु** :—होय, देवदत्तजी! तसा कांहींसा प्रकार झाला आहे खरा. कालमहिमा म्हणावयाचा. दुसरं काय?

**देवदत्त** :—पण मला मोठी काळजी लागली आहे बाबा.

**अजातशत्रु** :—कसली?

**देवदत्त** :—कसली म्हणून काय विचारतोस? तूं राजा केव्हां होशील नि मी तें या डोळ्यानं केव्हां पाहीन, असं झालं आहे मला.

**अजातशत्रु** :—पण हें कसं शक्य आहे? देवदत्तजी! अजून पिताजी जिवंत आहेत ना? ते असे तोंपर्यंत मला राजा कसा होता येईल? तें शक्य नाहीं.

**देवदत्त** :—राजा बिंबसार म्हातारा झाला आहे खरा, पण मोठा चिवट दिसतो. मला तर मोठी धास्ती वाटूं लागली आहे. अरे, आयुष्याचा काय नेम सांगावा? कोण आधी मरेल नि कोण नंतर मरेल, हें कोणाला कसें सांगतां येईल?

**अजातशत्रु** :—मग याला उपाय काय?

**देवदत्त** :—उपाय? आहे एक. पण तूं मनावर घेशील तर.

**अजातशत्रु :**—मी काय करावं म्हणतां आपण ?

**देवदत्त :**—माझ्या मनांत एक विचार आला आहे.

**अजातशत्रु :**—तो काय ?

**देवदत्त :**—पण तूं तो अमलांत आणूं म्हणशील तर; तेवढा एकच मला तूर्त साध्य दिसतो.

**अजातशत्रु :**—अगोदर कळूं द्या तर खरं.

**देवदत्त :**—अरे, बाप तुझा आतां बोलून चालून झाला आहे म्हातारा ! अगदी पिकलेलं पान ! पण मोठा चिवट दिसतोय. लवकर मरेल असं वाटत नाहीं मला.

**अजातशत्रु :**—मरण कोणाच्या हातांतलं, देवदत्तजी ?

**देवदत्त :**—म्हणून म्हणतो कीं तूं जरा आतां हालचाल करावीस. माझं ऐकशील तर तूंच त्याला परलोकाचा मार्ग दाखवावास ! तूं ही गोष्ट कर आणि मी बुद्धाचा समाचार घेतो ! तो असे तोपर्यंत माझीहि डाळ शिजण्यासारखी नाहीं. त्याला परिनिर्वाण दाखविल्याशिवाय माझी मनीषा सफल होईल हें शक्य नाहीं. तूं बापाची वाट लाव नि मी बुद्धाचा समाचार घेतो. म्हणजे तूं राजा नि मी बुद्ध ! ! मग आणखी काय पाहिजे ? आपण दोघेहि धन्य होऊं ! जन्माचं सार्थक होईल ! कां, नाहीं पसंत हें तुला ?

**अजातशत्रु :**— पण मला भीति वाटते. नाहीं वाटत हें माझ्या हातून होईलसं.

**देवदत्त :**—अरे, यांत कसली भीति ? क्षत्रियाला हें कितीसं अवघड ! तशांत तूं अजातशत्रु ! ! मग तुला भीति कसची ? धैर्यानं पुढं हो म्हणजे झालंच काम फत्ते तुझं. आणि मीहि माझं आटपतो. एवढं धाडस कर आणि हो एकदा मगधाधीश्वर !

अजातशत्रूनें शेवटीं 'होय' या अर्थी मान हलविली. पुढें लवकरच दोघांचा कट सिद्ध झाला. अजातशत्रु आपल्या वृद्ध पित्याचा प्राण

घेण्यास तयार झाला व देवदत्त गोतम बुद्धाच्या जिवावर उठला! या कार्यांत दोघांनी एकमेकांस मदत करावी असें ठरून योग्य प्रसंगाची ते वाट पाहात बसले!!

---

# बुद्धाचें अर्थपूर्ण मौन

वत्सगोत्तसुत्त (संयुत्त निकाय, ३-१२)

भगवान कोशांबी येथून आपला मुक्काम हलवून मजल दरमजल करीत नुकतेच श्रावस्तीस येऊन दाखल झाले होते. तेथें वत्सगोत्त नांवाचा एक मोठा विद्वान परिव्राजक होता. तो वेदविद्येंत मोठा निष्णात असून आत्मज्ञानाविषयीं त्याची फार मोठी ख्याति होती. तेव्हां बुद्धाचें आत्म्याविषयीं निश्चित मत आहे तरी काय हें अजमावून पाहवें म्हणून तो त्यांच्या भेटीस आला. दोघांचें औपचारिक भाषण झाल्यावर त्यानें भगवंतास प्रश्न केला:—भदंत! आत्मा आहे काय? बुद्धांनीं या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. नुसतें मौन धारण केलें!

पुनः त्यानें दुसरा प्रश्न केला:—भदंत! आत्मा नाहीं काय?

यालाहि उत्तर नाहीं. फक्त गंभीर मौन!!

बुद्ध आपल्या प्रश्नाला 'होय ना' कांहींच उत्तर देत नाहींत. तेव्हां त्यांच्याशी पुढील चर्चा करणे व्यर्थ आहे असें समजून पुढें कांहीं न विचारतां आला तसाच तेथून उठून तो चालता झाला.

त्या वेळीं आनंद तेथें उभा होता. त्यानें तो सगळा प्रकार पाहिला व वत्सगोत्त निघून गेल्यावर तो भगवंतांना म्हणाला:—भदंत! आपण वत्सगोत्ताला कांहींच उत्तर दिलें नाहीं. तें असें कां? 'होय' नाहीं व 'ना' नाहीं. असें भगवंतांनी कां केलें?

बुद्ध:—आनंदा! मी केलें तें योग्यच केलें.

आनंद:—तें कसें काय?

बुद्ध :—पाहा, त्याच्या पहिल्या प्रश्नाला होकारार्थी उत्तर दिलें असतें तर मी शाश्वतवादी झालो असतो. म्हणजे आत्मा नित्य मानणाऱ्या श्रमण ब्राम्हणाहून माझें मत भिन्न झालें नसतें. पण मी तसा नाहीं.

आनंद :—मग दुसऱ्या प्रश्नास उत्तर देण्यास काय हरकत होती?

बुद्ध :—आनंदा! तुला वत्सगोत्ताच्या प्रश्नाची खोंच कळली नाहीं, म्हणून तूं असं म्हणतोस. त्या प्रश्नालाहि उत्तर दिलें नाहीं याचें कारण असें कीं त्याला नास्तिपक्षी उत्तर दिलें असतें तर मी उच्छेदवादी झालो असतो. अर्थात् जे श्रमण ब्राह्मण केवळ देहात्मवादी आहेत म्हणजे जे मरणोत्तर जन्म नाहीं—कांहींच नाहीं—असें म्हणणारे नास्तिक आहेत त्यांच्याहून माझें मत भिन्न झालें नसतें. पण तसें मानणारा मी नाहीं. आतां रूपादि पांच स्कंध आत्मा नव्हे, सगळे धर्म अनात्म आहेत असें सांगितलें असते तर तें माझ्या मताला धरून झालें असतें हें खरें, पण त्यामुळे वत्सगोत्त बिचारा घोटाळ्यांत पडला असता.

आनंद :—तें कसें?

बुद्ध :—तें असें. माझ्या उपदेशानें त्याला असें वाटलें असतें कीं आत्मा म्हणून कांहीं पदार्थ होता. तो या बुद्धाच्या सांगण्यावरून आतां नाहींसा झाला. हा सर्व घोटाळा चुकविण्यासाठीं म्हणून मी कांहींच न बोलतां गंभीर मौन धारण केलें. तें युक्तच होतें असें तुला नाहीं कां वाटत?

आनंदानें मान हलवून त्याला आपली मूक सम्मति दिली.

---

## राजा बिंबसाराचा बंदिवास

चुल्लवग्ग (विनय पिटक, ७–२–१)

राजगृहांत व आसपास देवदत्ताचा बोलबाला व वर्चस्व दिनेदिनें झपाट्यानें वाढत चाललें होतें. युवराज तर त्याचा अगदी परम शिष्य बनला होता. त्याची समजूत अशी होती कीं देवदत्ताची योगशक्ति

प्रचंड व अद्भुत असून त्याला त्रिकालाचें सूक्ष्म व सत्य ज्ञान आहे. योगबलानें त्याला वाटेल तें करतां येतें नि होतां येतें. अशक्य म्हणून त्याला अशी कोणतीच गोष्ट नाहीं. मनांत आणील तें तो अवश्य करीलच करील. अर्थात् त्यानें जो आपणास सल्ला दिला आहे तो योग्यच असला पाहिजे.

होय, आयुष्याचा काय नेम सांगावा? हें जें त्यानें म्हटलें तें अगदी सत्य असून, बिंबसाराच्या आधीं आपणच मरणार नाहीं कशावरून अशी जी शंका त्यानें प्रदर्शित केली, त्यांत पुष्कळ अर्थ आहे. सबब या जन्मीं राजसुख उपभोगावयाचें तर पिताजीला परलोकाचा मार्ग दाखविलाच पाहिजे. त्याशिवाय गत्यंतरच नाहीं.

बिंबासारानें राजसुख उपभोगिलें तेवढें पुष्कळ झालें. आतां तो म्हातारा झाला आहे. पण वैभवाची आशा त्याची सुटलेली नाहीं आणि ती मरणापर्यंत सुटणार नाहीं. तेव्हां देवदत्ताचा उपाय अमलांत आणल्याशिवाय माझी आशा फलित होण्यासारखी नाहीं, असें त्याच्या मनानें घेऊन, गुरूचा सल्ला कृतींत उतरविणेस तो सिद्ध झाला व प्रसंगांची वाट पाहत बसला.

पुढें एके दिवशीं त्यानें आपल्या मांडीला कट्यार बांधून घेवून, आपला उद्दिष्ट हेतु तडीस नेण्यासाठीं तो मध्यान्हीं राजाच्या शयनमंदिराकडे झपझप पावलें टाकीत निघाला. ती अपवेळ होती. त्याचा चेहरा या वेळीं जरासा प्रक्षुब्ध झाला होता. द्वारपालकांनी त्यास येतांना दुरूनच पाहिलें व त्याच्या मुद्रेवरून व चालण्याच्या ढबीवरून त्यांच्या मनांत कांहीं संशय आला व दरवाजा समीप आल्यावर आंत न सोडतां त्याला त्यानी तेथेंच रोखून धरलें.

आगाऊ वर्दी न देतां आडवेळीं अकस्मात येण्याचें कारण विचारतां युवराजाची जीभ अडखळूं लागली; त्याला चटकन् उत्तर देतां येईना. योग्य कारण वेळेवर न सुचल्यामुळें त्याचा चेहरा गोरामोरा झाला व

तो कावराबावरा झाला. यावरून त्यांना अधिकच संशय आला व ते त्यास अधिक प्रश्न विचारून छेडूं लागतांच स्वारी अधिकच घाबरली व जीभ अडखळूं लागली.

एकानें जवळ जाऊन सहज युवराजाचें अंग चांचपून पाहिलें तों गुडघ्यांत लपवून ठेविलेली कट्यार हातास लागली! 'हें काय' असें विचारतांच त्याचा चेहरा खरकन् उतरला नि बोबडी वळली! तो आपली चोरी उघडकीस आली म्हणून इतका घाबरला कीं अखेर त्यानें खरी हकीकत सरळ सांगून टाकिली! तेव्हां त्याला तेथेंच अडवून ठेवून ही बातमी आंत राजास विदित करण्यांत आली.

राजानें त्यास आंत घेऊन येण्यास सांगितल्यावरून तेथील मुख्य अधिकाऱ्यानें त्यास राजासमोर आणून उभें केलें. राजानें त्याच्यावर नखशिखांत नजर फिरवून त्यास म्हटलें 'युवराजा! माझा प्राण कशासाठीं घेणार होतास? खरं सांग.

**अजातशत्रु** :—पिताजी! मला राज्य हवें होतें. मला राजा म्हणवावयाचें होतें.

**राजा** :—त्याला हा मार्ग काय? हा उपाय तुला कोणी सुचविला?

**अजातशत्रु** :—देवदत्तानं.

**राजा** :—फार छान! मला मारून तुला राजा होण्याची इच्छा झाली व व्हावी हें फार विलक्षण आहे! तुला दुसरा मार्ग नव्हता काय?

**अजातशत्रु** :—मला तो सुचला नाहीं.

**राजा** :—मला कां नाहीं विचारलेंस? शब्द काढतास तर!

**अजातशत्रु** :—पिताजी, मला तें सुचलें नाहीं.

**राजा** :—बापाचा प्राण घेतल्याशिवाय तुला राज्य मिळण्यासारखें नव्हतें हें वेड तुझ्या डोक्यांत कसें भरलें व कोणी भरवून दिलें? कां तुझीच अक्कल ही!

**अजातशत्रु** :---राजा होण्याची माझी इच्छा. पण मार्ग दाखविला तो देवदत्तानें.

**राजा** :--तुला राजा व्हायचा आहे तर हें घे. हें राज्य तुझेंच आहे ! आजपासून तूंच त्याचा राजा ! !

असें म्हणून राजानें तावडतोब मंत्रिमंडळास बोलावून त्यांच्या समक्ष त्यानें युवराजास राज्याधिकार दिला !

अजातशत्रु राजा झाला हें खरें. पण तेवढ्यावरच त्याची शांति झाली नाहीं. न जाणो पुन: केव्हां तरी आपला अधिकार काढून घेण्याची त्याला दुर्बुद्धि झाली तर ! त्याचें मन आतां पापी बनलें होतें. या बाबतीत देवदत्ताची सल्ला घेऊन पुढें काय करावयाचें तें करावें असें मनांत ठरवून तो देवदत्तापाशी आला व आपलें अंतरंग त्यास सांगितलें. नंतर दोन दिवसांतच बिंबसाराला तुरुंगाची हवा लागली व महाराणीशिवाय इतरांस तेथें जाण्याची सक्त बंदी झाली ! !

---

## गौप्य-स्फोट

भद्रसाल जातक ४६५

प्रसेनजितचा राजपुत्र विदूरक आतां चांगला सोळा वर्षांचा झाला होता. आतांपर्यंत तो अजोळी गेलाच नव्हता. म्हणून त्याला आतां आपलें अजोळें जाऊन पाहण्याची उत्कट इच्छा झाली. नव्हे, जवळ जवळ त्यास ध्यासच लागून राहिला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

तेव्हां एके दिवशी बापाजवळ जाऊन तो हट्टच धरून बसला. व बापानें त्याचा तो हट्ट पाहून त्यास अखेर तसें करण्यास परवानगी दिली. अद्यापि त्यानें अजोळ पाहिलेंच नव्हतें.

पुढें जाण्याचा दिवस मुकरर झाल्यावर ती बातमी आगाऊ कपिल-वस्तूस कळविणेंत आली. विदूरकाच्या आईनेहि एक गुप्त दूत पाठवून

'विदूरक तेथें येणार आहे. तर त्या वेळीं आपली अंतस्थ हकीकत त्यास कळणार नाहीं अशी योग्य तजवीज व बंदोबस्त ठेवा' असा निरोप माहेरीं पाठवून दिला.

श्रावस्तीहून राजपुत्र विदूरक येणार आहे ही बातमी कपिलवस्तूस समजतांच नगर श्रृंगारण्याचें काम जोरानें सुरू होऊन, राजपुत्राचा योग्य स्वागतसमारंभ थाटण्याचा कसून उद्योग चालू झाला. थोड्याच वेळांत सर्व शहर श्रृंगारून सजविण्यांत आलें. ठरलेल्या दिवशीं विदूरक मोठ्या लव्याजम्यानिशी कपिलवस्तूस येऊन पोंचला. व त्याचें मोठ्या दरबारी थाटांत स्वागत होऊन हत्तीवरून शहरांतून मिरवीत त्याला राजवाड्यांत उतरविण्यांत आलें.

राजवाड्यांत आल्यावर शिरस्त्याप्रमाणें सर्वांच्या भेटीगांठी झाल्या व सर्व आप्तस्वकीयांची ओळख करून देण्यांत आली. तेथें कांहीं दिवस राहून त्यानें मोठ्या चैनींत व हौसेंत दिवस काढले. तेथें असे तोंपर्यंत त्याची सर्व व्यवस्था अत्यंत चोख व दरबारी थाटांत ठेवण्यांत आली होती. कशास कांहीं कमी नव्हतें. सर्व अगदी जेथल्या तेथें व जेव्हांचे तेव्हां.

मात्र एक गोष्ट त्यास मोठी चमत्कारिक वाटली. ती म्हणजे ही. सोळा वर्षांखालचें एकहि मूल त्यास आढळलें नाहीं. सर्व माणसें जीं दिसतील तीं सोळा वर्षांच्यावरचीं, म्हणजे त्याच्यापेक्षांहि वडील. या सर्वांना वडील म्हणून नमस्कार करणे त्याला भागच होतें व तें त्यानें उत्तम रीतीनें पार पाडलें. पण गम्मत ही कीं त्याला मात्र नमस्कार करणारा कोणीच भेटेना ! हा प्रकार त्याला कसासाच वाटला. शाक्यांनी ही घटणा मुद्दाम घडवून आणली होती. पण त्यांतील खरें मर्म त्यास कळण्यासारखें नव्हतें. त्याला नमस्कार करणें हें शाक्यांना कमीपणाचें वाटत होतें, हेंच तें मर्म होय.

कांहीं दिवस राहून आजोळीचा पाहुणचार मनसोक्त घेतल्यावर तेथून परतण्याचा आपला बेत त्यानें राजास कळविला. आणि राजानें त्यास आपली सम्मति दिली. पुढें जाण्याचा दिवस उजाडला. त्या दिवशीं थाटाचा भोजन समारंभ होऊन सर्वांची पुनः एकदां भेटीगांठी होऊन आशिर्वाद वगैरे झाल्यावर त्याला प्रेमाचा निरोप देण्यांत आला.

' तो वाड्यांतून बाहेर पडल्यावर ज्या पाटावर तो जेवावयास बसला होता तो पाट एका दासीनें उचलून दूधपाण्यानें धुऊन स्वच्छ करण्यास सुरुवात केली. हा प्रकार विदूरकाच्या एका अधिकाऱ्यानें पाहिला व तिला तसें करण्याचें कारण विचारलें. तेव्हां ती म्हणाली 'तुमचा युवराज हा अस्सल राजकन्येचा पुत्र नसून दासीपुत्रीचा पुत्र आहे ! अर्थात् हा त्याचा पाट विटाळलेला आहे ! सबब तो दूधपाण्यानें धुऊन शुद्ध करून घेते !!' ही गोष्ट ती दासी सहज बोलून गेली. पण त्याचा परिणाम पुढें काय अनर्थावह होईल हा पोंच मात्र तिला राहिला नाहीं. तिच्या तोंडचे ते शब्द ऐकून त्या अधिकाऱ्याच्या मनांत एकदम चर्र झालें व तो पुढें ती हकीकत विदूरकास येऊन श्रुत करता झाला. विदूरकाच्या कानावर ती हकीकत जाऊन पडतांच तो रागानें लालेलाल झाला. व त्या आवेशांत तो थाडकन् उद्गरला :—अस्सं काय ? पुढं पाहून घेईन. मीं विटाळलेला पाट दूधपाण्यानें तिला आतां शुद्ध करून घेऊं दे. पण मी जेव्हां राजा होईन त्या वेळीं तो पाट पुनः शाक्यांच्या रक्तानें धुऊन काढीन, तरच नांवाचा विदूरक !

आतां हें गौड बंगाल काय आहे हें समजण्यास वासव क्षत्रिया इची पूर्व हकीकत येथें सांगितली पाहिजे. वासव क्षत्रिया ही बुद्धांचा चुलत भाऊ महानामा म्हणून होता त्याची मुलगी. पण ती औरस नव्हे. दासीपासून झालेली, अर्थात् ती दासीपुत्री होती.

प्रसेनजित् राजाची जेव्हां कन्या देण्यास मागणी आली तेव्हां शाक्य लोकांत मोठी खळबळ उडाली. त्यांना आपल्या जातीचा अत्यंत अभिमान होता. ते आपली मुलगी सहसा जातीबाहेर देत नसत. पण प्रसेनजित्च्या या मागणीपुढें त्यांना मोठा पेंच प्रसंग येऊन पडला. तो सार्वभौम असल्यामुळें त्याच्या मागणीला उघड नकार देण्याचें धैर्य व धाडस त्यांच्यांत नव्हतें. म्हणून वेळ मारून नेण्याकरतां सार्वभौमाची मर्जी सांभाळावी असें अखेर त्या शाक्य महाजन सभेंत ठरलें व पुढें राजकन्या म्हणून तिचा प्रसेनजित्शी विवाह करून देणेंत आला.

खरी वस्तुस्थिती काळजीपूर्वक या वेळपर्यंत गुप्त ठेवण्यांत आली होती. दासीला त्याचें भान न राहून ती सहज वरीलप्रमाणें एकदम बोलून गेली व पुढें त्याचा परिणाम फार भयंकर झाला.

---

## देवदत्ताचा दुष्टावा

(चुल्लवग्ग ७-२-२ विनयपिटक)

देवदत्ताचा राजगृहांत आतां केवढा बडेजाव ! नि काय त्याचें वर्चस्व ! तो सांगेल ती पूर्व दिशा आणि म्हणेल तें वेदवाक्य !! अजातशत्रु हा मगध देशाचा राजा खरा, पण देवदत्ताच्या हातांतील तो नाचवील तसें नाचणारें बाहुलें व बोलवील तसें बोलणारा पोपट झाला होता ! देवदत्ताच्या सल्ल्याशिवाय राज्यांतील पानहि हलत नव्हतें कीं इकडची काडी तिकडे होत नव्हती !! जवळ जवळ तो सर्वाधिकारीच झाला होता असेंच कां म्हणा ना !!

एके दिवशीं तो अजातशत्रु जवळ येऊन म्हणाला :–राजा ! आतां मला माझें कार्य तडीस नेण्यास मदत कर. मला कांहीं विश्वासू लोक मिळवून दे व मी सांगेन तें करण्यास त्यांना आज्ञा कर.' अजातशत्रूनें

'होय' म्हणून आपल्या दूताकडून एक विश्वासूक मनुष्य आणवून त्याला देवदत्त जें काय सांगेल तें काम फत्ते करून येण्याचा सक्त हुकूम देऊन त्यास देवदत्ताकडे पाठवून दिलें.

देवदत्तानें त्यास एकांतात नेऊन म्हटलें की 'ये मित्रा ! माझी कामगिरी यशस्वी करून ये,म्हणजे तुझ्या जन्माचें दारिद्र्य दूर करीन.' 'ती कोणती कामगिरी ?' तो मनुष्य म्हणाला, 'देवदत्तजी ! अशी कोणती महत्त्वाची कामगिरी आपण सांगणार मला ?' 'कामगिरी तशी म्हणण्यासारखी विशेष कांहीं नाहीं,' देवदत्त उत्तरला, ' मात्र नाजूक आहे. थोडें क्रौर्य आहे त्यांत. पण धोका काहीं नाहीं तुला.'

**तो मनुष्य** :—अशी कोणती कामगिरी ती आपण सांगा ना ?

**देवदत्त** :— कामगिरी ती एवढीच. श्रमण गोतम हे तुझ्या माहितीचे आहेतच. ते वेळुवनांत आहेत आतां.

**तो** :—होय, मग पुढें ?

**देवदत्त** :—तेथें जाऊन त्यांचा प्राण घेऊन यायचा ! फार सोपी गोष्ट आहे. सहज तुला साध्य आहे. बरोबर कांहीं माणसं घे. आणि हें काम फत्ते करून ये !

**तो** :—महाराज ?

**देवदत्त** :—मला समजलं तूं काय म्हणणार आहेस. पण घाबरण्याचं एवढं कारण नाहीं, आणि हें लक्षांत ठेव की एवढं काम तूं फत्तें करून आलास म्हणजे तुला बक्षीसहि पण तितकंच मोठं मिळेल. तुझ्या जन्माचं दारिद्र्य दूर होईल. राजाकडून मी तुझा चांगला सन्मान करवीन.

बोलून चालून बेरडच तो ! लोकांचे प्राण घेऊन उदर निर्वाह करण्याचा त्याचा धंदाच ! मग या गोष्टीला त्यानें मान हालविली असली, तर त्यांत आश्चर्य तें काय ? होय, त्यानें ती गोष्ट आनंदानें पत्करली. देवदत्ताकडून इतकी फूस व एवढें आश्वासन मिळाल्यावर

मग आणखी काय पाहिजे ? त्याला स्वर्ग दोनच बोटें राहिला !! 'होय, गुरुमहाराज ! आपण सांगितलेली कामगिरी मी अगदी अवश्य करून येईन ! आपण अगदी निःशंक असा ! !'

इतकें बोलून तो तेथून उठला नि तडक घरीं आला. तेथें आल्यावर आपल्या साथीदारांस बोलावून घेऊन त्यांना घडलेली हकीकत सांगितली व पुढील तयारीस लागण्याची सूचना दिली. तीस एक बेरड तयार झाले. धनुष्य खांद्यावर टाकून, बाणाचा भाता पाठीवर आणि हातांत तलवार घेऊन ही तीस लोकांची फौज गुरुमाउलीच्या—त्या कामधेनूच्या—शिकारीस सुसज्ज होऊन निघाली !

सांकेतिक स्थळीं आल्यावर बुद्धदेव त्या कसायांच्या नजरेस पडले. त्या वेळीं ते एकटेच असून बाहेर सहज फिरत चालले होते. त्या दुष्टांनी त्यांस दुरूनच पाहिलें. त्यासरशीं त्यांचा जो म्होरक्या होता, त्यानें सपकन् म्यानेतून तलवार उपसली व जोरानें स्वारी भगवंतावर चालून गेली !

तों इतक्यांत बुद्धदेवांची नजरहि त्यांच्यावर गेली. देवांनीं तो प्रसंग तत्क्षणीं ओळखिला. व न डगमगतां त्या लोकांवर अशी कांहीं दृष्टि रोखिली कीं ते सर्व बेरड जेथल्या तेथें खिळले गेले ! त्याचें शरीर खांबासारखें ताठून पुतळ्याप्रमाणें तटस्थ राहिलें ! हात हलेना कीं पाऊल पुढें पडेना !! भगवंताची ती गंभीर व तेजस्वी मुद्रा पाहून त्यांनी चटकन् आपले डोळे मिटले !! ते सर्व मारेकरी मनांत मनस्वी घाबरले ! भयभीत झाले ! गर्भगळित होऊन चळचळ कांपूं लागले !!

भगवंतांना त्यांचें मनोदय कळून चुकलें. नंतर त्यांनीं त्यांवर प्रेम-कटाक्ष टाकून त्यांच्या म्होरक्यास म्हटलें कीं 'मित्रा ! घाबरूं नकोस ! लोक हो, भयभीत होऊं नका !' या भाषणानें त्यांच्या शिलारूप बनलेल्या शरीरांत पुन्हा नव चैतन्य संचारून त्यांच्या प्राणांत प्राण आला.

पण आतां ते पूर्वीचे मारेकरी राहिले नव्हते ! त्यांची खुनशी व दुष्ट बुद्धि जेथल्या तेथेंच विरघळून जाऊन हातातील खड्ग आपोआप गळून खालीं पडलें ! त्यांचा जो म्होरक्या होता तो हळूंच त्यांच्याजवळ गेला आणि त्यांना साष्टांग नमस्कार घालून उठून हात जोडून उभा राहिला !! क्षणभर त्याच्या तोंडातून शब्दहि निघेना !!

नंतर तो म्हणाला 'भदंत ! आम्ही मोठे अपराधी आहोत ! दुष्ट व खुनशी आहोत ! आपणास ठार मारावे या इराद्यानें आम्ही येथें आलो होतो ! पण चमत्कार हा कीं आम्हाला आपलें दर्शन घडलें आणि आमचा दुष्ट हेतु पार वितळून गेला !! आम्हांला पश्चात्ताप झाला आहे ! भगवंतांनी आम्हांस क्षमा करावी व आमचा अपराध पोटांत घालावा ! आपण जगन्माऊली आहा ! पुनः आम्हांस अशी बुद्धि न होईल असा आम्हांवर अनुग्रह करावा !! आपल्या दर्शनानें आम्ही शुद्धीवर आलों असून पुनीत झालों आहोत. तर देवा ! आम्हास धर्मोपदेश करून आमचा उद्धार करा ! आम्ही भगवंतास शरण आलों आहोत. आमचा स्वीकार करून आपल्या शिष्यगणांत आम्हांस सामील करून घ्यावें !!' असें म्हणून त्या सर्व बेरडांनीं भगवंतांस साष्टांग नमस्कार घातला !!

हें त्याचें भाषण ऐकून व उपरति पाहून गुरुदेवांना आनंद झाला व त्यांनी तेथेंच त्यांना यथोचित धर्मोपदेश करून परत पाठवून दिलें. याप्रमाणें भगवंतास ठार मारावयास आलेले मारेकरी अखेर त्यांचे उपासक बनून घरीं आले आणि देवदत्तास भेटून म्हणाले कीं, 'देवदत्तजी ! तुमचा हेतु तडीस नेणें हें आमच्यानें शक्य नाहीं ! भगवंतांची योगमाया अतर्क्य व दुर्दमनीय आहे !!'

---

# आयुर्वेदाचार्य जीवक कुमार

महावग्ग ८-१-१

प्राचीन काळीं गणिकेचा दर्जा समाजांत उच्च प्रतीचा होता अगर असावा असें मानण्यास पुष्कळ जागा आहे. राजधानीचें वैभव वाढविण्यस त्या भूषणीभूत मानल्या जात असत. राजधानीचें महत्व त्यांच्या अस्तित्वावर अवलंबून असे. राजकारणांतहि त्यांचें कमी-अधिक मानानें अंग असे. त्या नसल्या तर राजवाड्याला व राजदर-बाराला शोभाच नाहीं असा त्या वेळीं लोकसमज होता. उदाहरणार्थ वैशालीची अंबपाली व राजगृहाची सालवती या गणिका बौद्धकाळीं मोठ्या प्रतिष्ठावंत असून फार नांवाजलेल्या होत्या.

त्यांतल्या त्यांत राजगृहाची सालवती गणिका तर फार प्रसिद्धि पावलेली होती. ती अत्यंत सुंदर असून श्रेष्ठ दर्जाची कलावंतीण होती. तिची राहणी व थाटमाट एकंदरींत फार उच्च प्रतीचा असून राज-धानींत तिचें प्रस्थ फार मोठें होतें. गीत, वाद्य व नृत्य या कलांत ती अत्यंत निष्णात असून तिच्या घरीं राजे व दरबारी लोकांचा सराव फार मोठा असे. असें सांगण्यांत येतें कीं तिचा एका रात्रीचा दर शंभर सुवर्ण मुद्रा असे ! तिच्याच पोटीं प्रसिद्ध आयुर्वेदाचार्य जीवक कुमार हा जन्मास आला ! अर्थात् तो वेश्यापुत्र होता.

सालवती गरोदर झाली त्या वेळीं ती अभय राजकुमाराच्या ताब्यांत होती. त्याचें बालपण सगळें राजैश्वर्यांतच गेलें. पुढें तो मोठा झाल्यावर त्याच्या मनांत असा विचार आला कीं, आपण राजैश्वर्यांत सांप्रत काळ काढीत असलों तरी आपण वेश्येच्या पोटीं जन्मास आलो असल्यामुळें पुढें बापाच्या संपत्तीवर आपला कांहीं वारसा हक्क पोचूं शकत नाहीं. सबब तेथें राहून पुढें क्षुद्र जीवन कंठण्यापेक्षां आतांच बाहेर पडून विद्या व कला संपादन करून स्वतःच्या कर्तबगारीवरच मान व प्रतिष्ठा प्राप्त करून घ्यावी, यांतच खरें पौरुष आहे. असा

विचार करून तो एके दिवशीं संधि साधून घरातून बाहेर पडला व त्या वेळीं सकल विद्या-शास्त्र-कला यांत प्रसिद्ध असलेल्या तक्षशिला येथें पायी प्रवास करून दाखल झाला.

तेथें गेल्यावर त्याच्या मनांत आयुर्वेदशास्त्राचें अध्ययन करण्याचें आलें. म्हणून तो तेथील विद्यापीठांत आत्रेय नांवाचा जो मुख्य अध्यापक होता, त्याच्याजवळ गेला व त्याला भेटून त्यानें आपली मनीषा कळविली.

ती ऐकून घेऊन तो आत्रेय त्याला म्हणाला 'मुला, मी तुला उत्तम विद्या शिकवून आयुर्वेद विशारद करीन खरें. पण तूं मला त्याबद्दल काय देणार तें बोल.'

'आचार्यजी !' जीवक म्हणाला 'मी अगदी गरीब—निर्धन—विद्यार्थी आहे. आपल्याला द्यावयास मजजवळ द्रव्य मुळींच नाहीं. पण आपण मला विद्या शिकविली तर मी आपला आजन्म ऋणी होऊन आपला सेवक होऊन राहीन !'

आत्रेय आचार्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें व त्यास जवळ ठेवून घेऊन त्यास आयुर्वेद शिकविण्यास प्रारंभ केला. जीवक हा वेश्यापुत्र होता तरी त्याची बुद्धि कांहीं मंद नव्हती. जवळ जवळ तो एक-पाठीच होता. इतकी त्याची बुद्धि तैल व तीक्ष्ण होती.

सात वर्षें तेथें राहून चिकित्सा शास्त्रांत त्यानें अत्यंत नैपुण्य मिळ-विलें. जवळ जवळ गुरूच्या तोडीचाच तो आयुर्वेदविद्येंत पारंगत बनला !

त्याची परीक्षा पाहवी म्हणून एके दिवशी आत्रेय गुरुजी त्यास जवळ बोलावून म्हणाला 'जीवका, या विद्यालयाच्या संभोवती किती तरी झाडझुडपें, लता—वनस्पती लाविलेलीं व उगवलेलीं आहेत. तर तेथें जाऊन सर्वत्र फिरून औषधाला उपयोगी नाहींत अशा किती वनस्पती व झाडझुडपें आहेत याचा एकदां तपास करून मला सांग !

'ठीक आहे, गुरुदेव !' असें म्हणून जीवक तेथून उठला व दर-रोज त्या उपवनांत फिरून तेथील प्रत्येक झाड, लता, वनस्पती शोधून तपासून पाहूं लागला. याप्रमाणें कांहीं दिवस गेल्यावर त्याचें तेथील वनस्पती निरीक्षणाचें काम संपलें.

नंतर गुरुजी जवळ येऊन म्हणाला 'गुरुदेव ! औषधाला उपयोगी नाहीं अशी एकहि वनस्पती अगर झाड मला तेथें आढळलें नाहीं. कोणत्या ना कोणत्या तरी प्रयोगांत त्यांचा अवश्यमेव उपयोग होतोच होतो.'

हें त्याचें भाषण ऐकून आत्रेयास महदानंद झाला व तो त्याच्या डोक्यावर हात ठेवून म्हणाला कीं 'शिष्यश्रेष्ठा ! तुझें कल्याण असो ! शाबास तुझी ! तुझ्यासारखा हुषार विद्यार्थी मीं अजून पाहिलाच नाहीं. जा, बेटा ! आतां घरीं जा. आणि तुझ्या विद्येचा लाभ जे रोगानें व आधीव्याधीनें दु:खी कष्टी झाले असतील त्यांना अवश्य होऊं दे ! तूं नामांकित वैद्य होशील ! हाच माझा आशीर्वाद तुला ! ! जा, आतां परत घरीं जा. आणि दु:खितांचें दु:ख निवारण करीत सुखानें संसार कर ! !'

गुरूची आज्ञा घेऊन वैद्यशास्त्रांत पारंगत झालेला जीवक आतां आश्रमांतून बाहेर पडला व घरीं येतांना वाटेंत जे कोणी रोगी व व्याधिग्रस्त भेटतील त्यांना औषधपाणी देत देत व त्यांचे रोग बरे करीत करीत काशी, अयोध्या वगैरे शहरांत प्रसिद्धि मिळवून अखेर तो राजगृहांत आला.

तेथें राजा बिंबसार हा त्या वेळी भगंदर रोगानें पीडित झाला होता. पुष्कळ प्रसिद्ध प्रसिद्ध वैद्यांनीं येऊन, त्याला पाहून नाना तऱ्हेचे उपचार करून पाहिले. पण रोग कांहीं मागें हटण्याचें लक्षण दिसेना ! शेवटी त्यांनीही अखेर हात टेकले. राजाचें जीवित अस्थिर व अनिश्चित झालें. राजवाड्यांत चिंताजनक वातावरण पसरत चाललें.

तों इतक्यांत जीवकाचा लौकिक राजाच्या कानावर आला. तेव्हां त्यानें त्यास बोलावून घेऊन उपाययोजना करण्यास सांगितलें. जीवकानें रोगाची सर्व हकीकत ऐकून घेऊन, रोगाचें योग्य निदान बांधून त्यावर उपचार चालविला. आणि चमत्कार हा कीं तो रोग राजाचा पुढें लवकरच मागें हटला व प्रकृति सुधारत चालली. कांहीं दिवसांनंतर राजाची प्रकृति पूर्ण निवळून तो पूर्वीप्रमाणें सशक्त व निरोगी झाला. ही हकीकत राजाच्या बंदीवासापूर्वीची आहे.

या सुयशामुळें त्याची इतकी प्रसिद्धि वाढली कीं दूरदूरचे राजेलोक सुद्धां बिंबसाराला पत्रें पाठवून जीवकाला आपल्याकडे मागवून घेऊं लागले. असाच एक प्रसंग पुढें लवकरच उज्जनीच्या राजाचा घडला.

तेथील राजा चंडप्रद्योत हा पांडुरोगानें पछाडला होता. प्रकृति अगदी तोळामासा झाली होती. मानवी सर्व उपाय थकले होते. अशा निराशाजनक स्थितींत जीवकाचा लौकिक त्याच्या कानावर आला. आणि बिंबसाराला पत्र लिहून त्याला आपल्याकडे आणविलें. जीवकानें तेथें कांहीं दिवस राहून राजाचा रोग बरा केला.

राजानें संतुष्ट होऊन त्याचा दरबारांत मोठा गौरव केला व 'आयुर्वेदाचार्य' ही बहुमानाची त्यास पदवी बहाल केली. याप्रमाणें जीवकाची जगभर प्रसिद्धि झाली. पुढें तो भगवान बुद्धांचाहि चिकित्सक बनला व त्यांच्या संघांतील अजारी भिक्षु–भिक्षुणींला भेटून त्यांचें औषधपाणी तोच पाहूं लागला.

---

# बिंबसाराचा शोचनीय अंत

अट्ठकथा

तुम्ही कांही म्हणा राजेलोकांचें स्वार्थी अंत:करण–तशांत राज्य लोभी राजाचें पापी अंत:करण–आंतून किती कठोर व निर्दय-आणि तसेंच भीरु व संशयग्रस्त असतें, याबद्दल आजच कांही नव्यानें सांगितलें पाहिजे अशांतला कांहीं भाग नाहीं. त्याला इतिहासाची भक्कम साक्ष भरपूर आहेच आहे. फार लांब कशाला, अजातशत्रूची गोष्टच घ्या. राज्य मिळविण्याकरतां त्यानें काय काय साहस केलें हें वाचून सहृद अंत:करणाला पीळ पडल्यावाचून राहत नाहीं. देवदत्ताच्या दुष्ट सल्ल्यानेंच कां होईना, राज्यलोभाला स्फूर्ति मिळताच अजातशत्रु हा राक्षसापेक्षांहि राक्षस व दगडापेक्षांहि कठोर झाला ! मुलगा खरा पण राज्यलोभाला बळी पडून प्रत्यक्ष बापाचा खून करण्यापर्यंत त्यानें मजल मारली ! तो प्रसंग टळला, ही गोष्ट निराळी. पण त्याची तयारी होती, हें कांहीं खोटें नाहीं. राजघराण्यातील स्वार्थी, लोभी, मत्सरी व महत्वाकांक्षी लोक काय वाटेल तें पाप करण्यास–वाटेल तें साहस व अत्याचार करण्यास–कसे तयार होतात ही गोष्ट या अजातशत्रूच्या उदाहरणावरून चांगली स्पष्ट होते. ते नीतीकडे पाहत नाहींत व नात्याची चाड ठेवीत नाहींत. मग तो पाठचा भाऊ असो वा जन्मदाता बाप असो ! तो प्रश्न त्यांना शिवतच नाहीं !

राज्यलोभामुळें स्वत:चा खून करावयास आलेल्या मुलानें आपली इच्छा प्रकट करतांच, त्या उदार बापानें–मगधाधीश्वर बिंबसारानें–तेव्हांच्या तेव्हां व तेथल्या तेथें राज्यपद सोडून देऊन, आपल्या मुलाची इच्छा तृप्त केली. पण येवढ्यानें त्या मुलाचें समाधान न होतां त्याच्या पापी मनांत भलतीच शंका उद्भवून, तिच्या परिशमनार्थ त्या प्रेमळ नि उदार बापाला त्यानें तुरुंगाची हवा दाखविली ! एवढ्यावरच भागतें तर आम्हांस हें प्रकरण लिहिण्याचें कारण पडतें

ना. पण पापी लोकांचें अंतःकरण संशय पिशाचाने कसें व किती पछाडलेलें असतें हें मग जगास कळणार कसें? आणि तशांत त्या भ्रष्ट देवदत्ताचा द्वाड सल्ला! 'जो पर्यंत बिंबसार जिवंत आहे तोंपर्यंत तुझें सिंहासन स्थिर व शाश्वत आहे, असें तूं समजूं नकोस. केव्हां वेळ उलटेल आणि केव्हां तुझी उचलबांगडी होईल, याचा कांहीं नेम सांगतां यावयाचा नाही. म्हणून तूं शहाणा झालास तर आतां विलंब न करतां शक्य तितक्या लवकर म्हाताऱ्याचा कांटा काढून टाक! तरच तूं निर्धास्त व निर्भय होशील. तोपर्यंत तुझें राज्यपद डळमळीत व जीव धोक्यांत आहे हें विसरूं नकोस,' अशा प्रकारचा सल्ला त्या भोंदू गुरूने—देवदत्ताने—त्यास दिला!

मग काय? आधींच पापी मन, तशांत संशय पिशाचानें पछाडलेलें, आणि तशांतच त्या कावेबाज धर्मगुरूचा हा असा राक्षसी सल्ला! मग आतां आणखी काय पाहिजे? त्या अजातशत्रूला मग रात्रीं झोंप कशी येणार व दिवसा चैन कोठून पडणार? नाहींच पडली नि नाहींच पडायची ती! त्यास बापाची—तो तुरुंगांत असला तरी— मोठी भीति वाटूं लागली. आणि तो मोठ्या विवंचनेंत पडला. पुढें रात्रंदिवस विचार करून अखेर त्यानें एक युक्ति शोधून काढली.

तिचा फलितांश म्हणजे बिचाऱ्या बिंबसाराची उपासमार! केवढा दुष्ट तो! तो अजातशत्रु! किती कठोर! शेवटी त्यानें त्या म्हाताऱ्या बापाची ब्याद चुकविणेसाठीं म्हणून त्याचें अन्नहि तोडलें! म्हातारा म्हणजे काय? ऐंशी उलटलेला! चांगलें पिकलेलें पान! शरीर खंगलेलें व शक्ति थकलेली! तशांत बंदिवास! आणि तशांतच आतां ही दोन प्रहरची भ्रांत!! मग काय झालीं असेल त्याची स्थिति हें आज लेखणीनें लिहून वाचकांना समजणार कसें? असो. फक्त एका महाराणीशिवाय तेथें इतरांस जाण्यास सक्त बंदी झाली. बिचारी कोसला-देवी! आपल्या वृद्ध पतीची—त्या मगधराजेश्वराची—ती हलाखीची

करुणारव स्थिति पाहून त्या सतीचे कोमल मन दु:खाने भडकून व अंत:करण शोकानें करपून गेलें ! करणार काय ? राजमहिषी खरी ! पण आतां तिला कुत्रा सुद्धां विचारीत नव्हता ! तथापि कसें बसें करून आपल्या वस्त्रांत अन्न चोरून आणून ती पतीस पुरवीत असे. पण पुढें अजातशत्रूस तिचा संशय आल्यावरून त्याने तिला पतीकडे जातांना फक्त ती एकवस्त्राच असली पाहिजे असा निर्बंध घातला ! तरी ती सती अंगाला अन्नलेपन करून आणून म्हाताऱ्याची क्षुधा शमवूं लागली. पण अज्ञानें प्राण किती दिवस टिकणार ? बिचारा अन्न-अन्न करीत तो पुढें सारखा माशाप्रमाणे तळमळूं लागला ! आणखी तशांतच पुढें पाणीहि बंद करण्यांत आलें ! झालें, आतां अन्नहि नाहीं व पाणीहि नाहीं !! महाराणीलाहि मज्जाव झाला !! पुढें लवकरच यमराजाला त्याची दया आली आणि तो मगधाधीश्वर—म्हातारा महात्मा बिंबसार—अन्न-अन्न, पाणी-पाणी म्हणून धडपडत व तळमळत शेवटी मृत्यूच्या आहारीं जाऊन पडला ! ! ! शिव शिव ! केवढा शोचनीय अंत हा ! ! !

भगवान बुद्धाचा मुक्काम त्या वेळीं तेथेंच वेळुवनांत होता. अजातशत्रूची ही दुष्टाई व कारवाई पाहून व बिंबसाराचा तुरुंगात झालेला शोकजनक अंत ऐकून त्यांना मनस्वी खेद झाला व पुढें ते तेथून लवकरच आपला मुक्काम हलवून श्रावस्तीच्या मार्गास लागले.

---

## प्राणावर बेतलें पण बोटावर गेलें

चुल्लवग्ग-७-२-३

पुढें थोडक्याच दिवसाची गोष्ट. अगदीं पहाटेची वेळ. पूर्ण उजाडलें नव्हतें. अंधुक अंधुकच दिसत होतें. माणसें रस्त्यावर फारशीं फिरकत नव्हतीं. अशा वेळीं एक माणूस गृध्रकूट डोंगराकडे एकटेंच चाललें होतें. तें खालीं मान घालून झपझप पावलें टाकीत झरझर

चालत निघालें होतें. मनांत कसला तरी गंभीर विचार चाललेला असावा, असें त्याच्या एकंदर चालण्याच्या ढबीवरून व त्याच्या क्षणोक्षणी बदलणाऱ्या मुद्रेवरून कोणालाहि स्पष्ट समजून येण्यासारखें होतें.

येतांयेतां तें माणूस गृध्रकूट डोंगराजवळ आलें. तेथें आल्यावर क्षणभर उभें राहून सभोंवार दृष्टि फिरवून 'हं, ही जागा चढण्यास बरी आहे' असें पुटपुटून तें तेथून डोंगर चढावयास लागलें.

अर्थात् तो डोंगर फार उंच व खडा असून चढण्यास फार अवघड होता. लहान मोठ्या शिला इतस्ततः अस्ताव्यस्त पडलेल्या असल्यामुळें व मधून मधून जेथें तेथें कांटेरी झुडुपांचें जाळें दाट पसरलें असल्यामुळें फार खबरदारीनें तो चढावा लागे. हळुहळू एक एक पाऊल पुढें टाकीत टाकीत माथा गांठावयास त्या माणसाला अर्धा पाऊण तास लागला. कसें बसें धापा टाकीत टाकीत अखेर तें एकदाचें माथ्यावर येऊन दाखल झालें.

माथ्यावर गेल्यावर चढण्याचे श्रम झाल्यामुळें हुश करून तें एका शिळेवर बसलें व चौबाजूस दृष्टि फिरवून आसमंतातील प्रदेशाकडे एकवार निरीक्षण करूं लागलें. बालरवि नुकताच कोठें क्षितिजावर डोकावत होता. त्याचीं आरक्त किरणें गिरिशिखरावर व आकाशांतील ढगांवर पडून सृष्टीला अपूर्व शोभा आली होती. डोंगरमाथ्यावरील गार वाऱ्याची मंद व मधुर झुळुक शरीरास व मनास सुखवीत व आल्हादवीत होती. खालीं वर पाहवें तेथें प्रसन्न वातावरण सर्वत्र खुलून राहिलें होतें.

असा जरी तेथील प्रसन्न देखावा व उल्हासजनक वातावरण होतें तरी त्या माणसाचें तिकडे लक्ष होतें असें दिसलें नाहीं. शिळेवर बसून कसला तरी गहन विचार चालला होता त्याचा. पण त्याच्या मनांत काय होतें कोण जाणे !

याप्रमाणें कांहीं वेळ तेथें बसून विश्रांति घेतल्यावर पुनः एकवार समोवती दृष्टि फिरवून अखेर पायथ्याखालीं नजर रोखिली. पायथ्यापाशी उजवीकडे एक रस्ता गेला असून त्या बाजूला डोंगराचा कडा तुटलेला होता. व त्या ठिकाणीं रस्ता अगदीं कड्याला चाटून गेला होता. तिकडे तें माणूस वळलें आणि हळुहळू डोंगराची उतरण उतरत उतरत अर्ध्या उतरणीवर आलें.

तेथें कांहीं वाटोळ्या शिळा पडलेल्या होत्या. तेथें उभें राहून त्यानें पुनः एकदां त्या रस्त्याकडे पाहिलें. 'ठीक आहे' असें म्हणून तेथें पडलेल्या शिळांपैकीं आपणास सहज हलवितां येईल अशी एक वाटोळी शिळा पसंत केली, व तेथेंच रस्त्यावर दृष्टि रोखून येणाऱ्या जाणाऱ्या माणसांकडे पाहात कांहीं वेळ उभें राहिलें.

इतक्यांत एक माणूस त्यास दिसलें. त्याच्यामागें आणखी दोन तीन माणसें दिसलीं. पुढील माणूस कड्याजवळ येत आहे असें पाहतांच त्यानें ती शिळा हलवून जोरानें खालीं लोटून दिली ! झालें. वेगानें ती उतरणीवरून घडघडत खाली निघाली. पण मधेंच वाटेतील एका शिळेवर जाऊन धाडकन् आपटली, व त्या धक्क्यानें भंग पावून तिचे तुकडे तुकडे झाले.

त्यांपैकीं एक तुकडा—चांगला मोठा होता तो—घडघडत खालीं जाऊन धाडकन् त्या रस्त्यावरील माणसाच्या पायावर नेमका येऊन आदळला ! त्यासरशीं त्याच्या पायाचा आंगठा चेंगरला व त्यांतून रक्त वाहूं लागलें ! बरी वेळ होती. नाहीं तर तें माणूसच गारद व्हावयाचें !!

त्या माणसानें खालीं वांकून आंगठा चेपून धरिला; पण जखम जबर झाली असल्यामुळें रक्तस्राव कांहीं थांबला नाहीं. वांकूनच त्यानें वर मान करून पाहिलें तों त्यास तेथें कोण दिसलें ? 'देवदत्ता !' त्यानें ओरडून म्हटलें 'तूं फार मूर्ख आहेस ! दुष्ट आहेस ! अधम आहेस ! तथागताच्या बोटांतून दगड पाडून रक्त काढण्याचें साहस व पातक

केलेंस याचें प्रायश्चित्त तुला मागें पुढें केव्हां तरी भोगावें लागेलच, हें निश्चित समज ! तुझें हें कृत्य अत्यंत पापमय आहे ! !

एवढें बोलणें होत आहे तो इतक्यांत मागचीं माणसें त्याच्याजवळ आलीं. त्यांना उद्देशून तें माणूस म्हणालें 'आनंदा ! तो पहा देवदत्त ! तेथें डोंगरावर उभा आहे. मला जिवें मारावें म्हणून त्यानें माझ्यावर शिळा लोटून दिली ! अशा रीतीनें तथागताचा प्राण घेणें हें ब्रह्मदेवालाहि शक्य नाहीं ! दांडगाई अथवा घातपात करून तथागताचा प्राण कोणीहि घेऊं शकणार नाहीं ! तथागत मरेल तो योग्य वेळींच मरेल आणि तेंहि आपल्या इच्छामरणानेंच मरेल ! ! '

वाचक हो, तें डोंगरावरील मनुष्य कोण हें उघड सांगण्याची आतां अवश्यकता राहिली काय ? बुद्ध भगवंतानी ती गोष्ट खुद्द आपल्या तोंडानेच उघड बोलून दाखविली आहे. अखेर देवदत्ताची ही युक्तिहि फसली ! व तोंड हिरमुसलें करून चोराप्रमाणें हळूच त्यानें तेथून पळ काढला !

नंतर भगवंतांनी भिक्षूंस त्या देवदत्तास उद्देशून म्हटलें:—भिक्षुहो,

**'इध तप्पति पेच्च तप्पति पापकारी उभयत्थ तप्पति ।**
**'पापं मे कतं' ति तप्पति भिय्यो तप्पति दुग्गतिं गतो ॥'**

धम्मपद १–१७

पापी मनुष्य इहलोकीं दुःख भोगितो व परलोकीं दुःख भोगितो. उभय लोकींहि तो दुःख अनुभवतो. 'मी हें वाईट केलें' हा विचार जेव्हां त्याला सुचतो तेव्हां तो दुःखी होतो. आणि जेव्हां तो नरकास जातो तेव्हां तर तो अधिकच दुःखी होतो !

गृध्रकूटाजवळ झालेल्या अपघातानें भगवंतांचा पायाचा आंगठा चेंगरून रक्तबंबाळ झाला ही हकीकत घडल्यावर पुढें ती जखम इतकी चिघळली कीं जवळ जवळ तो आंगठाच अगदीं निकामी झाला. पुढें बुद्ध वेळुवन सोडून जीवकाच्या आम्रवनांत येऊन

राहिले. जीवकाला ही खबर लागतांच तो त्यांच्याजवळ आला व त्यांच्या पायाला झालेली जखम पाहून त्याला चांगलें मलम लावून सहज विनोदानें म्हणाला ‘ भदंत, आपणाला लोक रोगमुक्त, दुःखमुक्त क्लेशमुक्त समजतात. पण आपणालाहि आमच्याप्रमाणेंच पीडा, दुःख, कष्ट वगैरे होतातच, नाहीं काय ?’

त्यावर भगवान उत्तरले :—जीवका ! तुझी समजूत चुकीची आहे. विमुक्तांना दुःख, पीडा, कष्ट होत नाहींत म्हणजे काय ? शारीरिक धर्म हे सर्वांना आहेतच. बद्धाप्रमाणें विमुक्तांनाहि त्या निसर्ग—नियमानुसार शारीरिक कष्ट, पीडा, दुःख इत्यादि होतातच. पण बद्ध पुरुष त्यानें विव्हल व कष्टी होतो. आणि विमुक्त पुरुष ते शरीराचे स्वाभाविक धर्म आहेत असा विवेक करून, ते विकारवश न होता शांतपणें सहन करतो, इतकेंच. हाच बद्ध व मुक्त यांच्यातील फरक होय.
असें म्हणून भगवंतानी ही खालील गाथा म्हटली

**‘गतद्धिनो विसोकस्स विप्पमुत्तस्स सब्बधि ।**
**सब्बगन्थ पहीनस्स परिळाहो न विज्जति, ॥**

धम्मपद,७-१

भावार्थः—ज्याचें भवचक्र सुटलें आहे,जो शोकमुक्त झाला आहे, जो सर्वतोपरी मुक्त आहे, व ज्याच्या सर्व आशाग्रंथी गळून पडल्या आहेत अशा मुक्त पुरुषाला, अर्हताला, कायक्लेश मुळींच तापदायक होत नाहींत !

जीवक हें भगवंताचें भाषण ऐकून अत्यंत संतोषला व त्यांचा उपासक बनला. पुढें लवकरच तें आम्रोद्यान त्यांच्या व त्यांच्या भिक्षुसंघाकरतां म्हणून तेथें एक सुंदर व प्रशस्य असा विहार बांधून, त्यांना दान दिलें. जेव्हां जेव्हां भगवंतांचा मुक्काम राजगृहीं असे तेव्हां तेव्हां तो दररोज सकळीं व संध्याकाळीं त्यांच्या दर्शनास जात येत असे.

---

# नालगिरी नरमला !

चुल्लवग्ग, ७-२-५

देवदत्ताचे बस्तान राजगृहांत आतां चागलेंच बसलें होतें. प्रत्यक्ष राजा अजातशत्रु हाच त्याचा परम शिष्य ! मग त्याच्यावर चवऱ्या ढळणार नाहींत व प्रस्थ वाढणार नाहीं तर काय होईल ? बिंबसाराच्या मृत्यूनंतर बुद्ध भगवंताचा कैवार घेणारें असें अधिकारी व भारदस्त माणूस राजवाड्यांत काय किंवा राजगृहांत काय नांव घेण्यासारखें असें कोणीच राहिलें नव्हतें !

जो तो देवदत्ताच्या भजनी लागलेला ! या राजगुरूचे गोड पोवाडेच आतां तेथें सर्वत्र मुक्त कंठानें गाण्यांत येऊन त्याचा अडेजाव व बडेजाव आणि त्याचप्रमाणें मानमरातब हे कळसास जाऊन पोंचले होते ! त्याच्या गयाशिर विहाराला जें महत्व व ऐश्वर्य प्राप्त झालें होतें तें आतां वेळुवनाला राहिलें नव्हतें. एवंच तात्पर्य काय तर बुद्धाचें वजन व तेज दिवसें दिवस राजगृहांत ओसरणीस लागून तें फिक्कें पडत चाललें होतें यांत संशय नाहीं.

इतकें असलें तरी देवदत्ताचें त्यामुळें समाधान झालें नाहीं. त्याच्या अंत:करणांत निराळीच मनोवृत्ति उफाळत होती. त्याला स्वत: बुद्ध होण्याची-नव्हे म्हणवून घेण्याची-अनिवार्य हाव सुटली होती ! पण ती सहजासहजी साध्य होणारी नव्हती. भगवंताचें जीवमान असे तोपर्यंत तिला मूर्त स्वरूप येण्याची फारशी आशा नसल्यामुळें तो मनांत फार बेचैन झाला होता.

पुढें रात्रंदिवस याच विषयावर विचार करतां करतां त्यास पुन: एक युक्ति सुचली. त्या राजगृहांतील हस्तीशाळेंत नालगिरी नांवाचा एक महाद्वाड हत्ती होता. मोठा मदोन्मत्त होता तो ! माणसें मारण्याची त्यास भारी खोड ! कधींमधीं चुकून माकून मोकळा सुटला कीं

धांवलाच रस्त्यावर, लागलाच मनुष्याच्या मागें, पकडलेंच त्याला सोंडीत, आपटलाच जमिनीवर आणि पायाखालीं चिरडून केलाच त्याचा चेंदामेंदा !! असला द्वाड नि मस्त प्राणी !! त्याच्या तावडींत सांपडलेला मनुष्य जिवंत सुटतो कशाला ? मोकळा सुटला की सारा गांव भीतीनें गांगरून, गोंधळून व गडबडून जाई !! एवढी दशहत होती त्याची !! त्या नालगिरीची !! प्रत्यक्ष यमाचा अवतारच !!!

त्याचा हा असा प्रताप पाहून हत्तीशालेंत लोखंडी साखळदंडानें त्यास कायमचा जखडून ठेविला होता. देवदत्ताचें सुदैव म्हणूनच त्यास या नालगिरीची आठवण झाली. मग आतां त्याचा आनंद काय विचारावा ?

ही युक्ति सुचतांच पुढें लवकरच आपला विश्वासूक माणूस पाठवून त्या नालगिरीच्या माहुतास एकांतात बोलावून घेऊन त्याला आपल्या कार्यास अनुकूल करून घेण्याचा त्यानें डाव घातला. यासाठीं तो त्या माहुतास म्हणाला:—हें बघ, माझी एवढी कामगिरी करशील तर तुझें जन्माचें दारिद्र्य दूर करीन मी. तुला मोठ्या हुद्याची जागा मिळवून देईन. चांगलें उत्तम शेत आणि मुबलक पैसा-अडका याचा धनी होशील तूं ! मग करशील का माझी कामगिरी ?

**माहूत** :—ती कोणती देवदत्तजी ?

**देवदत्त** :—फार कठीण नाहीं. पण मोठी नाजूक आहे.

**माहूत** :—सांगा तर खरें. कळूं द्या मला.

**देवदत्त** :—सांगतों. पण लक्षांत ठेव. षट्कर्णी होता उपयोगी नाहीं. अगदी मनांतल्या मनांत.

**माहूत** :—ती काळजी नको. त्या विषयी निर्धास्त असा.

**देवदत्त** :—भगवान बुद्ध, त्यांना ओळखतोस ना तूं ?

**माहूत** :—न ओळखायला काय झालं ? भगवंताना ओळखत नाहीं असा माणूसच नाहीं राजगृहांत !

देवदत्त :—त्यांच्याविषयींच आहे माझी कामगिरी. काम अगदी फत्ते झालें पाहिजे.

माहूत :—काय करावें म्हणतां मी? त्यांना अंधारींत घेऊन येऊं?

देवदत्त:—छे रे! तेवढ्याला एवढी विनवणी कशाला? काम मोठें नाजूक व तसेंच मोठ्या जोखमेचें आहे! पण फत्ते करशील तर जन्माचा सुखी होशील!

माहूत :—काय तें कळूं द्या मला.

देवदत्त :—सांगतों. पण फार सावध हो! अगदी गुपचुप! नाहीं तर प्रसंग कठीण!

माहूत :—ती चिंता सोडा. काय करावं तेवढं सांगा म्हणजे झालं.

देवदत्त:—बुद्ध भगवान गावांत भिक्षेस येतात.

माहूत :—होय, येतात.

देवदत्त :—सांगू काय करावं तें आतां?

माहूत :—बेधडक सांगा. कांहीं चिंता करूं नका.

देवदत्त :—सांगतों तर. तेवढं तुला फत्ते केलंच पाहिजे. हें बघ, भगवान गावांत भिक्षेला आले म्हणजे अचूक संधि साधून तुझा नालगिरी त्यांच्यावर घाल!

माहूत :—आं! भगवान बुद्ध देवावर! त्या थोर धर्मगुरूवर!!

देवदत्त :—होय, त्या धर्मगुरूवरच! एवढं घाबरायला काय झालं? वाघ कां आहे तो?

माहूत :—महाराज! नालगिरी मोकळा सोडणं सोपं काम नव्हे. शेकडों माणसें प्राणास मुकतील की! गावांत सगळा अनर्थ माजून राहील! लोकांची दाणादाण उडेल नि एकच हाहाकार होईल!!

देवदत्त :—तो विचार पाहिजे कशाला आपल्याला? कांहींही होवो! बाकीचा विचार सगळा गौण. फक्त तो नालगिरी व बुद्ध यांची गांठ पडली म्हणजे झालं. पहा एवढी कामगिरी कर व जन्माचा सुखी व

धन्य हो ! वाटेल तें माग, पण हें एवढं फत्ते कर. नीट लक्षांत घे. सोन्याचा धूर निघेल तुझ्या घरांत ! अशी संधि पुनः यावयाची नाहीं ! समजलं कां मी काय म्हणतो तें ? मी राजगुरु आहें हें ध्यानांत असूं दे. माझं काम कर नि नशीब काढ.

माहुताच्या तोंडाला पाणी सुटलें ! घरदार–खेतवाडी, धन–दौलत ! क्षुद्र मनुष्याला आणखी काय पाहिजे ? पैशाचा मोह कोणास सुटला आहे ! एवढ्याशा कामगिरीनें जन्माचें दारिद्र्य दूर होतें तर त्याला नकार कोण देईल ? अर्थात् त्या मधाच्या बोटास तो माहूत भाळला व ती कामगिरी फत्ते करण्याचें अभिवचन देऊन तेथून उठून परत फिरला.

त्या गोष्टीस कांहीं दिवस लोटले. देवदत्ताचे गुप्त हेर दररोज गावांत भिक्षेच्या वेळीं फिरून टेहळणी करूं लागले. उद्देश हा कीं भिक्षेस आल्यास ती बातमी माहूतास जाऊन द्यावयाची. पण दुर्दैव हें कीं तसा योगायोग कांहीं लवकर येण्याचा रंग दिसेना. देवदत्ताची अधीरता तर सारखी वाढू लागली. रात्री झोंप नाहीं व दिवसा चैन नाहीं. अन्नावर इच्छा नाहीं कीं कशाची म्हणून हौस नाहीं ! मनांत सारखी तळमळ नि मळमळ ! भगवंताचा ग्रंथ केव्हां आटपेल नि आपण त्यांच्या जागीं केव्हां मिरवूं हा एकच ध्यास ! भगवंताच्या मत्सरानें त्याचें डोकें इतकें भडकून व भणाणून गेलें होतें कीं, विचारा जवळ जवळ वेडाच झाला होता तो ! तो देवदत्त !

ती भिक्षेची वेळ. दिवस फार तर पांच एक तास वर चढला असेल. भगवान भिक्षेसाठीं गावांत आले होते. बरोबर आनंद, व सारीपुत्र होते. राजरस्त्यावरून चालले असतांना लांबून आपल्याकडेच मनुष्याचा घोळका सैरावैरा धांवत येत असलेला त्यांनी पाहिला. त्यांची मोठी गाळण उडाली होती व लोक बेहोष होऊन पळत सुटले होते. 'धांवा, पळा, जीव वांचवा, नालगिरी ! नालगिरी !' असे शब्द त्या लोकांच्या

तोंडातून निघत होते. एकच गोंधळ नि एकच धांदल ! जीव मुठींत घेऊन वाट सांपडेल तिकडे फाणाफाण होणाऱ्या त्या घाबरट लोकांची त्रेधा-तिरपीट काय सांगावी ? लोक पुढें धावणारे व नालगिरी मागे लागलेला !

'पळा ! पळा ! नालगिरी आला!! असें ओरडून सांगून कांहीं लोक भगवंतापासून पळून गेले. इतक्यांत आनंदाला तो नालगिरी जोरानें मान हलवीत व सोंड वळवीत आपल्याकडेच दौडत येत असलेला लांबून दिसला. त्याला पाहून आनंद घाबरून भगवंतास पळण्याची सूचना देऊन आपणहि त्या लोकांबरोबर पळत सुटला. सारीपुत्रानेंहि आनंदाचीच वाट धरली.

पुढे क्षण लोटतो न लोटतो तो इतक्यांत भगवंतावर नालगिरीची दृष्टि पडली ! मग काय ? त्यांना पाहून त्याला अधिकच चेव आला व मोठ्या आवेशाने त्यांच्यावर धावून आला ! सर्व लोक पळाले. पांगापांग झाले. पण बुद्ध कांहीं रस्त्यावरून हलेनात ! उलट ते जागच्या जागींच मेरुप्रमाणें स्थिर राहिले !

नालगिरीनें संतापून त्यांच्यावर एक रुद्र कटाक्ष टाकला. उलट भगवंतानीहि त्याच्याकडे रोखून पाहिलें. दोघांची दृष्टादृष्ट झाली. तो काय चमत्कार ! नालगिरीची पावलें एकदम मंदावली ! व आवेश सगळा मावळला ! पुढें दहा पावले आला न आला तोच त्याचे पाय स्थिरावले व मटकन् स्वारी खाली बसली.

भगवान जवळ जाऊन त्याच्या समोर उभे राहिले. त्या प्राण्यानें त्यांना सोंडीत धरून आपटण्या ऐवजी उलट त्यांच्या पायाखालची धूळ घेऊन, आपल्या मस्तकावर तो उधळून घेऊं लागला !! एकदां, दोनदां, तीनदां त्यानें असें केलें !! व नंतर त्याची ती सोंड भगवंताच्या पायावर घुटमळूं लागली !! भगवान त्या सोंडीला धरून प्रेमानें कुरवाळून मग त्याच्या गंडस्थलावर आपल्या अमृत हस्तानें

मायेची एक मधुर थाप मारून त्यास म्हणाले :—नागानें नागाला मारणे चांगलें नाहीं. कां कीं नागाचा जो घात करतो तो दुर्गतीला जातो. हें कुंजर ! तूं मदोन्मत्त होऊन दुर्गतीला जाऊं नकोस ! पण असें कृत्य कर कीं ज्याच्या योगनें तूं सुगतीला जाशील.

लोक लांबून हा प्रकार पाहात होते. त्यांची समजूत अशी होती कीं तो मदोन्मत्त नालगिरी भगवंतास पकडून त्यांचा क्षणार्धांत चेंदामेंदा करून टाकील. पण प्रत्यक्ष प्रकार घडला तो कांहीं निराळाच ! भगवंतावर झडप घालण्याऐवजी उलट तोच त्यांच्या पायावर सोंड ठेऊन पाळीव कुत्र्याप्रमाणें लाडिकपणें तेथें पायाशीं चुळबुळ करूं लागला ! ! हा चमत्कार पाहून लोकांस विस्मय तर झालाच, शिवाय आणखी भगवंताचें तें अगाध दिव्य सामर्थ्य व प्रचंड प्रभाव पाहून त्यांचे त्यांनी वारंवार कौतुकहि पण केलें ! !

पुढें कांहीं वेळानें नालगिरी तेथून उठला व पुनः एकदां भगवंताच्या पायाखालची धूळ घेऊन आपल्या मस्तकावर धारण करून व त्यांना सोंडीनें दरबारी थाटाची सलामी देऊन शांतवृत्तीनें आला तसा परत फिरला व सरळ हस्तिशालेंत जाऊन आपल्या जागीं उभा राहिला ! !

हा प्रकार घडल्यावर लोक भगवंतांचा महिमा पुढील प्रमाणें गाऊं लागले.

**‘ दण्डेनेके दमयन्ति अंकुसेहि कसाहि च ।**
**अदण्डेन असत्थेन नागो दन्तो महेसिना ॥ ’**

**भावार्थ :**—कोणी दंडाने तर कोणी अंकुशाने हत्तीचें नियमन करतात. पण भगवान बुद्धांनी दंडाशिवाय, अंकुशाशिवायच त्याचें दमन केलें.

---

# संघांत फूट

चुल्लवग्ग ६–३–१ व ६

देवदत्ताचे तीनहि प्रयत्न फोल झाले. वाममार्गानेंच कां होईना आपला मतलब साधण्याचा त्यानें तीनदां कुटिल प्रयत्न करून पाहिला. पण दुर्दैवानें एकहि नवसास पावला नाहीं. अट्टल बेरडांना हातीं धरून भगवंताच्या प्राणावर घाव घालण्याचा पहिला घातकी प्रयोग करून पाहिला; पण तो वार फुसका ठरला. नंतर स्वत: डोंगरावर चढून भगवंतावर उतरणीवरून मोठी शिळा लोटून दिली; पण ती स्वत:च भंग पावली ! पण भगवंतावर कांहीं जाऊन आदळली नाहीं ! यांतूनहि भगवान सुरक्षित बाहेर पडले. तिसरा प्रयत्न नालगिरी हत्ती त्यांच्यावर सोडून करून पाहिला. पण तो तरी काय, भगवंतावर चढून न जातां उलट त्यांच्या पायाखालीं लोळण घेऊं लागला !! मग आतां पुढें काय? आपली कोणतीच मसलत प्रभावी होण्याचें चिन्ह त्यास दिसेना. भगवंतांची दिव्य दृष्टि व योगमाया यांना चुकवून व डावलून आपला मंत्र प्रभावी करण्याची व होण्याची त्यास आतां फारशी आशा राहिली नाहीं. अधिक गोंधळ करावा तर लोकांत बभ्रा होऊन उलट आपलीच नाचक्की व्हावयाची ही भीति. असो. एकूण काय तर भगवंताच्या प्राणावर घाव घालून त्यांस नेस्तनाबूद करण्याची त्याची आसुरी हांव आतां मनांतल्या मनांतच नरमली आणि म्हणून ती सोडून देऊन निराळ्या मार्गाचा अवलंब करण्याचा त्यानें घाट घातला.

बुद्ध भगवंताचा संघ मोठा होता, पण त्यांत आत्मीयतेची मोठी वाण होती. संघातच भिक्षु–भिक्षूंचे आपआपसांत कांहीं तट पडले होते. आणि त्यांच्या त्यांच्यांत आंतून मत्सरभाव धगधगत होता. वरूनवरून त्यांच्यांत ऐक्य असल्यासारखें दिसत होतें. पण आंतून मात्र परस्परांच्या हेवादाव्यानें व द्वेष मत्सरानें संघ बराच पोंखरला गेला होता. एकाचें एकाला पटत नसे. जो तो आपल्या मनास येईल तसें वागे.

ही अंतस्थ नाजूक बाजू देवदत्तास पूर्ण कळून चुकली होती व म्हणून त्या मर्मस्थानावर घाव घालून त्याची शक्य तो इतिश्री जरी नाहीं, चांगली धूळधाण तरी करावी या उद्योगास तो लागला. शिवाय त्याच्या मन:स्थितींतहि आतां फरक झाला होता. त्याच्या धार्मिक मताचा कांटा जैनांचा तीर्थंकर जो महावीर त्याच्याकडे कांहींसा झुकत चालला होता. जैनांचे कांहीं नियम त्यास पसंत वाटून त्यांचा शिरकाव व प्रसार बुद्धसंघांत झाल्यास करून पाहवा व न साधल्यास निदान फूट तरी पाडावी असा बेत करून, त्या रोखानें फांसे टाकण्याचा त्यानें निर्धार केला.

पुढें एके दिवशीं आपल्या कोकालिकादि प्रमुख शिष्यांना जवळ बोलावून त्यांच्यापुढें त्यानें गोष्ट काढली कीं, आतां आपण बुद्धाजवळ जाऊन त्यांच्या संघांत बिघाड व फूट उत्पन्न होईल असें कांहीं तरी कुसपट उत्पन्न करूं या. तेव्हां कोकालिक म्हणाला :—देवदत्तजी ! ही गोष्ट कशी शक्य आहे ? भगवान बुद्ध म्हणजे कांहीं लहान प्रस्थ नव्हे ! त्यांचें भिक्षुसंघावर केवढें तरी वजन ! संघाचा ते जीव कीं प्राण आहेत ! मग ही गोष्ट आपणास कशी साध्य होणार ?

देवदत्त म्हणाला—' प्रयत्न तर करून पाहूं खरे. साधल्यास ठीक; न साधल्यास बिघडलें कोठें ? बुद्धाने केलेले संघाचे नियम लवचीक व मुळमुळीत आहेत. ते अधिक कडक नि टणक करण्याची सूचना भगवंतापुढें मांडू. ते त्यांनी कबूल केले तर ठीक. त्यामुळें आमचें वजन नि छाप संघावर अधिकच बसेल. तेथें आमचा बोज सहज वाढेल. आणि पुढील मार्ग सुकर होईल. बरें, न कबूल केल्यास तिकडूनहि आमचा फायदाच आहे. कारण त्यामुळें संघांत अवश्य विरोध उत्पन्न होऊन हटकून फूट पडेल आणि तसें झालें म्हणजे तेंहि आमच्या पथ्यावरच, असेंच नाहीं का ? मग आपलें बिघडलें कोठें ? माझा पक्ष घेणारे असे तेथें कांहीं भिक्षु आहेतच की नाहींत ? मग चला जाऊं

व विनयशास्त्रांत दुरुस्तीचा ठराव मांडूं. पाहूं या गम्मत तर खरी. भ्रमाचा भोपळा आपोआपच फुटेल ! हें भाषण त्या शिष्यांना पटलें व ते त्याच्याबरोबर जाण्यास कबूल झाले.

पुढें देवदत्त आपल्या शिष्यांना बरोबर घेऊन बुद्धापाशीं आला व संधि साधून हे पुढील नियम विनय शास्त्रांत दुरुस्ती म्हणून सूचना-वजा त्यानें त्यांच्यापुढें मांडले. तो म्हणाला 'भदंत, भिक्षूंच्या आचार-शास्त्रांत कांहीं सुधारणा होणें माझ्या मतें इष्ट व जरूर आहे. म्हणून पुढील सूचना मी आपल्यापुढें माडूं इच्छितो. भगवंतानी त्याच्यावर विचार करून आपला निर्णय द्यावा.

बुद्ध :—त्या कोणत्या, देवदत्ता ?

देवदत्त :—त्या ह्या, भदंत ! माझी पहिली सूचना अशी आहे कीं, भिक्षूंनी जन्मभर अरण्यांतच रहावें. केवळ भिक्षेपुरतें मात्र गावांत यावें. त्याशिवाय त्यांनी गावांत येऊं नये व राहूं नये. हा नियम मोडणारा दोषी समजला जावा.

बुद्ध :—बरं, आतां तुझी दुसरी सूचना कोणती ?

देवदत्त :—माझी दुसरी सूचना म्हणजे ती ही. भिक्षूंनी भिक्षा-वृत्तीवरच निर्वाह करावा. उपासकांच्या घरचें आमंत्रण घेऊन तेथें आयते भोजन भाऊ होऊन जाऊं नये.

बुद्ध :—असं. बरं. आतां तुझी तिसरी सूचना सांग.

देवदत्त :—माझी तिसरी सूचना अशी आहे कीं, भिक्षूंनी अंगावर जन्मभर जुन्या चिंध्याच धारण कराव्यात. नवीन वस्त्र धारण करूं नये.

बुद्ध :—चवथी सूचना ?

देवदत्त :—ती ही कीं, भिक्षूंनी नेहमी झाडाखालीं किंवा स्मशानांत वास करून रहावें. उन्हांत अगर पावसांत देखील कुटी अगर मठ याचा आश्रय करूं नये. आतां पांचवी व शेवटची म्हणजे ती अशी कीं,

भिक्षूंनी केव्हांहि मत्स्य-मांस भक्षण करावयाचें नाहीं. भिक्षापात्रांत तें मुळींच घ्यावयाचें नाहीं. म्हणजे भिक्षूचा आहार शुद्ध शाकाहारच असावा. याप्रमाणें, भदंत, विनयशास्त्रांत दुरुस्ती होऊन सुधारणा व्हावी. जो हे नियम मोडील तो दोषी--पापी--समजण्यांत यावा. माझे हे नियम भिक्षुसंघाला व भिक्षुवृत्तीला खरोखर पथ्यकर व पोषक असेच आहेत. नाहींत काय ?

बुद्ध :—देवदत्ता ! तुझे नियम तसे आहेत, त्यांत संशय नाहीं. पण खेदाची गोष्ट ही कीं, मला ते मान्य करतां येत नाहींत. भिक्षुसंघावर ते अक्षरशः पाळण्याची सक्ति करणें व ते मोडल्यास त्यांना प्रायश्चित्तार्ह ठरविणें, हें मला पसंत नाहीं. हे अत्यंत कठोर नियम आहेत. माझ्या धर्मांत कोठलीहि गोष्ट अतिरेकाला जाऊन पोंचत नाहीं. माझा धर्म हा मध्यममार्गी धर्म आहे. तो कोणत्याहि अतिरेकाला जाऊन भिडणारा नव्हे. सबब मला तुझे नियम जसेच्या तसे ग्राह्य करतां येत नाहींत.

देवदत्त :—मग भगवंतांचें म्हणणे तरी काय ?

बुद्ध :—माझें मत विचारशील तर या गोष्टी ज्याच्या त्याच्या मर्जीवर व परिस्थितीवर सोपवाव्या हें बरें. त्यांना कडक नियमाचें कठीण रूप देऊन चालावयाचें नाहीं. ज्याला अरण्यांत रहावेसें वाटतें त्यानें तसें करावें पाहिजे तर. पण ज्याला गांवाच्या शेजारी मठांत अगर कुटींत राहवेसें वाटतें त्याला तसें करण्यास मनाई करणें, हें मला योग्य दिसत नाहीं. त्याचप्रमाणें ज्याला भिक्षा मागून आपला निर्वाह करावासा वाटतो त्यानें खुशाल तो मार्ग पत्करावा. त्यांत कांहीं वाईट नाहीं. पण ज्याला आमंत्रणें येतील त्यांनी तीं स्वीकारूं नयेत हा आग्रह मला पसंत नाहीं. ती गोष्ट ज्यांच्या त्यांच्या खुषीवरची असावी.त्याला नियमाचें स्वरूप नसावें, इतकेंच मी म्हणतों. आतां वस्त्राविषयीं म्हणशील तर ज्यांना चिंध्या पांघरून देहरक्षण करावेसें वाटतें त्यांनी तसें खुशाल

करावें. त्याला माझी आडकाठी नाहीं. पण लोकांनी दिलेलीं वस्त्रें भिक्षूंनी अंगावर धारण करूं नयेत या सूचनेला माझा विरोध आहे. उपासकांनी खुषीनें दिलेलीं वस्त्रें धारण करण्यास हरकत कां असावी? माझ्या मतें त्यांत कसलाच दोष नाहीं. आतां झाडाखालीं राहणें याविषयीं तूं मला विचारशील तर आठ महिने झाडाखालीं निजण्यास माझी परवानगी आहे, हें तुला ठाऊक आहेच. चार महिने पावसाळ्यांत मात्र तो नियम ढिला करणें हें मला रास्त दिसतें. पावसाळी महिन्यांत त्यांनी मठाचा अगर विहाराचा आश्रय केल्यास मी तो कमीपणा समजत नाहीं. तुझी शेवटची सूचना म्हणजे मत्स्यमांसाहाराविषयीची होय. तो सुद्धा मला अजीबात वर्ज करावयास सांगणें योग्य वाटत नाहीं. मत्स्याहार काय किंवा मांसाहार काय, तो माझ्या मतें अजीबात त्याज्य नाहीं. फक्त इतकेंच कीं, ज्या प्राण्याचें मांस आपणास वाढण्यांत आलेलें असतें तो प्राणी आपल्या करतां आपल्या समक्ष मारलेला नसावा. किंवा तो आपल्यासाठींच मारला गेला आहे ही बातमी आपल्या कानावर आलेली नसावी. किंवा तसा संशयहि नसावा. जेथें तसा संशय असेल अगर वरील सारखा प्रकार दृष्टोत्पत्तीस आलेला असेल त्या प्राण्याचें मांस मात्र मी वर्ज मानतो. असलें मांस भिक्षूनें खाऊं नये. व खावयाचें नसतें. अतएव तुझ्या नियमवजा सूचना मला सर्वस्वी मान्य करतां येत नाहींत !

भगवंताचें हें भाषण ऐकून देवदत्त उत्तरला, 'भदंत, आपणास माझ्या सूचना पसंत असोत वा नसोत, पण मी व माझे अनुयायी मात्र त्या आम्हीं अगदीं अक्षरशः पाळू इच्छितो.' असें म्हणून देवदत्त तेथून उठला व आपले शिष्य घेऊन तो तेथून हंसतमुख चालता झाला. हंसतमुख म्हटलें याचें कारण कीं, बुद्धाची चारचौघांत नालस्ती करण्यास हा झालेला प्रकार त्याच्या पथ्यावरच पडला. पुढें तेथून निघून राजगृहांत येऊन तेथें लोकांना घडलेली हकीकत सांगत तो सर्व नगरभर फिरला.

दुसरे दिवशीं दुपारीं आनंद हा भिक्षा मागावयास म्हणून राजगृहांत येऊन फिरूं लागला. तेव्हां वाटेंत त्याची व देवदत्ताची भेट झाली, तेव्हां तो आनंदास म्हणाला 'आनंदा, या खेपेस उपोसथ मी स्वतःच चालविणार आहे. बुद्धाची अगर संघाची मुळींच परवा करणार नाहीं.'

पुढें लवकरच उपोसथाचा दिवस आला. त्या दिवशीं बुद्धाची वाट न पाहतां संघात येऊन, देवदत्तानें त्या दिवशीचा कार्यक्रम आपणच चालविला व आपले नियम संघांपुढें ठेवून व त्याची महती गाऊन अखेर अशी सूचना दिली कीं, ज्यांना ते नियम पसंत असतील त्यांनीं खुशाल आपल्यामागें यावें.

त्या वेळीं तेथें कांहीं नवखे भिक्षु होते. त्यांना देवदत्ताचें भाषण पसंत पडून ते त्याच्याबरोबर जावयास सिद्ध झाले. अशांची संख्या पांचशे होती. त्यांना बरोबर घेऊन तो संघातून निघून बाहेर पडला व आपल्या गयाशिर विहारांत येऊन दाखल झाला.

ही गोष्ट पुढें सारिपुत्रानें भगवंतास श्रुत केली तेव्हां भगवान म्हणाले :—'सारिपुत्ता, साधुपुरुषाला चांगलें काम करणें सुलभ असते पण दुष्टाला तसें करणें हें फार कठीण होय. त्याचप्रमाणें पापी मनुष्याला वाईट काम करणें हें सुलभ आहे. पण तेंच साधुपुरुषाला अत्यंत दुर्घट होय. असें म्हणून त्यांनी हें पुढील उदान म्हटलें.

**'सुकरं साधुना साधु, साधु पापेन दुक्करं**
**पापं पापेन सुकरं, पापं अरियेभि दुक्करं' ति ॥**

उदान ५-८

---

**भिक्षु** :—अगदी सत्य गोष्ट

**बुद्ध** :—आतां तिसरें एक उदाहरण घेऊं. एखादा कुलपुत्र श्रद्धापूर्वक प्रव्रज्या घेऊन तेवढ्यानेच संतुष्ट न होतां शीलवान होऊन समाधीचा अभ्यास करतो आणि समाधीचा लाभ झाला म्हणजे तेवढ्यानेच आपण कृतार्थ झालों असें समजतो. हाही कच्चा भिक्षूच होय. कारण त्यालाहि पुढें आत्मस्तुति व परनिंदा याची खोड लागतेच लागते. जसा एखादा माणूस मोठ्या वृक्षाचें सार आणण्यास जाऊन फक्त त्याची साल काढून घेऊन तेंच सार समजून फसतो, तद्वत या भिक्षुची देखील कथा आहे.

आतां चौथा एक कुलपुत्र असतो. तो श्रद्धापूर्वक भिक्षु होऊन शील व समाधि एवढ्यावरच संतुष्ट न राहतां प्रज्ञेचाहि अभ्यास करूं लागतो. पुढें त्यास प्रज्ञालाभ होतो. पण बिचाऱ्याची येथेंच फसगत होते. प्रज्ञेंतच श्रामण्याचें सर्व सार सांठलें आहे अशी त्याची समजूत होते. आणि तेवढ्यावरच तो हुरळून जाऊन आत्मस्तुति व परनिंदा करण्यांत गढून जातो. मीच काय तो तेवढा प्रज्ञावान व इतर भिक्षू अप्रज्ञ आहेत असें समजून तो आत्मप्रौढी मिरवूं लागतो. हाही कच्चा भिक्षुच होय. जसा एखादा माणूस मोठ्या वृक्षाचें सार आणण्यास जाऊन त्याची साल काढून आंतील मऊ लाकूड घेऊन तेंच सार असें समजून तेवढ्यावरच संतुष्ट होतो, तद्वत हा भिक्षु झाला तरी प्रज्ञेलाच श्रामण्याचें सार समजून मोहित होतो.

आणखी एका कुलपुत्राची गोष्ट सांगून आजचा हा विषय पुरा करतो. हा पांचवा कुलपुत्र होय. हा श्रद्धापूर्वक प्रव्रज्या घेऊन शील, समाधि, व प्रज्ञा यांचा लाभ करून घेतल्यावर तेवढ्यावरच संतुष्ट न होतां निर्वाणाचा साक्षात्कार करून घेण्याचा प्रयत्न करतो. व अखेर त्याचा लाभहि करून घेतो. हाच खरा भिक्षु होय ! कारण याला आत्मस्तुति व परनिंदा याची बाधा होत नाहीं ! जसा एकादा मनुष्य

मोठया वृक्षाचें सार ग्रहण्यासाठीं जातो आणि त्या वृक्षाजवळ गेल्यावर त्याची साल सोडून, आंतील मऊ लाकूड तासून त्याच्या आंतील खरें-खुरें सार ग्रहण करतो, तद्वत हा भिक्षु श्रामण्याचें खरें सार–जें निर्वाण–तेंच ग्रहण करतो ! !

म्हणून सांगतो कीं भिक्षु हो, हें ब्रह्मचर्य–ही प्रव्रज्या–कांहीं लाभ-सत्काराच्या फायद्यासाठीं नाहीं व नव्हे ! शीलसंपत्तीच्या फायद्यासाठीहि नव्हे. प्रज्ञासंपत्तीच्या लाभासाठी देखील नव्हे. तर हें ब्रह्मचर्य आत्यंतिक चित्तविमुक्तिसाठीं आहे आणि आत्यंतिक चित्तविमुक्ति म्हणजे निर्वाण होय ! हेंच ब्रह्मचर्याचें-प्रव्रज्येचें–खरें सार आहे ! ! भिक्षूहो, तुम्ही देखील फांद्यापाचोळ्याच्या भरीस न पडतां, साल व लांकूड यांस मोहित न होतां, केवळ वृक्षाचा मूळ गाभा–सारसर्वस्व–याचेंच ग्रहण करा ! ! त्यांतच तुमचें अक्षय कल्याण आहे !! असा उपदेश केल्यावर भगवंतांनी ही पुढील गाथा म्हटली:–

**अनिक्कसावो कासावं यो वत्थं परिदहेस्सति ।**
**अपेते दमसच्चेन सो कासावमरहति ॥**
**यो च वन्तकसावस्स सीलेसु सुसमाहितो ।**
**उपेतो दमसच्चेन स वे कासावमरहति ॥**

धम्मपद १९–१०

अर्थ :—भिक्षूहो, ज्याचा चित्तदोष गेला नाहीं व ज्याला दम व सत्य यांची परवा नाहीं असा काषाय वस्त्र धारण करणारा त्या काषायवस्त्रास मुळींच पात्र नाहीं. तोच काषायवस्त्र धारण करण्यास पात्र आहे कीं, ज्याचे चित्तदोष गेले आहेत, जो सदाचारसंपन्न आहे व जो दम व सत्य यांनी युक्त आहे.

आजचें हें प्रवचन देवदत्तास उद्देशून असावें, ही गोष्ट त्या भिक्षूंनीं चटकन् ओळखिली व तें खरेंच होतें.

---

## अजातशत्रूचा पश्चात्ताप

अट्ठकथा

अजातशत्रु राजा झाला व त्याची महत्वाकांक्षा तृप्त झाली हें सर्व खरें. पण त्याची पूर्वीची मनोवृत्ति मात्र तशीच पुढें कायम राहिली नाहीं. विकाराचें वादळ शांत झाल्यावर प्रक्षुब्ध चित्तसागर सौम्य होऊन पुन: तेथें विवेकाच्या मंद लहरी विलसूं लागल्या; हा मानसशास्त्राचा सहज-सिद्ध धर्मच आहे. अजातशत्रूची आतां अशीच स्थिति झाली.

देवदत्ताच्या दुष्ट मसलतीला बळी पडून आपण पितृद्रोह केला हा विचार उसळी मारून त्याला उत्तरोत्तर बेचैन करूं लागला. वर वर तो हौशी व चैनी दिसत असे. पण जसजसे दिवसामागून दिवस जाऊं लागले तसतसा तो मनांत अस्वस्थ व बेचैन होऊं लागला. बापाशीं केलेल्या अमानुष व कठोर वर्तनाची त्यास लाज वाटूं लागली. बिंबसाराच्या विशाल व प्रेमळ हृदयाची आठवण झाली म्हणजे त्याचें सर्वांग भीतीनें, शरमेनें, लज्जेनें व पश्चात्तापानें थरारून व पोळून जात असे!

किती थोर नि किती प्रेमळ अंत:करण तें! पुत्राचे लाड व कोड पुरविण्यांत एका पायावर तयार! तोंडातून शब्द निघावयाचाच अवकाश. राज्यपद तेव्हांच खुषीनें सोडून दिलें! निर्लोभ पुत्रवात्सल्याची निराळी साक्ष आणखी ती काय पाहिजे? आणि त्या निर्व्याज पितृप्रेमाला बक्षीस काय? कारागृहवास! हाल—छळ! दु:ख—कष्ट! उपवास नि अपहास!!

'हरहर!! केवढा पापी मी!! केवढा चांडाळ मी!! केवढा दुष्ट मी!! केवढा कृतघ्न नि केवढा निर्दय मी!!! देवा! माझ्यासारखा अधम-पापी—चांडाळ जगांत दुसरा कोणी असेल का!!' अशा प्रकारचे विविध विचार त्याच्या अंत:करणांत उसळी मारून अहोरात्र थैमान घालूं लागले! दिवसा चैन पडेना व रात्रीं झोंप येईना. सदा सर्वदा एकच ध्यास! बापाचें थोर नि प्रेमळ अंत:करण व आपलें हिडिस व पापी

दुराचरण !! पश्चात्तापानें त्याचें अंतःकरण आतां भाजून व पोळून निघालें !! राजकार्यांत चित्त लागेना की सुखविलासांत मन रमेना !! दिवसेदिवस राजपदाची शिसारी येऊं लागली व सुखविलासांतून मन विटत चाललें !!

देवदत्त व त्याचा उपदेश यांचें अभद्र स्वरूप व आसुरी परिणाम त्याच्या विवेकचक्षूपुढें आतां ठळठळीत उभे राहून त्याला भेडसावूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं देवदत्ताचा नाद आपोआपच सुटत चालला व पुढेंपुढें दर्शनहि नकोसें झालें !!

पुढें शरद ऋतूंतील पौर्णिमा आली. त्या वेळीं राजगृहांत 'श्येनकेलि' महोत्सव साजरा होत असे. त्या वेळीं तेथील नगरवासी लोक एकत्र जमून मोठा उत्सव–समारंभ व आनंद–प्रमोद करीत असत. अजातशत्रु मात्र या खेपेस अगदी उदासीन राहिला. तो उत्सवांत येऊन भाग घेण्याचें लक्षण दिसेना. म्हणून त्याचे जे मंत्री होते त्यांनी त्याच्याजवळ जाऊन, पुष्कळ आग्रह करून मोठ्या मिनतवारीनें त्यास उत्सवांत आणून बसविलें.

तथापि त्याला तेथें कांहीं चैन व समाधान वाटलें नाहीं. तो उत्सवांत आला ही गोष्ट खरी. पण तेथें कोणाशीं बोलणें नाहीं कीं हंसणें नाहीं ! अगदीं मुखस्तंभ ! सर्व राजगृह हर्ष–प्रमोदांत व हास्य–विनोदांत मग्न झालें होतें. पण अजातशत्रु म्हणजे कमलपत्रावरचा जणु जलबिंदुच ! पूर्ण अलिप्त ! तो कोणाशीं बोलला नाहीं किंवा हंसला नाहीं. तेथें त्याचें कशांतच मन रमलें नाहीं नि अंतःकरण रंगलें नाहीं !

बापाच्या मृत्यूपासून त्याच्या मनांत व वृत्तींत झालेला फरक व पालट पाहून लोकांना मोठा अचंबा वाटला. बाप असतांना राजपदासाठीं केवढें तरी साहस केलें होतें नि आतां तें मिळाल्यावर मग अशी विषण्ण व वैराग्यवृत्ति का ? मेंदूत कांहीं बिघाड झाला नसेल ना ?

पिशाचानें तर पछाडलें नसेल ना ? ग्रहबाधा तर झाली नसेल ना ! असे लोकांचे नाना तर्क वितर्क चालू झाले.

पण कोणालाहि त्याच्या मनस्थितीचें खरें निदान करतां येईना. त्या उत्सवाच्या वेळीं तेथें अनेक पंडित व महात्मे आले होते. त्यांपैकी महाकोश नांवाचा एक मोठा प्रसिद्ध पंडित होता. त्याला दाखवून त्याचा सल्ला विचारला. कोणी निर्गंथनाथ-पुत्राचें मत घेतलें. कांहींनी महात्म्यांना भेटून त्यांचा अभिप्राय अजमावून घेतला. कोणी आचार्या-कडे तर कोणीं ज्योतिषाकडे जाऊन यासंबंधी विचारणा केली व त्यांनी सांगितलेले उपाय राजास येऊन विदित केले.

त्या उत्सवांत असे पुष्कळ नामांकित साधु व महात्मे आले होते. त्यांची ज्यांच्यावर भक्ति होती त्यांनी त्यांना भेटून आपआपल्यापरी राजाची हकीकत सांगून त्या प्रश्नाचा खल केला. अजातशत्रूनें सर्वांचें ऐकून घेतलें, पण एकाचेंहि त्याला धड पटलें नाहीं.

त्या वेळीं राजवैद्य जीवक हाहि तेथें हजर होता. त्याला पाहतांच राजानें त्यास जवळ बोलवून घेतलें व आपली सर्व हकीकत त्यास सांगितली. राजाचें म्हणणें सर्व ऐकून घेतल्यावर त्याला जी मानसिक व्यथा होती तिचा परिहार करण्याचा एक अमोघ उपाय म्हणून तो त्याला म्हणाला, 'राजा, याला एकच उपाय दिसतो मला. अन् तो म्हणजे भगवान बुद्धदेवाचें दर्शन ! राजा ! बुद्धदेव म्हणजे ज्ञानाचें भांडार, धर्माचें माहेरघर, शांतीचा सागर, दयेची खाण, पवित्रतेचें प्रतीक व मुमुक्षूचा मार्गदर्शक !! त्यांना जाऊन भेटल्यास तुझी चिंता दूर होईल. हल्ली ते माझ्या आम्रवनांतच मुक्काम करून आहेत. त्यांना जाऊन भेट व तेथें त्यांना अंतःकरण उघडें करून सांग. म्हणजे ते तुला खात्रीनें तुझ्या हिताचा व शांति-समाधानाचा चोख उपाय नि सरळ मार्ग दाखवितील. त्यांच्याशिवाय तुझ्या मानसिक रोगाचा परिहार करणारा तसा मला योग्य महत्मा दुसरा कोणी दिसत नाहीं !

जीवकाची ही सूचना राजास पसंत पडली. भगवान बुद्ध देवाचें नांव कानावर पडतांच त्याच्या तप्त हृदयावर अमृतवृष्टि झाल्यासारखें झालें. त्याला जरा हायसें वाटलें व त्यांचें दर्शन घेण्याचें त्यानें मनांत ठरविलें.

---

## संशय पिशाचानें माणिक गिळलें

भद्दसाल जातक ४६५ धम्मपद अट्ठकथा ४-३

प्रामाणिक, निःस्पृह व कर्तव्यदक्ष मनुष्याला कोठें झालें तरी व केव्हां झालें तरी शत्रु हे असायचेच. मत्सरी व महत्त्वाकांक्षी लोकांना आपल्या वरिष्ठांचा हेवा वाटणें व आंतून त्याचा दावा साधणें या गोष्टी कांहीं आजकालच्याच नाहींत. त्यांचीं पाळेंमुळें कालाच्या प्रचंड उदरांत फार खोलपर्यंत जाऊन रुजलेलीं आहेत. राजकारणी पुरुषांना तर त्याचा पदोपदी धोका असतो. त्यांच्या बोलण्याचा व कृतीचा विपर्यास करून पराचा कावळा करणें, अथवा त्यांच्या निःस्पृह कर्तव्यदक्षतेवर स्वार्थाचा शिक्का मारून त्यांची शक्य तेवढी वरिष्ठापुढें नालस्ती व नाचक्की करणें, या गोष्टी नीच लोकांना सहज करतां येतात.

फार लांब नको. कोसलचा सर सेनापति बंदुलचीच गोष्ट घ्या. तो मोठा शूर, अत्यंत निःस्पृह व कमालीचा प्रामाणिक. तसाच मोठा पराक्रमी व रणधुरंधर ! पण हे त्याचे सद्गुण त्यास पोषक न होतां मारकच झाले ! त्याच्या कडक व निःस्पृह वृत्तीमुळें तो कांहीं लोकांना अप्रिय झाला. व या दुष्टांनी वेळ प्रसंग साधून प्रसेनजित राजाजवळ त्याची निंदानालस्ती व चहाडी चुगली करून, त्याच्या मनांत वीष ओतण्याचा उद्योग चालविला. बंदुल हा राजाला पदभ्रष्ट करून ती गादी आपण बळकावण्याचा आंतून प्रयत्न करीत आहे अशी गप्प उठवून

राजाचे कान फुंकून टाकले. व त्याची वेळीं अवेळी पुनरावृत्ति करून राजाच्या मनांत नसती भीति व संशय उत्पन्न केला.

राजेलोक झाले तरी काय? त्यांना जगाची प्रत्यक्ष ओळख व पारख फार थोडी असल्यामुळें व दुसऱ्यांच्या ओंजळीनें पाणी पीणें हा त्यांचा जन्मस्वभावच बनून गेल्यामुळें त्यांचे कान हलके व मन भितरें बनल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

प्रसेनजितचीहि हीच अवस्था झाली. त्याचें मन साशंक झालें व तो बंदुलाचा कांटा कसा काढतां येईल या विचारांत चूर झाला. मात्र एवढी गोष्ट खरी कीं, त्या शूर सेनापतीचा दरारा राज्यांत व बाहेर सर्वत्र सारखाच होता. पण त्याच वेळीं हेंहि पण तितकेंच खरें कीं, तो जितका शूर व कडक होता, तितकाच राजनिष्ठ व स्वामिभक्त होता. !

इतक्यांत बातमी आली कीं सरहद्दीवर बंडाची वावटळ उठली आहे. राजाला एका दृष्टीनें तें पथ्यावरच पडलें. बंदुलला ताबडतोब बोलावणें पाठवून, तो आल्यावर बंडखोरांचा शक्य तितक्या लवकर बंदोबस्त करण्याचा निकडीचा हुकूम दिला.

राजाज्ञाच ती! मग तेथें विलंब कसला? बंदुल घरीं आला व कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन बंडखोरांना शासन करून बंडाळी शांत करण्यास त्याच दिवशीं त्यानें कूच केलें.

बंडखोरांचें राज्य म्हणजे औट घटकेचें! तें कायमचें असें थोडेंच असतें! येथेंहि असाच प्रकार झाला. बंदुल तेथें आला ही बातमी ऐकूनच, त्यांचें धाबें दणाणलें. तथापि त्यांनी छाती करून आलेल्या प्रसंगास तोंड देण्याचें ठरवून, त्याप्रमाणें प्रतिकार करण्याची तयारी चालविली.

तों इतक्यांत बंदुलनें त्यांस गांठलेंच! दोघांची चकमक उडाली आणि त्यांत बंडखोरांचा बीमोड झाला. पुढें कांहीं दिवस तेथें राहून

बंडखोरांची पाळेंमुळें खणून काढून पुन: तेथें शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करून बंदुल तेथून परत फिरला.

याच सुमारास आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. ती म्हणजे वासवक्षत्रियेचें गुपित स्फोट. विदूरक अजोळीहून परत निघाला तेव्हां त्याचा पाट दूधपाण्यानें धुवून शुद्ध करून घेणाऱ्या दासीनें विदूरकाच्या आईविषयीं सांगितलेली सत्यकथा ऐकून, विदूरक व त्याचे लोक यांच्या मनांत विजेचा धक्का बसल्याचा भास होऊन तेथें मनस्वी खळबळ उडून राहिली आणि ते सर्वजण श्रावस्तीस येऊन पोंचल्यावर त्यांतील एकानें ती गोष्ट राजाच्या कानावर घातली.

ती ऐकून राजास मनस्वी राग आला. संताप चढला. व आश्चर्य वाटलें. शाक्यांची त्याला मोठी चीड आली. पण करणार काय ? झालें तें होऊन गेलें. वासव क्षत्रियेची त्यानें एकांतांत चांगली खरडपट्टी काढली आणि युवराज विदूरकास बेवारस ठरविला ! असो.

बंदुल हा बंडखोरांचा बंदोबस्त करून परत श्रावस्तीकडे येत असतां मधें वाटेंत त्याचा एका ठिकाणी तळ पडला. या मोहिमेंत त्याचा मुलगाहि त्याच्या बरोबर होता. शिबिरांत ते रात्रीं निजले असतां अंधेरांत पांचसहाजण हळूच चोरून त्यांच्या शिबिरांत शिरून त्यांच्या शयनस्थानीं आले. चौघांनी मिळून त्या झोंपलेल्या बंदुलावर एकदम प्राणांतिक हल्ला करून त्यास जागच्या जागीं ठार मारून टाकिलें ! त्याच्या मुलाचीहि तीच गत केली ! ! अरेरे ! कोण दुष्ट चांडाळ ते ! त्या शूर सेनापतीचा अखेर अशा रीतीनें दुरंत व्हावा ना! ! !

वाचकहो, हें जें क्रूर व घोर पापकृत्य घडलें, त्याच्या मुळाशीं प्रत्यक्ष प्रसेनजितची फूस होती हें आम्ही सांगितलें, तर तुम्हास तें खरें वाटेल कां ? कदाचित् वाटणार नाहीं. पण वस्तुस्थिति मात्र तशी होती हें

अगदी खास. प्रत्यक्ष प्रसेनजितनेंच तो प्रसंग एका सेनाधिकाऱ्याकरवी घडवून आणला होता !! मग आतां आणखी काय ? राजकारण किती दुष्ट, कुटिल, पापी व पाताळयंत्री असतें त्याचा हा चांगला दाखला नव्हे, असें कोण म्हणेल ?

---

## लोहाचें सुवर्ण बनलें !

सामञ्ञ–फलसुत्त (दीघनिकाय, २)

भगवान बुद्धाचें दर्शन घ्यावें इतकें अजातशत्रूच्या मनांत भरतांच मग विलंब कसला ? दुसरे दिवशींच त्यानें माहुतास हत्ती सज्ज करण्याची आज्ञा दिली. व जीवक कुमारास बरोबर घेऊन भगवंतास भेटण्यासाठीं तो सरळ अमरवनांत येऊन दाखल झाला. भगवान यावेळीं भिक्षूंना समोर बसवून घेऊन धर्मोपदेश करीत होते. तेथें गेल्यावर भगवंतास नमस्कार करून त्यांच्या शेजारींच तो एका बाजूस जाऊन बसला.

पुढें कांहीं वेळानें उपदेश संपला व सर्व भिक्षू तेथून उठून आपापल्या जागीं निघून गेले. नंतर तो भगवंताजवळ येऊन त्यांना नमस्कार करून म्हणाला:—भदंत ! कृपा होईल तर कांहीं प्रश्न विचारीन म्हणतो. विचारूं कां ?

**भगवान** :—हो, खुशाल विचार, राजा ! तुला जें कांहीं विचारावयाचें आहे व विचारावेसें वाटतें तें खुशाल विचार. तुला आडकाठी कसली ?

**अजातशत्रु** :—या संसारांत नाना तऱ्हेचे लोक नाना तऱ्हेचे उद्योगधंदे करून धनसंपत्ति मिळवून आपला संसार यथाशक्ति थाटून सुखानंदांत कालक्रमणा करतात.

**भगवान** :—होय. ती लोकरीतच आहे.

**अजातशत्रु** :—त्याचप्रमाणें आपल्या उत्पन्नातून आपले आप्तइष्ट, भाऊबंद, यांस यथाशक्ति मदत करून त्यांचें जीवनहि सुखमय करण्यास झटत असतात. व मधून मधून दानधर्म करून आपला परलोकहि सुखाचा व्हावा, एतदर्थ पुण्यसंचयहि करीत असतात. या सर्व गोष्टी प्रापंचिकांना साध्य व शक्य आहेत.

**भगवान** :—होय. तें मला कबूल आहे. मग पुढें तुझें म्हणणें काय ?

**अजातशत्रु**:—आतां मला असें विचारायचें आहे कीं, हे संसारी लोक जसे आपल्या परिश्रमाचे याप्रमाणें प्रत्यक्ष फळ उपभोगतात तद्वत् संसार-त्यागी श्रमणांनाहि तसें कांहीं प्रत्यक्ष फळ मिळण्यासारखें आहे काय ?

**भगवान** :—कां नाहीं ? आहे, राजा, जरूर आहे. त्यांनाहि प्रापंचिकाप्रमाणें प्रत्यक्ष फळ असें मिळतेंच मिळतें.

**अजातशत्रु** :—खरं ?

**भगवान** :—हो, अगदी खरं. पण त्यापूर्वी तूं हा प्रश्न कधीं कोणास विचारला होतास काय ?

**अजातशत्रु** :—होय, भदंत. मी हा प्रश्न पूर्वी अनेकांस विचा-रला होता.

**भगवान** :—कोण ते ?

**अजातशत्रु** :—पूर्ण काश्यप व मस्करी गोशाल व इतर जे तीर्थंकर आहेत त्यांना मी हा प्रश्न विचारला होता.

**भगवान**:—मग काय झालं ?

**अजातशत्रु** :—त्यांच्यानं माझं समाधान करवलं नाहीं. आणि म्हणून भगवंतापाशी येऊन मी हा प्रश्न करीत आहे.

**भगवान**:—ठीक. ऐक तर मग आतां. जे त्यागशील सत्पुरुष अस-तात त्यांचा कोठें गेले तरी मान–सन्मान, आदर–सत्कार, बोलबाला हा होतोच होतो. हा भिक्षुजीवनाला लाभणारा पहिला प्रत्यक्ष फायदा होय.

**अजातशत्रु** :—हा एवढाच फायदा ?

**भगवान**: —शिवाय आणखीहि दुसरे आहेत. ते ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें मिळूं शकतात.

**अजातशत्रु** :—ते कोणते ? भदंत !

**भगवान** :—ते हे. जो विगतस्पृह आहे, जो कामनाशून्य आहे, जो पूर्ण ज्ञानि आहे, तसेंच जो जितेंद्रिय असून रागद्वेषादि द्वंद्वातीत आहे, अशा महापुरुषाचें दर्शन संसारी जिवांना दुःखशोकादिकांतून मुक्त करणारें आहे ! पिंजऱ्यातील पक्षी बाहेर स्वतंत्र वातावरणांत स्वच्छंद विहार करणाऱ्या पक्ष्याकडे पाहून, आपणहि पिंजऱ्यांतून सुटून तसाच सुखविहार करावा अशी जशी इच्छा करतो, तद्वत मुक्त पुरुषाचें दर्शन झालें म्हणजे संसारी पुरुषहि संसारबंधनांतून सुटून मुमुक्षु बनण्याची इच्छा करतो. भिक्षूच्या परमोत्कृष्ट जीवनाचा सुंदर आदर्श पाहून, आपणहि आपलें जीवन तसेंच साधुजीवन बनवून परमशांति–सुखाचा अलभ्य लाभ मिळवावा, असें त्यास वाटूं लागतें. भिक्षुजीवनाची रुचि लागली म्हणजे प्रपंचाचा वीट येऊन मनुष्य सर्वसंग परित्याग करून एकांतवास करण्यास प्रवृत्त होतो. व आत्मसंयम करून सत्यज्ञानप्रवण बनतो. मनुष्य हा भोगतृष्णेमुळेंच दुःखशोकाच्या डोहांत हरघडी गटंकळ्या खात असतो हें समजलें म्हणजे, जागृत झालेला मुमुक्षु मग त्याच्या वाटेस जात नाहीं. पुढें बसतां–उठतां, खातां–पीतां, निजतां–उठतां सारखी त्याची आत्मसंयमनावर दृष्टि दृढ व स्थिर होऊन, अखेर बंधमुक्त होऊन पक्ष्याप्रमाणें या अफाट जगांत तो स्वतंत्र विहार करूं लागतो. याप्रमाणें आत्मसंयमनाचा अभ्यास करून, क्रमशः उन्नत भिक्षुजीवनाप्रत प्राप्त होऊन सर्व दुःखमुक्त, रोगमुक्त, मायाबंधमुक्त होऊन, अखेर निर्वाणसुखास प्राप्त करून घेतो ! ! राजा, हेंच भिक्षुजीवनाचें प्रत्यक्ष फळ होय ! त्याचप्रमाणें अशा भिक्षूला लाभ–हानि, मान–अपमान, स्तुति–निंदा, संयोग–वियोग

याची बिलकूल बाधा होत नाहीं ! तो सर्वत्र समभावानें अखंड एकरस होऊन त्याचा जीवन प्रवाह नदीप्रमाणे शांत व संथ वाहूं लागतो. राजा, हेंहि एक भिक्षुजीवनाचें प्रत्यक्ष फल आहे. याप्रमाणें पवित्र जीवन प्राप्त करून घेतलेल्या प्रशांत भिक्षूच्या समतोल चित्ताला पाप व ताप स्पर्श करीत नाहींत. राजा, अशा प्रशांतचित्त भिक्षूला त्याच्या इच्छेप्रमाणे वाटेल तें रूप धारण करतां येतें ! त्याला दगडासारख्या कठीण पदार्थांतहि प्रवेश करतां येतो ! पाण्यावरून तो चालूं शकतो ! आकाशांत उडूं शकतो ! त्याला दिव्य दृष्टि प्राप्त होते ! तो वाटेल ती वस्तु निर्माण करूं शकतो ! राजा, मुक्तभिक्षूचें हें प्रत्यक्ष फळ आहे !! किती सांगू तुला या मुक्त भिक्षूचा महिमा ! त्याला भूत भविष्य व वर्तमानकाल याचें ज्ञान होतें ! प्राण्याच्या अंतःकरणांत काय चाललें आहे हें त्याला समजतें ! अशा मुक्त भिक्षूचा भवबंध सुटून, परम ज्ञानमय व अखंड आनंदमय अशा शाश्वत शांतिसुखाचा—श्रेष्ठ निर्वाणाचा—त्यास लाभ होतो !! राजा ! हे भिक्षुजीवनाचें परम व प्रत्यक्ष फल आहे !!

भिक्षुजीवनाचें हें प्रत्यक्ष फळ भगवंताच्या तोंडून ऐकून घेऊन राजा अजातशत्रु आनंदाने व आश्चर्याने रोमांचित झाला. व भगवंतास म्हणाला :—भगवन् ! पडलेल्याला उठवावें, हरवलेल्याला सांपडावें, आंधळ्याला दिसावें याप्रमाणें माझी अवस्था झाली आहे ! मला जें पाहिजे होतें, तेंच आपण सांगितलेंत. मला सत्यज्ञानाचा खरा राजमार्ग दाखविलात. माझें संतप्त हृदय आपला हा बहुमोल उपदेश ऐकून शांत झालें ! तृप्त झालें ! हृष्ट झालें !! भगवन् ! मी आपणास शरण आलो आहे. कृपा करून मला आपल्या चरणाजवळ आश्रय द्यावा. यापुढें मी आपला परम भक्त होऊन—अनन्य उपासक होऊन राहीन. पण—

बुद्धः——पण काय ? राजा ! कसली चिंता पडली आहे तुला ?

**अजातशत्रुः**——भगवन् ! महापापी आहे मी ! परम चांडाळ आहे !

महा दुष्ट आहे ! भदंत ! भयंकर पातक केलें आहे मी ! महान् अपराध घडला आहे माझ्या हातून ! !

बुद्धः—तो काय ? राजा !

अजातशत्रुः—राज्यवैभवाच्या लोभाने देवस्वरूप अशा माझ्या परम पूज्य पिताजीला बंदीत टाकून, तेथें त्यास अन्नान्न करून ठार मारलें आहे ! देवा ! माझा पिताजी म्हणजे केवढा धर्मनिष्ठ ! काय न्यायपरायण ! किती उदार ! किती मायाळू ! अशा माझ्या परमपूज्य पिताजीस देवदत्तासारख्या दुष्ट लोकाची मसलत ऐकून हाल हाल करून ठार मारलें ! ! असा पापी, चांडाळ, नराधम आहे मी ! तेव्हां मला हें भिक्षूचें शांत जीवन कसें लाभेल ? आपण गुरुमाउली आहा ! ! माझ्यावर अनुग्रह करून मला आपल्या पूज्य पादाजवळ आश्रय द्याल तर मी पुढें असलें पातक, अन्याय, अगर अधर्म करणार नाहीं ! ! गुरुदेव मला पदरांत घेणार नाहींत काय ?

बुद्ध :—राजा ! लोभाला बळी पडून, पापासक्त होऊन तूं घोर पातक केलें आहेस ! तो तुझा अपराध फार मोठा आहे ! पण ज्या अर्थी आतां तुला त्याबद्दल पश्चात्ताप होत आहे—झाला आहे, त्या अर्थी तुला आश्रय देण्यांत मला मुळींच किंतु वाटत नाहीं ! कारण जो पापाला पाप समजतो तो पुढें पाप करणार नाहीं ! !

याप्रमाणें सांगून भगवंतानी त्याला आपल्या उपासकांत दाखल करून घेतलें. तेव्हांपासून अजातशत्रु हा बुद्धाचा परम भक्त झाला. अर्थात् देवदत्ताचें व त्याचें सूत येथें संपूर्ण तुटलें !

---

# देवदत्ताचा अधःपात !

अट्ठकथा

देवदत्ताची बुद्ध होण्याची आशा आतां जवळ जवळ शून्यावरच येऊन ठेपली होती. अरेरे ! बिचारा देवदत्त ! आतां अगदी हताश व निराश झाला होता ! ! त्यानें एक नव्हे दोन नव्हे, तीन प्रयत्न अगदीं कसून करून पाहिले. पण दुर्दैवानें ते तीनहि अयशस्वी ठरले.

मारेकरी घातले पण ते त्यांस न मारतां उलट त्यांचे शिष्य होऊन परत आले ! नालगिरी हत्ती सोडला; तोहि बिचारा त्यांचा चेंदामेंदा न करतां त्यांच्या पायाखालची माती घेऊन डोक्यावर उधळून घेवूं लागला !! आपण स्वत: जाऊन त्यांच्यावर डोंगरावरून शिळा लोटून दिली. पण ती तरी काय, वाटेंतच दुसऱ्या शिळेवर आपटून आपणच बिचारी भंग होऊन गेली !

मग तो निराश व हताश होणार नाहीं तर काय होईल ? तशांतच राजा अजातशत्रुहि त्याला सोडून भगवंतास जाऊन मिळाला ! ! मग आतां त्याचें धाबेंच दणाणलें असलें तर त्यांत नवल तें काय ?

खरोखर आतां तर त्याच्या दु:खाला व फजीतीला पारावारच राहिला नाहीं. तो मनांतल्या मनांतच कुढूं लागला. आंतील दु:ख नि आग बाहेर बोलून दाखविण्याची सोय राहिली नाहीं. याचा परिणाम पुढें असा झाला कीं, त्याला शेवटी क्षयाची भावना झाली !

शरीर दिवसेदिवस खंगत चाललें व क्षीणता वाढूं लागली ! प्रकृति नाजूक बनली व पुढील मार्ग दिसेनासा झाला ! बिचाऱ्याचे पूर्वीचे ग्रह आतां सगळे पार बदलले व शनिराजाची वक्र दृष्टि तेथें खिळून बसली !! कालाय तस्मे नमः !!

पुढें राजगृहांत व मगध देशांत त्याचें एक एक कृष्णकारस्थान हळूं हळूं उघडकीस येऊं लागलें. लोकांना त्याच्या दुष्टपणाची व भोंदू-वृत्तीची साक्ष दिसंदीस पटत चालली व त्यामुळें तो लोकांच्या मर्जी-तून व विश्वासातून आस्ते आस्ते उतरत चालला.

अर्थात् त्याच्याकडे वाहणारा लोकाश्रयाचा महापूर पुढें साहजिकच ओसरत चालला आणि तशांतच अजातशत्रूनें आपणाकडून त्यास पोंचवावयाची नित्य चंदी अजिबात बंद करून सोडली. व आपण त्याच्या वाऱ्यासहि फिरकेनासा झाला ! ही बातमी लोकांत पसरतांच त्यांनींहि तोच कित्ता गिरविला.

कोणी विचारीना की कोणी पुसेना !! भोजनभाऊ पांखरें सगळीं उडून गेलीं ! विहारांत सगळा शुकशुकाटच शुकशुकाट ! एका काली भिक्षूंनी गजबजलेला तो विहार आता स्मशानाप्रमाणें भेसूर दिसूं लागला ! याप्रमाणें राजगृहांत त्याचा सगळा खेळ थांबून तेथें दिवस कंठणें हें त्यास आतां मोठें दुर्घट व दुःसह होऊन बसलें ! !

मगध देशांत तो इतका अप्रिय झाला कीं, तेथें अन्नूनें राहणें हें त्याला पुढें पुढें अशक्य होऊन बसलें. त्यापेक्षां दुसरीकडे कोठें तरी जाऊन राहणे हेंच अधिक श्रेयस्कर वाटूं लागलें. पण जाणार कोठें ? नि विचारणार तरी कोण ? कोण त्याचें आदरातिथ्य करील व पूर्वी-प्रमाणें त्याच्यावर चवऱ्या ढाळील ?

त्याला आतां मोठा पेंच येऊन पडला. तेथें राहून चालण्यासारखें नाहीं व बाहेर जाऊन निभावण्यासारखें नाहीं ! मग आतां करावें तरी काय ? मोठा पेंच येऊन पडला त्याला. अगदीं नाहीं म्हणावयाला एक आशेचा किरण दिसला आणि तो म्हणजे राजा प्रसेनजित्.

त्याचा आश्रय मिळवून श्रावस्तीस जाऊन तेथेंच अवशेष आयुष्य कंठावे असा विचार करून तो आपल्या कांहीं शिष्यांसह गयाशीर

सोडून श्रावस्तीच्या मार्गास लागला. व मजल दरमजल करीत करीत अखेर श्रावस्ती गांठून आपण आल्याची खबर त्यानें राजास श्रुत केली.

या वेळीं तो फार थकला होता. प्रकृति तोळा मासा झाली होती. क्षयाचा अम्मल जोरांत होता. तशांत मनांत चिंताग्नि भडकलेला! मग त्याची मनस्थिति कशी असेल याची वाचकांनीच कल्पना केलेली बरी.

त्याचा आशातंतु म्हणजे आतां हा एवढाच शिल्लक राहिला होता. बाकीचें जग त्याचें सगळें शून्यांतच गडप झालें होतें! देवदत्ताची वर्दी पोचून दोन दिवस झाले. पण राजाकडून 'होय—ना' कांहींच जबाब आला नाहीं. तो फार अधीर व चिंताकुल होऊन एकटाच एकांतांत विचार करीत बसला असतां राजदूताकडून वर्दी आली कीं, तूर्त त्याची तेथें सोय लागणेंसारखी नाहीं.

झालें. प्रत्यक्ष मृत्यूच त्याच्या डोळ्यापुढें आ वासून उभा राहिला! निराशेचा प्रचंड डोह व प्रयळकाळचा घनघोर अंधःकार!! देवदत्ताचें काळीज थरथर कांपू लागलें! व अंतःकरणांत दुःखाचा प्रचंड भडका उठला! त्याचे हातपाय लटपटले व जीविताशा अगदीं संपुष्टांत आली!

राजगृहांत पूर्वी एके काळीं ज्याच्या मस्तकावर सोन्याच्या चवऱ्या ढळत असत, त्याला आज जगांत पुसणारा असा कुत्रासुद्धां राहिला नाहीं, हा दैवयोग किती विचित्र आहे! विचारा देवदत्त आतां अगदीं मेटाकुटीस आला.

तशांतच रोगाचा अम्मल वाढत चालला व दोनप्रहरची भ्रांत पडत चालली! कांहीं थोडे शिष्य होते, पण ते तरी विचारे करणार काय? देवदत्ताचे शिष्य म्हटलें की लोक त्यांना शेजारचा दरवाजा दाखवीत व आपण तोंड फिरवून आंत जात! खरोखरच देवदत्ताचें सगळें पाप आतां तोंड आ वासून त्याच्यापुढें

दत्त म्हणून उभें राहिलें ! व तें पाहून तो भीतीनें गांगरून चळचळ कापूं लागला ! !

अशा विपन्न अवस्थेंत त्याला गुरुमाउलीची–भगवान बुद्धदेवाची–आठवण झाली. कांहीं जरी झालें नि कसें जरी असलें तरी बुद्धदेव ते बुद्ध देवच ! दयेचे सागर व मायेचे मोहर ! जगाची जगन्माउली ! व कृपेची शांत साउली ! ! तेथें जाऊन आपले सर्व अपराध त्यांच्या पुढें ओकून त्यांची क्षमा मागून त्या पूज्य पादावर डोकें ठेवून एकदाचा प्राण सोडावा, असा विचार करून तो आतां हताश व अनन्यगतिक होऊन त्यांच्याकडे जावयास निघाला.

कर्मधर्मसंयोगानें भगवंताचा मुक्काम नुकताच तेथें म्हणजे श्राव-स्तीस येऊन पडला होता. तेथें ते जेतवनांत उतरले होते. आपले कोकालिकादि चार शिष्य बरोबर घेऊन तो त्यांस भेटावयास म्हणून मेण्यांतून निघाला.

वाटेंत एक लहानसें सरोवर होतें. तेथें उतरून स्नान करून मग भगवंतास भेटावें असा विचार करून तो तेथें उतरला व सरोवरांत जाऊन स्नान करून वर येत असतां त्याचा पाय फसकन चिखलांत रुतला. त्यासरशी एकदम त्यास भोंवळ आली व धपकन् तो तेथेंच जमीनीवर आदळला. व तोंडांतून भडभड रक्त वाहूं लागलें !

शिष्य येऊन त्याला उठवून बाजूस बसवून म्हणाले कीं 'देवदत्तजी हें काय ? तोंडातून रक्त वाहूं लागलें कीं ! पण तेथें देवदत्त होता कोठें ? त्याचें प्रेत होतें तें ! ! याप्रमाणें दुर्दैवी देवदत्ताचा शेवटीं अशा तऱ्हेचा शोकजनक दुरंत झाला ! !

ही बातमी भगवंतास कळली तेव्हां त्यांनी पुढील उद्गार काढलें:—

**' इह तप्पति पेच्च तप्पति पापकारी उभयत्थ तप्पति ।**
**' पापं मे कतं,' ति तप्पति भिय्यो तपति दुग्गतिं गतो ॥**

धम्मपद, १–१७

भावार्थ—भिक्षूहो, जो पापकर्मा आहे तो या लोकीं व परलोकीं याप्रमाणें उभय लोकींहि ताप पावतो. 'मी पापकर्म केलें' या विचारानें तो जळत असतो, आणि दुर्गतीला गेल्यावर तर तो अधिकच संतप्त होतो !

---

## अजातशत्रूची कोसलवर चढाई

(१) अट्ठकथा (२) संयुत्तनिकाय ३-२-४-५)

बिंबसार राजाची शोचनीय मरण वार्ता कोशलाधिपति प्रसेनजित् यास समजली, तेव्हां त्याला अत्यंत दुःख झालें आणि त्याच वेळेस अजातशत्रूची मोठी चीडहि आली. बिंबसार हा प्रसेनजित् याचा मेहुणा. म्हणजे प्रसेनजित्‌ची बहीण कोसलादेवी ही त्यास दिली होती. अजातशत्रु हा तिचा सख्खा मुलगा नसून सावत्र मुलगा होता.

या कोसलदेवीच्या लग्नाच्या वेळीं तिचा बाप महाकोसल यानें तिच्या खासगी खर्चासाठीं म्हणून कोसल व मगध यामधला एक लाखाचा काशी प्रांत तिला तोडून दिला होता. बिंबसाराच्या शोचनीय मरणानंतर पुढें लवकरच कोसलादेवीहि वारली. तिच्या पश्चात् तो प्रांत अजातशत्रूकडे ठेवणें प्रसेनजित् यास योग्य वाटलें नाहीं. आणि म्हणून त्यानें तो प्रांत परत कोसलास जोडण्याचें ठरवून ती योजना ताबडतोब अमलांत आणली.

या सुमारास भगवान श्रावस्तीकडे निघाले होते. रस्त्यावर श्रावस्ती-नजीकच राजाची एक सुंदर पुष्पवाटिका होती. तेथील माळ्याला मल्लिका नांवाची एक मुलगी होती. ती माळीण पोर खरी, पण ब्रह्म-देवाच्या हातची ती एक सुंदर व मनोहर अशी दिव्य कलाकृति होती ! केवढें रूप लावण्य तिचें ! नव—तारुण्य ! गौर कांति ! आणि तशांत तें तिचें अप्सरेला लाजविणारें मोहक मधुर सौंदर्य ! ! मग त्या दिव्य व मनोहर रत्नाचा अभिलाष कोणाला होणार नाहीं ?

बुद्ध भगवान त्या पुष्पवाटिकेवरून जात असतां मल्लिकेनें त्यांना लांबूनच पाहिलें व चटकन् आंत जाऊन पिठाचा एक मधुर पिंड घेऊन बाहेर येते न येते, तों भगवान त्या वाटिकेपाशी येऊन थडकलेच.

दारासमोर येतांच त्यांना थांबवून त्यांच्या भिक्षापात्रांत तिनें तो पिंड भक्तिभावपूर्वक अर्पण केला. व त्यांना नमस्कार करून हात जोडून आपण बाजूस उभी राहिली. भगवानांनीं त्याचा स्वीकार करून तिला अभिवादन करून तेथून ते पुढें चालते झाले.

थोडें पुढें गेल्यावर आनंदास उद्देशून म्हणाले–'आनंदा ! ही माळीण पोर फार नशीबवान आहे बघ. तिच्यापासून आपल्या धर्माला पुढे फार मोठी मदत होणार आहे !' याचा त्या वेळी आनंदाला काय किंवा मल्लिकेला काय फारसा अर्थबोध झाला नाहीं.

पुढें काशीप्रांत आपल्यास न विचारतां परत कोसल राज्यास जोडल्याचें ऐकून अजातशत्रूस फार संताप आला. प्रसेनजित्‌ची ही दांडगाई त्यास मानवली नाहीं. व तो प्रांत पुनः आपल्या कबजांत मिळविण्याचा त्यानें निश्चय केला.

अजातशत्रु म्हणजे कांहीं लहानसहान प्रस्थ नव्हतें ! त्या वेळीं त्याची गणना बलाढ्य व प्रमुख राजांमध्यें गणली जात होती. उपमा देऊन सांगावयाचें म्हणजे तो जवळ जवळ दिल्लीश्वर औरंगजेबाचा प्रति अवतारच होता ! औरंगजेबाप्रमाणेच त्यानेंहि आपल्या बापास तुरुंगांत डांबून तेथें त्याचें अन्नपाणी तोडून त्यास ठार मारलें ! नंतर त्यानें आपल्या भावांस मारण्याचाहि प्रयत्न केला. पण ते बिचारे त्याच्या हातातून निसटून भिक्षु होऊन भगवंताच्या संघांत दाखल झाले ! आणि म्हणून त्यांचा बचाव झाला ! अर्थात् तो मोठा निर्दय, धाडसी व शूर होता.

पुढें लवकरच मोठें सैन्य जमवून तो कोसल राज्यावर चाल करून गेला. ही गुणगुण कोसलाधिपतीस त्याच्या गुप्त हेराकडून आधींच लागलेली होती. म्हणून तोहि त्या तयारींतच होता. हा प्रसेनजित् झाला तरी मोठा शूर व पराक्रमी राजा होता. अजातशत्रूचें त्याला मुळींच भय वाटलें नाहीं. आपलें सैन्य घेऊन तो त्यास सामोरा गेला. दोघांची एके ठिकाणी गांठ पडली व लढाईला तोंड लागलें. मोठी रणधुमाळी माजून राहिली. पण दुर्दैवानें या चकमकींत प्रसेनजित्‌ला यश लाभलें नाहीं. तो लढाईत हरला व पराजय घेऊन परत श्रावस्तीकडे निघाला.

परत येत असतां वाटेंत एक महत्वाची गोष्ट घडली. ती सांगून पुढें जाणें आम्हांस इष्ट वाटल्यानें तिचा उडता उल्लेख करून मग पुढें जातों. श्रावस्तीजवळ आल्यावर राजास तहान लागली म्हणून तो शेजारच्या पुष्पवाटिकेंत शिरला. इतक्यांत ती मल्लिका—ती दिव्य अप्सरा—त्याच्या समोर आली. त्याची तिच्यावर दृष्टि पडली. त्याचे नेत्र तिच्या नेत्राशी जाऊन भिडले ! राजा तें अपूर्व सौंदर्य पाहून दंग झाला ! मल्लिकेच्या मोहक नेत्रानें लगेच लोहचुंबकाचें कार्य केलें.

सम्राट मोहवश झाला व तिला घोड्यावर बसवून घेवून राजवाड्या-कडें निघाला. पुढें त्यानें तिच्याशी विवाह करून तिला राज्ञीपदावर चढविलें व याप्रमाणें ती माळीण कन्या राजपत्नी होऊन मल्लिकेची 'कोसलमल्लिकादेवी' झाली ! ! पुढें ही मल्लिकादेवी भगवंताची एक-निष्ठ उपासिका बनून त्यांच्या भिक्षुसंघाला वेळोवेळीं मदत करती झाली. असो.

---

## 'शत्रूचे मित्र झाले!'

अट्ठकथा

आपला पराभव झाला ही गोष्ट कोसलाधिपतीस फार लागून राहिली. तो मनांत सारखा कुढत राहिला. त्यास दिवसा चैन पडेना व रात्रीं डोळा लागेना! कांहींही होवो, पुनः एकदा सामना करायचा असा निश्चय करून, त्याप्रमाणें तो जमवाजमव करण्याच्या उद्योगास लागला. रात्रंदिवस खपून पुनः लढाईची सिद्धता केली व योग्य संधि साधून मगधावर हल्ला चढविला.

झालें. दोघांची झुंज लागली. या खेपेस प्रसेनजित्‌ची तयारी अगदीं जय्यत होती. त्या मानानें अजातशत्रूची तयारी फिक्की व ढिली पडली. दोघेहि प्रबल योद्धे! व बलाढ्य राजे! एकापेक्षां एक पराक्रमी! मग या खेपेस रणदेवतेनें उग्र स्वरूप धारण केलें असल्यास त्यांत नवल तें काय? होय, रणचंडीचा थयथयाट अत्यंत भीषण व प्रखर होता, हें खरें. पण शौर्याला व पराक्रमालाच विजयश्री सदैव माळ घालते अशी खात्री कोठें आहे? दैव ज्याला अनुकूल त्यालाच ती वरणार!

या वेळी दैव प्रसेनजित्‌ला अनुकूल होतें. अजातशत्रूवर त्याची इतराजि होऊन लढाईत तो पराभूत झाला. इतकेंच नव्हे तर प्रसेनजित्‌नें त्यास जिवंत पकडून, कैद करून श्रावस्तीस नेले!! अर्थात् श्रावस्तीस मोठा विजयोत्सव झाला, हें निराळें सांगावयास नकोच.

ही गोष्ट भगवंतांस समजतांच ते श्रावस्तीस आले. भगवान जेतवनांत आले आहेत, ही खबर सम्राटास लागतांच संध्याकाळीं त्यांच्या दर्शनास आला व आपण मोठा पराक्रम गाजवून, अजातशत्रूची खोड मोडली व त्यास जिवंत पकडून कैदखान्यांत आणून डांबून ठेविलें आहे, असें भगवंतांस अभिमानपूर्वक सांगितलें.

भगवंतांनी त्याचें सर्व सांगणें शांतपणानें ऐकून घेतलें आणि नंतर ते त्याला म्हणाले—राजन्! तुझा जय झाला हें खरें. पण त्यापासून तूं

एक वैरी निर्माण करून घेतलास हें कुठें तुला कळलें? बाबा, हा जय —लढाईंत मिळविलेला जय—म्हणजे वैरी नाहींसा करण्यासारखें नसून नवीन वैरी उत्पन्न करण्यासारखें आहे म्हणून माझा उपदेश ऐकः—

**जेयं वेरं पसवति दुःखं सेति पराजितो।**
**उपासन्तो सुखं सेति हित्वा जयपराजयं॥**

(धम्मपद १५-५)

जय हा वैर निर्माण करणारा आहे; कारण जो पराजित झाला आहे तो दुःखविव्हल होतो. जो शांत आहे तो हे जय व पराजय यांचा विचार न करतां सुखांत कालक्रमणा करतो.

हें भाषण ऐकल्यावर प्रसेनजित् म्हणाला—'मग आतां मी काय करावें, भदंत? पुढची दिशा आपण दाखवाल तसें मी वागण्यास तयार आहे. भगवंतांनी मला या बाबतींत योग्य मार्ग दाखवावा अशी माझी विनंति आहे.

राजाचें हें भाषण ऐकून भगवान त्यास म्हणाले—राजा! अजातशत्रु हा तुझ्यासारखाच प्रबल व पराक्रमी राजा आहे. त्याचें वैर तूं बांधून घेऊं नयेस. उलट त्याचें मित्रत्व तुला फायदेशीरच होईल. मला विचारशील तर त्याला तुरुंगातून मुक्त करून सोडून दे व त्याचें सख्य संपादनार्थ तुझी उपवर मुलगी वजिरा ती त्याला देऊन त्याचा संबंध जोड आणि ज्याकरतां हा संग्राम झाला तो काशी प्रांत पुनः मुलीला तोडून दे! म्हणजे या प्रसंगाचा परिणाम शेवटीं गोड होऊन तुझें वजन व सामर्थ्य अधिक वाढेल!

भगवंताचा हा सदुपदेश प्रसेनजितला पूर्ण पटला व दुसरे दिवशी सकाळीं अजातशत्रूस बंधमुक्त करून, भगवंताच्या सांगण्याप्रमाणे वजिरा त्यास देऊन वर काशी प्रांत मुलीला तोडून दिला! या प्रणें हें भडकलेलें प्रकरण भगवंतांच्या गोड उपदेशावरून शांत होऊन

दोन्ही राष्ट्रांत पुनः सख्य व प्रेम नांदू लागलें. अर्थात् शत्रूचे अखेर मित्र झाले !

---

## गुप्त कारस्थान

धम्मपद, अट्ठकथा ४–३ भद्दसाल जातक ४६५

श्रावस्तीच्या एका उपवनांत एका कोपऱ्यांतील विशाल वृक्षाखालीं दोघे तरुण संध्याकाळच्या वेळीं एकांतांत बसून बोलत होते. कसलें तरी गुप्त खलबत चाललें होतें त्यांचें. बोलण्याच्या ओघांत त्यांतला एक दुसऱ्यास म्हणालाः—'तूं कांहींहि म्हण. हें जें झालें तें कांहीं ठीक झालें नाहीं. त्यांनी राजाला फसवलं त्यांत तुझा अपराध काय ? तूं निरपराधी आहेस.

**दुसराः**—पण त्यांचं पातक मला भोवलं कीं !

**पहिला.**—शाक्यांनीं तरी असं करावं कां ? हा त्यांचा नीचपणा नव्हे कां ? सम्राटाला असं फसवणं हें नीट नव्हं.

**दुसराः**—त्याबद्दल सूड घेणारच आहे मी ! पण तो प्रश्न आतां नाहीं. आज म्हणजे मजवर झालेला अन्याय दूर कसा करावा हा आहे. या कामीं तुझी मदत पाहिजे मला. आज तूं सर सेनापति आहेस हें खरं. पण तेथें तूं कायमचा राहशील ही खात्री काय ? तुझ्या चुलत्याची गोष्ट आहे ना डोळ्यापुढं ? केवढा शूर ! किती प्रामाणिक ! केवढा राजभक्त ! पण त्याची गत शेवटीं काय झाली ? त्याला बक्षीस काय मिळालें ? छातीत खंजीर ! मग तुझी तरी शाश्वति काय ?

**पहिलाः**—तें मी जाणत आहे. राजाचं मन केव्हां कसं फिरेल नि कोणाचा कसा घात करील याचा नेम नसतो. चंचल नि संशयी लोक ते ! !

**दुसराः**—बंदुलासारखा शूर व स्वामिनिष्ठ सेवक मिळायला सात जन्माचं पुण्य लागतं.

**पहिलाः**—राजा संशयी व हलक्या कानाचा असला म्हणजे अशा गोष्टी घडून येतात. त्याला उपाय नाहीं.

**दुसराः**—हें मी कबूल करीत नाहीं. उपाय कां नाहीं? आहे. जरूर आहे. तूं मनावर घ्यायला हवंस. इतकंच काय तें.

**पहिलाः**—कसला उपाय सुचवणार तूं मला?

**दुसराः**—मी सगळा सुचवीन. पण तें तुला पसंत पडावं ना.

**पहिलाः**—आधी सांग तर खरा. मग पसंत नापसंतीचा प्रश्न.

**दुसराः**—जशास तसं.

**पहिलाः**—म्हणजे?

**दुसराः**—तुझ्या चुलत्याचा व त्याच्या शूर पुत्राचा कपटानं खून करविणाऱ्या राजाच्या पदरांत तसलंच माप टाकावंस तूं! मित्रा, तुझा अधिकार फार मोठा आहे. आज कोसल राज्याची सगळी शक्ति तुझ्यांत एकवटली आहे. मनांत आणशील तर काय वाटेल तें होईल. फार काय, राजा सुद्धां होऊं शकशील तूं!

**पहिलाः**—मग मी काय करूं म्हणतोस तूं?

**दुसराः**—एका दगडानं दोन पक्षी मार म्हणतो मी.

**पहिलाः**—तें कसं?

**दुसरा**—राजाला पदभ्रष्ट कर. म्हणजे दोन गोष्टी केल्याचं श्रेय येईल तुला.

**पहिलाः**—तें कसं काय?

**दुसराः**—मित्रकार्य व पितृकार्य तडीस नेल्याचं पुण्य लागेल तुला. राजानं केलेल्या दोन अन्यायाचं प्रायश्चित्त मिळेल त्याला. मला राजा कर म्हणजे मित्रकार्य झालं. मला राजा करणं म्हणजे प्रसेनजित्‌ला पदच्युत करणं. अर्थात् पर्यायानं बंदूलच्या गुन्हेगारास शिक्षा करणं. या दोन्ही गोष्टी तुला सहज करतां येतात. मी राजा झालो म्हणजे तुला कशाची भीति नाहीं. तूं कायमचा माझा सेनापति राहशील.

माझंहि कार्य झालं आणि तुझीहि शाश्वति झाली. शिवाय गुन्हेगाराला अद्दल घडली ती निराळीच ! मग ही माझी सूचना तुला पसंत पडणार नाहीं काय ?

**पहिला**:—मला तें सगळं समजतं. पण.

**दुसरा**:—आतां कसलं तें 'पण' ?

**पहिला**:—आजच मला याचा कांहींच निश्चय करतां येत नाहीं. थोडा अवकाश दे मला याचा विचार करण्याला.

**दुसरा**:—तें कांहीं असो. ही गोष्ट तुला केलीच पाहिजे. तुला भीति वाटते ?

**पहिला** :—भीति ?—तशी नाहीं. पण तुझी सूचना कशी अमलांत आणतां येईल आणि ती अगदीं बेमालूम कशी वठेल, याचा विचार केला पाहिजे मला. चुटकीसरशी साध्य होईल, इतकी कांहीं साधी व सोपी गोष्ट नाहीं ती. मला त्या विषयी फार खोल व गुप्त विचार करावा लागेल. साध्य झाली तर ठीक. नाहींतर प्राणावरचा प्रसंग !

**दुसरा** :—बरं, विचार कर.

**पहिला**:— मात्र इतकं कर. हें सर्व दोघांतच राहूं दे.

**दुसरा**:—तूं का सांगावयास पाहिजे हें मला ? ती काळजी नको तुला. उलट तूंच संभाळ म्हणजे झालं ?

एवढयावरच त्यांचा संवाद मिटला. नंतर ते दोघे तेथून उठले व घरच्या मार्गास लागले. वाचकहो, ते कोण हें तुम्हीं ताडलें काय ? पहिला हा बंदुलाचा पुतण्या—दीर्घचारायण व दुसरा प्रेसनजितचा मुलगा विदूरक ! आतां या संभाषणाचा परिणाम काय झाला हें पुढें इतक्यांतच कळून येईल.

---

# कोसलाधिपाचें सिंहासन गडगडलें

धम्मपद, अट्ठकथा ४–३
भद्रसाल जातक ४६५

बुद्ध लोकांना धर्मोपदेश करीत गांवोगांव फिरत कांहीं दिवस घालविल्यावर अखेर त्यांचा तळ शाक्य राष्ट्राच्या सीमेवरील उलुपा नांवाच्या गांवीं येऊन पडला. या वेळीं भगवानाचें वय ७५–७६ वर्षांचें होतें.

ही बातमी प्रसेनजित् यास लागली. तेव्हां त्यानें या खेपेस भगवंतांचें दर्शन दरबारी थाटांत घ्यावें, असें मनांत ठरवून त्याप्रमाणें व्यवस्था ठेवण्यास सर सेनापतीस सांगून पाठविलें. अर्थात् राजाज्ञाच ती! मग तेथें विचार कसला नि विलंब कोठला? राजाज्ञेप्रमाणें व्यवस्था ठेवण्यास खालच्या अधिकाऱ्यांना ताबडतोब हुकूम सुटले.

त्या दिवशीं रात्रीं दीर्घचारायणाच्या घरीं मोठी गडबड व धांवपळ चालू झाली. विदूरक व इतर कांहीं सेनाधिकारी यांची एक गुप्त मजलस तेथें भरून कसल्या तरी एका महत्वाच्या गोष्टीबद्दल सूक्ष्म खल होऊन कसला तरी एक निर्णय ठाम करण्यांत आला. आणि मग ती बैठक बरखास्त होऊन, तेथें जमलेली मंडळी आपापल्या घरीं निघून गेली.

घरीं आल्यावर पुन: या लोकांनीं आपापल्या हाताखालच्या विश्वासूक अधिकाऱ्यांना रातोरात घरीं बोलावून घेवून, त्यांना कांहीं कानगोष्टी सांगून त्याप्रमाणें अंतस्थ व्यवस्था चोख ठेवण्यास बजावून सांगितलें. त्याप्रमाणें रात्रभर गडबड व धांवपळ चालून कसलें तरी एक गुप्त कारस्थान शिजून चांगलें तयार झालें. व त्याप्रमाणें सकाळीं पहाटेस 'सब ठीक है' ची वर्दी दीर्घचारायणास पोंचविण्यांत आली. इतक्यांत विदूरक हा घोड्यावर स्वार होऊन तेथून कोठें तरी बाहेर निघून गेला.

आपला चुलता बंदुल यास राजानें अन्यायानें ठार मारलें, ही गोष्ट दीर्घचारायणाच्या अंत:करणांत शल्याप्रमाणें अत्यंत खोल रुतून बसली होती. व त्याचा प्रसंग साधून सूड उगविण्याचा विचार मनांत दबा धरून राहिला होता. प्रस्तुतची संधि तें कार्य साधून घेण्यास अत्यंत योग्य व अनुकूल आहे असें वाटल्यावरून त्यानें आपल्या अधिकाराचा फायदा घेऊन, हा व्यूह रचला व सारखें डिवचत असलेलें मनोशल्य एकदाचें बाहेर उपटून टाकण्याचा घाट घातला.

शिवाय आणखी एक गोष्ट त्यांत साधत होती. ती म्हणजे मित्रकार्य. विदूरकाचें मनोवांछित त्यांत साध्य होण्यासारखें होतें. मग ही संधि तो काय म्हणून वाया घालवील ? खरा मुत्सद्दी होता तो !

ठरल्याप्रमाणें प्रसेनजित् हा आपले कांहीं निवडक अधिकारी व लवाजमा बरोबर घेऊन भगवंतास भेटावयास निघाला. त्यांत दीर्घचारायण व कांहीं सेनाधिकारी हेहि होते, हें निराळें सांगावयास नकोच. त्या वेळीं प्रसेनजित् फार म्हातारा झाला होता. म्हणजे त्याचें वय ऐंशीच्या वर गेलें होतें. शरीरानें तो फार थकला होता. जीविताचा काय भरवसा, भगवंताचें एकवार दरबारी थाटांत दर्शन घ्यावें, कदाचित तेंच शेवटचें होणार नाहीं म्हणून कशावरून, असा विचार करून त्यानें हा बेत केला होता.

उलुपी गांवी आल्यावर भगवंताचा जेथें मुक्काम होता तेथें तो गेला व त्यांस भेटावयाच्या पूर्वी आदरार्थ म्हणून आपल्या डोक्यावरील राजमुगुट व अंगावरील इतर राजचिन्हें काढून तीं त्यानें दीर्घचारायणाच्या हातीं दिलीं व आपण एकटाच भगवंतास भेटावयास आंत गेला.

विदूरक तेथें गुप्त वेषांत हजर होताच. दीर्घचारायणानें त्यास पाहिलें व राजा आंत गेल्यावर त्यास पुढें येण्यास डोळ्यानें खुणावलें. चटकन् विदूरक पुढें येऊन उभा राहिला. दीर्घचारायणानें 'विदूरक महाराज की जय !' असा जयघोष करून तो राजमुगुट त्याच्या डोक्या-

वर ठेविला ! व इतर राजचिन्हें त्याच्या अंगावर चढविलीं ! त्यासरशी तेथें एकच जयघोष गर्जून विदूरकाच्या नांवानें शिंग फुंकण्यांत आलें ! व तेथील सर्व अधिकारी त्यास लवून मुजरा करून त्याचें राजा म्हणून स्वागत केलें ! इतक्यांत परत फिरण्यास सरसेनापतीची आज्ञा झाली. त्यासरशी ते सर्व लोक विदूरकास बरोबर घेवून राजधानीकडे कूच करते झाले !! हा सर्व प्रकार इतका बेमालूम व इतका विद्युद्वेगाने चमकून गेला कीं, तेथील इतर लोकांना आश्चर्याचा विलक्षण धक्का बसला ! हें काय झालें व कसें झालें याची त्यांना कल्पना सुद्धां करतां येईना ! इतका तो चमत्कार झाला !

ही हकीकत ऐकून प्रसेनजित् तर अगदी दिङ्मूढ होऊन गेला ! त्यास कांहीं सुचेना कीं सवरेना !! या आघातानें तो अगदी वेडा होऊन गेला !! उघडच आहे. वयानें तो ऐंशीच्या वर गेलेला—म्हणजे जवळ जवळ अगदी पिकलेलें पान ! सर्व अवसान थकलेलें ! इंद्रियें गलित झालेलीं ! उत्साह निघून गेलेला ! अगदींच नाहीं म्हणण्यापेक्षां प्राण तेवढा कुडींत चिकटून राहिलेला ! बाकीचा सगळा ग्रंथ जवळ-जवळ संपुष्टांत आलेला !!

अशा स्थितींत अकल्पित असा दुर्धर प्रसंग अकस्मात ओढवलेला पाहून, तो हतमूढ व हतगर्भ झाला असला तर त्यांत आश्चर्य तें काय ? होय, त्याची तशी चमत्कारिक व करुणास्पद स्थिति झाली, हें कांहीं खोटें नाहीं. आणि कोणाची होणार नाहीं ? ज्याच्यावर आपला सर्व भार नि पूर्ण विश्वास असा सर सेनापतिच जर प्रत्यक्ष फितूर होऊन उलट पडल्यावर मग राजाने तरी कोणाकडे पाहवें नि कोणाकडे जावे ? क्षणमात्र तो भान विसरून पुतळ्याप्रमाणें स्तब्ध झाला हें मात्र खरें !

आतां पुढें कोठें जावें नि काय करावें हें त्यास सुचेनासें झालें. तो मोठ्या विवंचनेंत पडला. त्याची मति कुंठित झाली व मन गोंधळांत

पडलें. हा काय चमत्कार झाला हें कोडें त्यास उलगडेनाच. तथापि हें कसें जरी असलें नि किती जरी झालें तरी राजा तो राजाच ! म्हातारा झाला म्हणून काय झालें ? जातीचा सिंहच ! त्याची छाति कोणाला येणार आहे ? त्या विपन्न स्थितींतच त्याची तेजस्वी क्षात्रवृत्ति एकदम जागृत झाली व झालेल्या अपमानाचें व विश्वासघाताचें चांगलें उट्टें काढावें म्हणून, आपला महाप्रतापी जामात जो अजातशत्रु त्याची या कामीं मदत मागण्यास म्हणून तो तेथून तावडतोब निघाला.

दिवस ना रात्र, ऊन ना वारा, याची परवा न करतां सारखा प्रवास करून अखेर तो कसाबसा राजगृहास येऊन पोंचला. पण ती रात्रीची वेळ असल्यामुळें तेथील वेशीचे दरवाजे बंद झाले होते. म्हणून पहाट होईपर्यंत तेथेंच बाहेर कोठें तरी विश्रांति घ्यावी व पहाट झाली म्हणजे गावांत प्रवेश करावा असा विचार करून, विश्रांतिसाठीं म्हणून तो अडोशाची जागा पाहावयास इकडे तिकडे नजर फिरवीत असतां शेजारीच एक पडवी त्यास दिसली. तेथें जाऊन तो खालीं बसला न बसला तो इतक्यांत छातींत एक मोठी कळ उठली आणि लहानशी उचकी येऊन त्यांतच त्याचें देहावसान झालें ! अरेरे ! बिचारा प्रसेनजित् ! त्याचा असा अखेर अंत व्हावा ना ! दैवाचा खेळ किती विचित्र आहे ! !

---

## मोहरा हरपला !

अट्ठकथा

(२) सं. नि. ४५-२-३

जेतवन म्हणजे केवढें आनंदी ! किती प्रसन्न स्थान ! कोण तेथील उल्हास नि काय तो उत्साह ! भगवंताचा विहार म्हणजे तत्कालीन धार्मिक चैतन्याचें मूळ आगरच ! ! पण आज काय ? जिकडे तिकडे अगदी सामसूम ! औदासिन्याची दाट छाया सर्वत्र पसरून

राहिलेली ! कोणाच्या तोंडावर हास्य नाहीं की उत्साह नाहीं ! जो तो हिरमुसलेला व दुःखी झालेला ! !

'केवढा घात झाला नि किती वाईट झालें ! ' याशिवाय तेथें आज दुसरी भाषाच नव्हती ! प्रत्येकाचा चेहरा म्लान व मलिन झालेला ! फार काय, झाडावरील पक्षी सुद्धा आपल्या चोंची पंखांत खुपसून झाडांच्या फांद्यावर योगस्थ होऊन बसलेले ! ! जिकडे तिकडे शांत व स्तब्ध वातावरण ! हूं नाहीं कीं चूं नाहीं ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या आनंदी जेतवनावर आज अभूतपूर्व दुःखाची व औदासिन्याची दाट छाया पसरून राहिली होती ! !

इतक्यांत आनंद वर्दी घेऊन फिरत निघाला कीं, भगवंतानें सर्व भिक्षूंस एकत्र जमा होणेस आज्ञापिलें आहे. याप्रमाणें वर्दी फिरतांच ज्याला ज्याला ती पोंचली, तो तो सरळ विहाराकडे निघाला. थोड्याच वेळांत तेथील सर्व भिक्षु भगवंताजवळ येऊन जमा झाले.

त्यांना उद्देशून भगवान म्हणाले—भिक्षुहो ! आज तुम्हांला एक वाईट बातमी सांगण्याचा प्रसंग मजवर आला आहे. ती तुम्हासहि कळली असेलच ! धर्मसेनापति सारीपुत्र परवां म्हणजे पौर्णिमेच्या दिवशीं आपल्या जन्मस्थानी परिनिर्वाण पावला ! ! भिक्षूहो ! स्थविर सारीपुत्र म्हणजे माझा उजवा हात होता ! तो माझा धर्मसेनापति होता ! माझ्या पश्चात धर्मचक्र आतांप्रमाणेंच चालू ठेवणारा असा तो स्थविरश्रेष्ठ होता ! तो महाप्रज्ञावान होता ! मोठा त्यागी होता ! सतत उद्योगी होता ! परम संतुष्ट होता ! ! भिक्षू हो, अशा थोर व श्रेष्ठ सारीपुत्राला वंदन करा ! !

पुनः आणखी, भिक्षुहो, तो मोठा जितेंद्रिय असून अगदी निष्काम होता ! त्याचा सर्व चित्तमल झडून गेल्यामुळें ढगांतून निघालेल्या चंद्राप्रमाणें शांत व सूर्याप्रमाणें तेजस्वी होता ! ! त्याचें दर्शन म्हणजे

सर्वांना प्रिय व मंगल वाटे! अशा धर्मनिष्ठ व सदाचाररत सारीपुत्राला, भिक्षूहो, वंदन करा!

भिक्षूहो! किती सांगू माझ्या धर्मसेनापति सारीपुत्राचे गुण!! पृथ्वीप्रमाणें क्षमाशील, भूतमात्रावर कारुण्यशील व विषयसुखांत वैराग्यशील असा तो सारीपुत्र आतां आमच्यातून अदृश्य झाला!! परिनिर्वाण पावला!!! भिक्षूहो! अशा अर्हतश्रेष्ट धर्मसेनापति सारीपुत्राला शेवटचे वंदन करा!!

याप्रमाणें भगवंतांनी त्या धर्मसेनापति सारीपुत्राची स्वमुखानें स्तुति व प्रशंसा केली. ती ऐकून आनंदाला दु:खशोकावेग न आवरल्यामुळें भडभडून आलें! सर्व भिक्षूंचें अंत:करण पिळवटून डोळ्यांतून अश्रु टिपूं लागले! वरील भाषण करीत असतांना भगवंताच्या चेहऱ्यावर औदासिन्याची छटा पसरून मधून मधून कंठ सद्गदित होत होता! इतका प्रिय झाला होता तो स्थविरश्रेष्ट सारीपुत्र!! तो धर्मसेनापति! त्या सर्व भिक्षूंना व खुद्द भगवंताना!!

भगवंताचें वयाला आतां ७८ वर्षें उलटून गेलीं होतीं. अर्थात् शरीर खंगलें असून प्रकृतींत अशक्तता वाढत होती. अलीकडे त्यांना संधिवाताचा विकार जडला होता. मधून मधून मस्तकशूळ उठून त्यांना बेमार व हैराण करी. त्यांच्या उजव्या पायाच्या आंगठ्याला व्रण झाला असून त्यामुळें ते फार अस्वस्थ असत. अशा स्थितींत त्यांना प्रियजनवियोगाचे उतार वयांत मधून मधून जबर झटके बसत असल्यामुळें त्यांची मनस्थिति मोठी चमत्कारिक झाली होती.

त्यांचा पहिला अनन्य उपासक राजा बिंबसार याने तुरुंगात अन्नान्न करून प्राण सोडला! त्यानंतर श्रेष्ठी अनाथपिंडक तोहि आजारी पडून त्यांतच त्याचा अंत झाला! त्यानंतर त्यांचा श्रेष्ठ उपासक सम्राट प्रसेनजित् हा अखेर राज्यभ्रष्ट होऊन एखाद्या अनाथाप्रमाणें वेशीच्या दरवाजापुढील पडवीत पडून प्राणास मुकला! पुढें लवकरच भद्राकाञ्चना

म्हणजे भगवंताच्या पूर्वाश्रमाची धर्मपत्नी यशोधरा ही परिनिर्वाण पावती झाली ! आणि आतां हा भगवंताचा धर्मसेनापति महास्थविर सारीपुत्र ! ! तोहि रोगाला बळी पडून परिनिर्वाण पावला ! ! ! याप्रमाणें भगवंताच्या प्रभावळीतील एक एक मोहरा गळत जाऊन त्या मानानें त्यांचा उत्साह व चैतन्य अटत चाललें. खरोखर भगवंताच्या या उतार वयांत मोठी आपत्ति येऊन पडली ही सज्जन-वियोगाची ! !

या गोष्टीला एकदोन आठवडे गेले असतील नसतील, तों इतक्यांत आणखी एक दुःखद बातमी येऊन थडकली ! ती म्हणजे मोग्गलान निर्वाण पावल्याची ! ! सारीपुत्रानंतर हाच एक त्यांचा तेवढा कर्तबगार व मुख्याधार शिष्य राहिला होता. तोही दुष्ट काळानें ओढून नेला ! !

या मोग्गलानाची योग्यताहि जवळ जवळ सारीपुत्राइतकीच होती. भगवंताची मानमान्यता व लाभसत्कार वाढावयाला या मोग्गलानाचे प्रयत्नच बव्हंशी कारण झाले होते. देवदत्ताची खोड मोडायला मोग्गलानच कारण होता. भगवंताच्या भिक्षू संघात फूट पाडून त्यातून कांहीं भिक्षु फितूर करून नेल्यावर पुनः त्यांना संघात परत घेऊन येण्याची कामगिरी मोठ्या खुबीनें यानेंच पार पाडली होती. असो. हाहि भगवंतावर एक मोठा आघातच झाला ! !

या प्रसंगी भगवंताचे तोंडातून सारीपुत्र व मोग्गलान यांविषयीं हे पुढील उद्गार निघाले. भिक्षूंच्या सभेला उद्देशून बोलत असतांना ते याप्रमाणें म्हणाले:-भिक्षूहो ! मला आज ही सभा अगदी शून्य भासती आहे ! सारीपुत्र व मोग्गलान या सभेंत असतांना जी तिला शोभा होती, जो तेथें आनंद होता, जें चैतन्य होतें, तें सगळें आज शून्यांत जमा झालें आहे ! ते जेथें जेथें म्हणून जात तेथें तेथें त्यांचा गौरव झाला नाहीं असें कधींच झालें नाहीं ! ! असे गुणी व तेजस्वी होते हे माझे सारीपुत्र व मौद्गल्यायन ! ! त्यांची जोडी फार उत्तम होती ! !

आश्चर्य करण्याजोगी गोष्ट त्यांची म्हणजे ही कीं, त्यांनी अखेरपर्यंत तथागताच्या धर्मप्रसाराचें काम अत्यंत निष्ठेनें व निरलसपणें करून, लोकांना सत्यधर्माचा सरळ व चोख मार्ग दाखविला ! हें त्यांचें कार्य प्रशंसनीय असून गौरवास्पद आहे ! ! अशा प्रकारची श्रावकश्रेष्ठांची जोडी परिनिर्वाण पावल्यावर तुम्हां सर्वांना विषाद वाटावा व दुःख व्हावें हें साहजिकच आहे. पण तथागताला मात्र याविषयीं कांहीच विषाद वाटत नाहीं. कारण जो जन्मला तो मागें पुढें केव्हां तरी मरणारच ! महाभूतांचें बनलेलें हें शरीर पुढें मागे एकदाचें नाश पावणारच ! ही गोष्ट तथागताला पूर्ण पटली असल्यामुळें, चंचल व क्षरणशील अशा गोष्टीसंबंधानें तथागताला शोक-परिदेव-कोटन होणार ! भिक्षू हो, कां होणार ? जें कांहीं उत्पन्न झालेलें आहे-संस्कृत झालेलें आहे--तें सर्व नाश पावणारच ! ही गोष्ट निश्चित असतां तथागताला शोक करण्याचें--दुःख होण्याचें-कारण काय ? महावृक्ष स्थिर असूनहि त्याच्या फांद्या तुटून किंवा गळून पडतात. तद्वत भिक्षुसंघांत राहणाऱ्या तथागताला शाखास्वरूप असे जे सारीपुत्र व मोग्गलान त्यांचें हें परिनिर्वाण आहे ! आतां ते आम्हास कसे मिळणार ! गेले एकदाचे कायम निघून ! भिक्षूहो ! तुम्ही आतां गेलेल्यांचा शोक करूं नका ! ! दुःख सोडा ! औदासिन्य टाका ! आणि आपला आत्मदीप पाजळून त्याच्या प्रकाशांत विहार करा ! !

असें सांगून भगवान तेथून उठून गेले.

सारीपुत्र हा कार्तिक शुद्ध पौर्णिमेस आपल्या गावीं म्हणजे नालक गावीं जाऊन स्वगृही जन्मस्थानीं परिनिर्वाण पावला व पुढें बरोबर पंधरा दिवसांनी म्हणजे कार्तिक वद्य अमावास्येस मोग्गलान हा कालशिला प्रदेशांत जाऊन निवर्तला. याप्रमाणें भगवान बुद्ध हे वृद्धापकाळीं आपल्या श्रेष्ठ अशा दोन शिष्यांचा वियोग सहन करते झाले.

---

# शाक्य राष्ट्राचा विध्वंस!

भद्दसाल जातक ४६५
धम्मपद, अट्ठकथा, ४—३

बुद्ध भगवंतानी ‘सर्वं क्षणिकं, सर्वं दुःखं’ या पालुपदावर आपल्या मुख्य धर्माची उभारणी करून प्रपंचाची महति कमी केली आणि जगाच्या धकाधकीच्या मामल्यांत सन्यासवृत्तीला महत्त्व देऊन लोकांना भिक्षुसंघांत दाखल करून घेण्याचा सपाटा चालविला. त्यांच्या मधुर वाणीतून निघालेल्या नैतिक उपदेशाची सुंदर छाप सामान्य जनतेच्या सात्विक अंतःकरणावर ठसठशीत उमटून, त्यांच्या उपासक वर्गाची दिने दिने वाढ व विकास होत जाऊन त्या मानानें लोकांचें लक्ष प्रपंचातून व व्यवहारांतून अटत चाललें.

या बाबतीत शाक्य राष्ट्राची तर फारच अनुकंपनीय स्थिति झाली होती. तेथील बहुतेक तेजस्वी क्षत्रिय तरुण प्रपंचनिवृत्त होऊन भिक्षुसंघांत दाखल झाल्यामुळें व राहिलेले थोडेबहुत उपासक बनल्यामुळें तें राष्ट्र क्षात्रवृत्तीवर पाणी सोडून ‘अहिंसा परमो धर्मः’चा उदोउदो करण्यांत पूर्ण मग्न झालें होतें. सांप्रत तेथें क्षात्र धर्माची फारच आबाळ झाली होती. क्षत्रियांच्या हातांतील तीक्ष्ण तलवारी जाऊन तेथें नांगरांचे फाळ मिरवूं लागले होते! हें सर्व येथें सांगण्याचें कारण कीं, त्या राष्ट्रावर ओढवलेली भयंकर आपत्ति होय.

विदूरकाचें सिंहासन स्थिर झाल्यावर त्याची दृष्टि शाक्य राष्ट्रावर वळली. ‘दासीपुत्रानें विटाळलेला पाट दूधपाण्यानें धुवून शुद्ध करते,’ या कपिलवस्तूच्या राजवाड्यातील दासीनें उच्चारलेल्या शब्दांनी त्याच्या अंतःकरणांत जोरानें उचल खाल्ली व त्याबद्दल त्याला मिळालेल्या प्रायश्चित्ताची बोचक स्मृति जागृत झाली! आणि तशांतच ‘पुनः तो पाट शाक्यांच्या रक्तानें धुवून काढीन,’ ही त्याची प्रतिज्ञाहि वारंवार त्याच्या मनःचक्षूपुढें उभी राहून त्यास बेचैन करूं लागली.

मग आतां काय? कोसलची शूर सेना हाताखालीं सुसज्ज असतां मूठभर शाक्यांची खोडकी जिरविण्यास मग विलंब व विचार कसला?

विदूरकानें दीर्घचारायणास बोलावून घेऊन शाक्य राष्ट्रावर हल्ला करून तें निर्नाम करून टाकण्याचा हुकूम दिला! झालें. त्याप्रमाणें सैनिकांस हुकूम सुटले. दिवसहि मुकरर करण्यांत आला. पण ही बातमी अगोदरच बाहेर फुटून ती भगवंताच्या कानावर आली. त्यांनी क्षणाचाहि विलंब न करतां तावडतोब विदूरकास बोलावून घेऊन तो बेत रहित करण्यास त्याला परोपरीनें सांगून त्याचें मन वळविण्याचा भगीरथ प्रयत्न केला. मागें दोन वेळां त्यांच्या अशा प्रकारच्या प्रयत्नांना यश आलें होतें. पण या खेपेस त्यांचें कांहीं चाललें नाहीं! या वेळीं भगवंतांना यश आलें नाहीं. विदूरकाचा निश्चय अढळ राहिला व कोसल सेनेचा तळ हलला.

शाक्यांस ही गुणगुण आधीच लागली होती. पण तेथें तलवार बहाद्दर योद्धे असे होते कोठें? घरोघर अहिंसेचा घोष! आणि नांगराचे फाळ! बायकामुलें, म्हातारे-कोतारे, अजारी-रोगी, शेतकरी-सन्याशी यांशिवाय लढाऊ वृत्तीचे तरुण वीर फारसे तेथें राहिले नव्हते. क्षात्रवृत्तीचा कडक दुष्काळ पडला होता! आणि वीरवृत्तीचा पूर्ण लोप झाला होता! मग ही आपत्ति निस्तरावयाची कशी व कोणी? शाक्यांचें दुर्दैव उभें राहिलें आतां!!

प्राणावर बेतलें म्हणजे मांजर देखील उलटतें म्हणतात. मग शाक्य तर काय बोलून चालून माणसेंच! मग ते गप्प कसे बसतील? जे काय थोडे होते त्यांनीं कम्मर कसली व विदूरकास तोंड देण्यास—मृत्यूस कवटाळण्यास—ते बाहेर पडले. इतक्यांत कोसलसेनेची प्रचंड टोळधाड येऊन आदळलीच त्यांच्यावर! दोघांची रणधुमाळी माजली पण किती वेळ? क्षणभर! अगदी क्षणभरच! हां हां म्हणतां विदूरकाच्या लोकांनी शाक्यांची लांडगेतोड केली! आणि रणदेवतेला त्यांच्या निष्पाप रक्तानें यथेच्छ न्हाऊ घातलें!!

एवढयानेंच विदूरकाची तृप्ति झाली नाहीं. त्याला कपिलवस्तूच्या राजघराण्याचा सूड घ्यावयाचा होता. म्हणून त्यानें आतां आपला मोर्चा तिकडे वळविला. अरेरे ! काय त्या गरीब प्राण्यांची दुर्दशा ! कोसलसेनेनें गावांत शिरून बायकामुलांची व म्हाताऱ्या कोताऱ्यांची एकच लांडगेतोड चालविली ! राजवाड्यांतील सांपडेल तें माणूस पकडून कापून काढून, तो सगळा वाडा राजरक्ताने भिजवून सोडला आणि प्रत्येक पाट रक्तामध्ये बुडवून काढला ! ! सगळी कपिलवस्तु—ती सुंदर नगरी—भगवंताची ती पुण्यभूमि—थोड्याच अवधींत निष्पाप जनांच्या प्रेतांनी पसरून स्मशानवत भयाण व भेसूर दिसूं लागली ! जिकडे तिकडे एकच हाहाकार नि एकच हलकल्लोळ ! बायकामुलांच्या किंकाळयानें व आर्त स्वरानें आकाशपाताळ एक होऊन गेलें !

याप्रमाणें शाक्यांचा संहार करून विदूरकानें आपला सूड उगवून घेतला आणि आपली प्रतिज्ञा खरी केली !

ही बातमी पुढें भगवंतास श्रावस्ती येथें असतांना लागली, तेव्हां त्यांना काय वाटलें असेल नि काय झालें असेल हें त्यांचें तेच जाणे ! ! या वेळी त्यांचें वय जवळ जवळ ७९ वर्षांचें होतें. अशा वेळीं वरील हृदयद्रावक बातमी ऐकून त्यांचें मृदु अंतःकरण हादरलें नसेल, कळवळलें नसेल, विव्हळलें नसेल, असें कोणी व कसें म्हणावें ? आपल्या डोळयांदेखत आपल्या शाक्य राष्ट्राचा विध्वंस व विनाश पाहण्याचा दुर्धर व खेदजनक प्रसंग भगवंतांच्या अंतकालीं ओढवला व ओढवावा ही विधिघटणा खरोखर विचित्रच खरी ! ! नव्हे काय ?

याप्रमाणें विदूरक विजय संपादून कपिलवस्तु विध्वंस करून तेथून परतला. व मुक्काम दर मुक्काम करीत श्रावस्ती नजीकच्या अचिरावती नदीच्या काठी त्यानें तळ दिला. त्या ठिकाणीं दारू पिऊन धुंद झाला असता एकदम नदीला महापूर येऊन त्यांत सांपडून तो बुडून वाहून गेला ! !

---

# अजिंक्य राष्ट्राचा महामंत्र

महापरिनिब्बाणसुत्त १६-१

( दीघनिकाय )

श्रावस्तीमध्यें वर्षावास—तोच भगवंताचा तेथील शेवटचा वर्षावास होय—काढून झाल्यावर पुढें भगवंताचा तळ तेथून हलला व राजगृहाच्या रोखानें प्रयाणाची दिशा आखण्यांत आली. जातां जातां वाटेंत कपिलवस्तु लागली. पण ती आतां पूर्वीची होती काय ? जिकडे तिकडे पडकीं घरें व ओसाड जागा ! ! कोठे हास्य नाहीं कीं आनंद नाहीं ! सर्वत्र दुःखाचे उमाळे व निराशेचे उद्गार ! त्यांत तो राजवाडा ! भगवंताचा तो राजवाडा ! इंद्रभुवनासहि लाजविणारा तो शाक्यांचा सुंदर नि संपन्न राजवाडा ! काय बिचाऱ्याची दुर्दशा ती ! लक्ष्मीचें जें क्रीडोद्यान तें आज गर्दभाचें विश्रामधाम बनलें होतें ! जेथें पोपट मैनाचे मंजुलरव कानास रंजवीत, तेथें आज घुबडाचे कर्कश घूत्कार अंतःकरणास भेडसावीत होते ! तें सर्व करुण व भेसूर चित्र डोळ्यांनी पाहिल्यावर भगवंतास काय वाटलें असेल नि काय झालें असेल तें कोणी काय सांगावें ? वाचकांनी त्याची कल्पनाच केलेली बरी ! असो. ती उध्वस्त व उजाड नगरी एकवार डोळ्याखालीं घालून तिचें शेवटचें दर्शन घेतल्यावर भगवंतांनी तेथून पाय काढला व पुढील मार्गास ते लागले.

वाटेंत ठिकठिकाणीं मुक्काम करून तेथील लोकांस उपदेश देत देत अखेर ते राजगृहास येऊन पोंचले. या खेपेस त्यांचा तळ वेळुवनांत न पडतां गृध्रकूट पर्वतावर पडला. या वेळीं अजातशत्रूचें वैभव शिखरास जाऊन पोंचलें होतें व त्याचा दरारा सर्वत्र पसरून राहिला होता. होताच तसा तो मोठा शूर व पराक्रमी राजा ! काय त्याचें सामर्थ्य नि केवढा त्याचा दरारा ! शेजारचीं लहानथोर राष्ट्रें त्यानें आपल्या

**आनंद** :—होय, भदंत. ते तसें करीत असतात.

**भगवान** ( अमात्यास उद्देशून ) :—तर मग, हे अमात्य श्रेष्ठा ! वज्जींचा पराभव होणें शक्य नाहीं. जोपर्यंत हे वज्जीलोक आपलें राजकारण एकत्र जमून एकमतानें करतात व एकमतानें वागतात तोपर्यंत त्यांचें कल्याणच होईल. अकल्याण होणार नाहीं.

**भगवान** ( आनंदाकडे वळून ) :—जें पूर्वजांनी केलें नाहीं अगर सांगितलें नाहीं तें ते करीत नाहींत व जें कांहीं सांगितलें तें सोडून देत नाहींत ना ? म्हणजे ते लोक आपल्या पूर्वपरंपरेला धरून वागतात हें खरें काय ?

**आनंद** :—होय, भदंत, अगदीं खरें.

**भगवान** :—तसेंच ते लोक आपल्यातील वृद्धांना मानतात ना ? त्यांचा सत्कार करतात ना ? त्यांचा सल्ला ऐकतात ना ?

**आनंद** ( मान हालवून ) :—होय, भदंत.

**भगवान** :—असें जर आहे तर, हे अमात्यश्रेष्ठा, त्या वज्जींचें कल्याणच होईल. अहित होणार नाहीं. नेहमी त्यांची भरभराटच होईल. अध:पात होणार नाहीं. (आनंदाकडे वळून) आणि आतां आनंदा, हें सांग. हे वज्जी लोक कुलस्त्रिया व कुमारिका यांना जबरीनें ओढून नेऊन त्यांचा विनयभंग करीत नाहींत ना ? त्यांना मारहाण करून कोंडून ठेवीत नाहींत ना ? त्यांच्यावर जुलुमजबरी—अत्याचार—मारहाण करूं पाहत नाहींत ना ? अशा गोष्टी तुझ्या कानावर आल्या आहेत काय ?

**आनंद** :—नाहीं, भदंत, मुळींच नाहीं.

**भगवान** :—असें असेल तर त्यांचा पराभव होणार नाहीं. उलट उत्कर्षच होत जाईल. हानि म्हणून होणार नाहीं. बरें, आनंदा, आतां मला हें सांग कीं, हे वज्जीलोक आपल्या नगरांत व नगराबाहेर जे चैत्य ( देवस्थान ) असतील त्यांचा सत्कार, गौरव, पूजा वगैरे

करतात ना ? त्या चैत्यांचा यथोचित मानसन्मान राखतात ना ? पूर्वजांनी त्याला घालून दिलेलीं वतनें व इनामें यथाप्रकार चालवतात ना ? त्यांना वेळोवेळीं द्यावयाच्या अन्नादि वस्तु यथासांग देतात ना ? त्यांत कांहीं व्यत्यय आणीत नाहींत ना ?

**आनंद** :—नाहीं, भदंत, त्यांत कांहीं व्यत्यय आणीत नाहींत. सर्व कांहीं यथाप्रकार त्यांनी चालविलें आहे. चैत्याचा त्यांनीं फार उत्तम मानसन्मान ठेविला आहे.

**भगवान** ( मान हालवून ) :—फार सुंदर, आनंदा, फार सुंदर ! वज्जीचें आचरण फार सुंदर आहे. आता आणखी एक गोष्ट तुला विचारतो. ती तेवढी सांग म्हणजे झालें.

**आनंद** :—ती काय ? भदंत !

**भगवान** :—देशांत राहणारे व बाहेरून येणारे जे अर्हन्त आहेत —साधुसंत आहेत—त्यांना सुखानें राहता यावें, त्यांचें धार्मिक रक्षण, आवरण व गोपन व्हावें, यासाठी वज्जीलोक झटत असतात काय ? त्यांची सुखानें कालक्रमणा चालावी अशी त्यांच्या राष्ट्रांत व्यवस्था आहे काय ?

**आनंद** :—आहे, भदंत, देशांतील अर्हंताविषयी त्यांनी फार चोख व्यवस्था ठेविली आहे.

**भगवान** (वस्सकार ब्राह्मणास उद्देशून) :—हे ब्राह्मणा ! अजातशत्रूला तूं असें सांग. जोपर्यंत वज्जीलोक हे सात कल्याण धर्म पाळण्यांत तत्पर आहेत, उत्सुक आहेत, तोपर्यंत त्यांची भरभराटच होत राहील. हानि मुळींच होणार नाहीं. हे सात राष्ट्रधर्म मी त्यांस पाळावयास मागे येथें सारंदप चैत्यांत राहत असतांना सांगितले होते. त्याप्रमाणे त्यांचें जोपर्यंत आचरण आहे, तोंपर्यंत ते सदैव समर्थच राहतील ! अजिंक्य राहतील ! कधींहि त्यांची हानि होणार नाहीं व अपजय शिवणार नाहीं ! हा तथागताचा संदेश, हे अमात्यश्रेष्ठा, तूं राजा अजातशत्रूस जाऊन कळीव.

तो वस्सकार महाअमात्य 'ठीक आहे, भदंत, आपल्या इच्छेप्रमाणें करीत आहे' असें म्हणून, त्यांना नमस्कार करून तेथून उठला व आपल्या रस्त्यास लागला.

---

## भिक्षूंचे सात धर्म

महापरिनिब्बाणसुत्त १६-१

( दीघ निकाय )

अजातशत्रूचा पंत अमात्य तेथून निघून गेल्यावर भगवान पुढें आनंदास म्हणाले :—आनंदा ! जा आणि सर्व भिक्षूंना उपस्थान शालेंत एकत्र जमा कर.' भगवंताच्या आज्ञेप्रमाणें आनंदानें सर्व भिक्षूंना बोलावून आणून उपस्थान शालेंत जमा केले. व भगवंतास त्याप्रमाणे जाऊन वर्दी दिली.

नंतर भगवान तेथें जाऊन आपल्या आसनावर बसून त्या भिक्षूंस उद्देशून म्हणाले:— भिक्षु हो ! आज मी तुम्हांला भिक्षूंनी पाळावयाचे कांहीं नियम सांगणार आहे. ते ऐका.

**भिक्षु** :—ते कोणते, भदंत ?

**भगवान** :—ते हे. तुम्ही सदैव कर्मांतच रंगून बसावयाचें नाहीं. कोणत्याहि विषयावर आसक्ति ठेवावयाची नाहीं. निद्रेंतच गुंग होऊन राहावयाचें नाहीं. आमोदात म्हणजे जागतिक सुखानंदांत अनुरक्त होऊन राहावयाचें नाहीं. पापेच्छा प्रबळ होऊं द्यावयाची नाहीं. पापी व दुष्ट लोकांचा संग करावयाचा नाहीं. सदैव निर्वाणाप्रीत्यर्थच तुमचा प्रयत्न व उद्योग असावा.

**भिक्षु** :—याची फलश्रुति काय, भदंत ?

**भगवान** :—म्हणजे तुमचं अधःपतन होणार नाहीं !

**भिक्षु** :—बरें, हा निषेधात्मक धर्म झाला. आचारात्मक धर्माचा थोडासा उपदेश द्या कीं.

**भगवान** :—ऐका, तोहि सांगतो. प्रथम म्हणजे तुम्ही श्रद्धावान असावें. तसेंच लज्जावानहि असावें. तुम्ही सदैव विनयशील असावें. शास्त्रज्ञ असावें. वीर्यवान असावें. स्मृतिमान असावें व प्रज्ञावान असावें. याप्रमाणें तुमचें वर्तन असेल तर तुमचें अधःपतन होणार नाहीं. त्याचप्रमाणें व त्याचबरोबर स्मृति, पुण्य, वीर्य, प्रीति, प्रश्रब्धि, समाधि व उपेक्षा या सात ज्ञानमार्गाचें अवलंबन करीत असावें. म्हणजे तुमचें अधःपतन होणार नाहीं.

**भिक्षु**: —आणखी काय करावें ?

**भगवान** :—अनित्य, अनात्म, अशुभ, आदीनव, प्रहाण, विराग, व निरोध या सात प्रकारच्या संज्ञा असून त्याची तुम्ही भावना करीत राहिल्यास तुमचें अधःपतन होणार नाहीं. म्हणजे तुम्ही अशी भावना करावी कीं, संसारातील सर्व वस्तु अनित्य असून परिणामीं अशुभ व दुःखकारक आहेत. याप्रमाणें सदाचारानें व सत्प्रवृत्तीनें राहून जें पुण्य घडेल त्याचें रक्षण करावें. व जें अनुत्पन्न पुण्य असेल त्याची प्राप्ति करून घ्यावी. तसेंच, घडलेल्या पापाचा परित्याग करावा व नवीन पापास थारा देऊं नये. या सर्व उपदेशाचा माथितार्थ हा कीं, सांसारिक भोग-विषयांत आसक्ति नसावी. त्यांचा त्याग करावा. सर्व वासना व तृष्णा यांचा उच्छेद करावा. म्हणजे सर्व बंधनातून मुक्त होऊन परमश्रेष्ठ असें निर्वाणपद गाठण्यास तुम्ही समर्थ व्हाल. मग तुमचें अधःपतन केव्हांही होणार नाहीं !

**भिक्षु** :—ठीक आहे. आम्ही तसें वागण्याचा प्रयत्न करूं.

**भगवान** :—पुनः एक गोष्ट तुम्हास सांगावयाची म्हणजे तुम्ही शीलवंत भिक्षूंशीच सदैव मैत्री करावी. मिळालेली भिक्षा एकट्यानेंच न खातां इतर भिक्षूंना वाटून ती खावी. सदाचाराचे सदैव रक्षण

करावें व सद्धर्मावर दृष्टि ठेवावी. म्हणजे तुमचें अधःपतन केव्हांही होणार नाहीं. याप्रमाणें जो वागतो त्याचें अकल्याण होणार नाहीं. तर कल्याणच होईल ! !

भिक्षु :—खरें आहे, भदंत. त्याप्रमाणें आम्ही आचरण करूं.

इतकें सांगून भगवान ही पुढील गाथा म्हणते झाले:—

**धम्मारामो धम्मरतो धम्मं अनुविचिन्तयं ।**
**धम्मं अनुस्सरं भिक्खु सद्धम्मा न परिहायति ॥**

धम्मपद २५-५

---

## गृहस्थांना उपदेश

( १ ) महावग्ग ( ३-४-७ )

( २ ) महापरिनिब्बाणसुत्त १६, भाग १ (दीघनिकाय )

यानंतर बुद्ध भगवान तेथून निघून फिरत फिरत अंबलट्ठिका, नालंद या गांवावरून पाटली गावांत येऊन उतरले. ही बातमी तेथील त्यांच्या उपासकांच्या कानावर आली. तेव्हां ते सर्वजण जमून भगवंतापाशी येऊन आपलें आदरातिथ्य स्वीकारण्याची त्यांनी विनंति केली. व बुद्धानें ती मान्य केली.

नंतर ते सर्वजण तेथून उठून जाऊन गांवातील अवसथागारांत म्हणजे धर्मशाळेंत त्यांच्या आदरसत्काराची तयारी करण्याच्या उद्योगास लागले. सर्व व्यवस्था झाल्यावर भगवंताला तेथें घेऊन येऊन तेथील मधल्या खांबाजवळ सुंदर आसन मांडून त्यावर त्यांना बसण्यास विनंति करण्यांत आली.

भगवान आपले पाय धुवून आंत येऊन त्या आसनावर खांबास टेकून पूर्वेकडे तोंड करून बसले व भिक्षुसंघ त्यांच्या सभोवती स्थानापन्न झाला. शिष्य व इतर लोक भगवंताच्या समोरच भिंतीला

टेकून उभे राहिले आणि हात जोडून प्रार्थना केली कीं, भगवन्, आम्हांस उपदेश करा.

**भगवान** :—बरें आहे. ऐका तर. अहो गृहपतीनो ! जो दुर्वर्तनी असतो—दुःशील असतो—त्याच्या दुर्वर्तनामुळें व दुःशीलामुळें त्यास पांच तोटे होतात.

**शिष्य** :—ते कोणते, भगवन्?

**बुद्ध**:—जो दुःशील अथवा दुर्वर्तनी असतो त्याची संपत्ति त्याच्या आलस्यामुळें व निष्काळजीपणामुळें क्षय पावते. हा एक पहिला तोटा. आतां दुसरा म्हणजे त्याच्या संबंधानें लोकांत वाईट कीर्ति पसरते. म्हणजे बदनामी होते. तिसरा तोटा हा कीं, तो कोणत्याहि सभेंत जावो—ब्राह्मणांच्या जावो,—क्षत्रियांच्या जावो, गृहपतींच्या जावो, अथवा श्रमणांच्या जावो, कोठें गेला तरी त्यास तोंड खालीं घालून बसावें लागतें. चौथा तोटा हा कीं तो दुर्वर्तनी मनुष्य अखेर सम्मूढ होऊन मरण पावतो. आणि पांचवा तोटा म्हणजे तो मेल्यावर दुर्गतीस जातो. याप्रमाणे दुःशील व दुर्वर्तनी माणसाचा पांच प्रकारें तोटा आहे. म्हणून तुमची दुर्वर्तनाकडे प्रवृत्ति नसावी.

**शिष्य** :—हें दुःशील माणसाविषयीं झालें. पण शीलवंताची वाट काय ?

**बुद्ध**:—शीलवंताची वाट ? त्याचे अनेक फायदे आहेत.

**शिष्य** :—ते कोणते ?

**बुद्ध** :—शीलवंताचे एकंदर पांच फायदे आहेत. पहिला म्हणजे हा कीं, शीलवंत पुरुष जागरूकतेने वागत असल्यामुळें त्यास मोठी संपत्ति प्राप्त होते. दुसरा फायदा असा कीं, त्याची सर्वत्र चांगली कीर्ति पसरते. तिसरा म्हणजे तो कोणत्याहि सभेंत जावो, तेथें तो उजळ माथ्यानें जाऊन बसतो. चौथा फायदा असा कीं तो संम्मूढ होऊन मरण पावत नाहीं. आणि पांचवा फायदा म्हणजे मरणोत्तर तो सद्ग-

तीस जातो. म्हणजे स्वर्गास जातो. असे हे शीलवंताचे पांच फायदे होत. म्हणून तुम्ही शीलवंत होऊन आयुष्क्रमणा करावी. समजलें काय सांगितलें तें ? शिष्य मान हलवून 'होय, भगवन्' असे म्हणाले.

एवढें झाल्यावर भगवान तेथून उठून गेले व लोक पांगापांग झाले.

---

## अंबपाली गणिकेचें प्रशंसनीय औदार्य

( महावग्ग, ६–४–८ )
( २ ) महापरिनिब्बाणसुत्त १६ ( दीघनिकाय )

अंबपाली ही वैशालीची एक प्रख्यात गणिका. ती तरुण असून तितकीच मोठी सुंदर. सुंदर म्हणजे काय ? रंभाऊर्वशी देखील तिच्यापुढें लाजून माना खालीं घालतील ! इतकी सुंदर नि इतकी मोहक !! कमलाचें मुख, हरिणीचे डोळे, सिंहाची कटि, कोकिलेचा सूर, चंद्राची कांति व सोन्याचा वर्ण या सर्वांचें मधुर मिश्रण म्हणजेच तें तिचें सुंदर शरीर होय ! !

आणि तिची श्रीमंती म्हणजे तरी काय ? वैशालीची लक्ष्मीच तेथें प्रत्यक्ष वास करीत होती ! रत्नजडित अलंकार काय, सोन्याचे दागिने किती, मोत्याचे हार, सोन्याचांदीचीं भांडीं, उंची सुगंधी द्रव्यें, तलम रेशमी वस्त्रें, गाद्या, गिरद्या, असे एक कीं दोन, असंख्य सुखविलासाच्या सुंदर सुंदर वस्तूचें तिचें मंदिर म्हणजे एक भव्य भांडारच का म्हणाना !

तिच्या येथें येणारे जाणारे असे लोक तरी कोण ? राजे, राजपुत्र, सरदार, जहागिरदार, मोठमोठे शेट, सावकार अशांचाच तेथें रिघाव व सराव असे ! ! मग आतां त्या अंबपालीचें प्रस्थ व वर्चस्व सांगावयाचें तरी किती ? तिचा एका रात्रीचा दर म्हणे पन्नास सुवर्ण मुद्रिका !

नादिकाग्रामी कांहीं दिवस राहून तेथून भगवान कोटिग्रामी आले. ही गोष्ट आम्रपालीस समजली तेव्हां तिला मोठा आनंद झाला व धन्यता वाटली. अन् वाटणार नाहीं कोणाला ? भगवान बुद्धासारखी थोर विभूति अन् ती अनायासे आपल्या शेजारी आली आहे हें समजल्यावर कोणाला धन्यता आणि आल्हाद वाटणार नाहीं ? गणिका झाली म्हणून काय झालें ? तिला बुद्धि व भावना असतेच कीं नाहीं ? तशांत आम्रपालीसारख्या थोर मनाच्या व उदार बुद्धीच्या भाविक महिलेला बुद्धासारखी थोर विभूति शेजारी आल्यावर महानंद व मोठी धन्यता वाटावी यांत नवल तें काय ?

भगवान बुद्धदेव हे कोटिग्रामांत येऊन उतरले आहेत ही बातमी त्या भाविक आम्रपालीस लागतांच, दुसरे दिवशीं आपला सुंदर रथ जोडून त्यांत बसून ती भगवंताच्या दर्शनास निघाली. त्या वेळीं ती अगदीं साध्या वेषांत होती. साधें शुभ्र वस्त्र तिनें परिधान केलें होतें. अंगावर दागदागिने नव्हते म्हटलें तरी चालेल. अगदीं साधा वेष होता तिचा. तरी तिचें लावण्य कांहीं कमी झालें नव्हतें ! त्या साध्या व सामान्य वेषांतच ती चांदणीप्रमाणें खुलून अधिक आकर्षक दिसत होती ! देवानें दिलेल्या नैसर्गिक सौंदर्यापुढें मानवनिर्मित कृत्रिम वेषभूषेची मातब्बरी ती काय ? जातीच्या ज्या सुंदर असतात, मोहक असतात, त्या कशा असल्या तरी त्यांचें सौंदर्य तें सौंदर्यच ! ! तेथें कृत्रिम सजावटीची आवश्यकताच नाहीं ! या आम्रपालीची गोष्टहि अशीच होती. असो.

रथ पुढें जाण्याचा रस्ता संपताच ती रथातून खाली उतरली व पायानेंच चालत जाऊन जेथें भगवान होते तेथें आली. तेथें आल्यावर भगवंतास नमस्कार केला व जवळच बाजूला एक जागा पाहून त्या ठिकाणीं ती आदबीनें जाऊन बसली.

भगवंतांनीं तिचें सात्त्विक रूप व मर्यादशील वर्तन पाहून हर्षित होऊन मनांत म्हटलें—'केवढी भाग्यवान स्त्री ही ! गणिका खरी, पण किती भाविक अंतःकरण तिचें ! ती नित्य सुखविलासांत अखंड लोळत असतां व श्रीमंत सरदारांच्या संगतींत चैन व सुखोपभोगांत मग्न असतां तिचें अंतःकरण इतकें शुद्ध, पवित्र व भाविक असावें हें केवढें भाग्य तिचें ! तरुण, तशीच सुंदर आणि तशांतच मोठी श्रीमंत !! अनेक सुखसाधनांनीं सुसंपन्न !! अशा विलासी स्त्रीच्या रंगेल अंतःकरणांत पवित्र धर्माची मंगल ज्योत तेवत राहावी, ही केवढी प्रशंसनीय गोष्ट !! स्त्रिया म्हणजे सामान्यतः अडाणीच ! तशांत मोठ्या कुरेंबाज ! पण ही अंबपाली सुंदर, तरुण, संपन्न असूनहि किती विनयशील, किती भाविक, किती विचारी नि किती शहाणी आहे !!' अशा प्रकारचे विचार भगवंताच्या मनांत क्षणांत चमकून गेले.

अंबपाली भगवंतांना नमस्कार करून एका बाजूला जाऊन बसल्यावर त्यांनी तिला उचित असा सुंदर धर्मोपदेश केला. तो ऐकून ती आनंदित झाली. हर्षनिर्भर झाली. मन प्रसन्न झालें ! तिला महानंद झाला !! चटकन् उठून उभी राहून दोन्ही हात जोडून नम्रपणें भगवंतास म्हणाली 'भगवंतांनी आपल्या भिक्षुसंघासहित उदईक माझ्या घरीं भोजनास येऊन मला धन्य व कृतकृत्य करावी !'

या तिच्या विनंतीस भगवंतानी मौन धारण करून आपली मूकसम्मति दिली. नंतर ती तेथून निघून प्रहर्षित अंतःकरणानें रथांत बसून घराकडे परतली.

पुढें कांहीं वेळानें लिच्छवी राजघराण्यांतील लोक भगवंतांस आपल्या घरीं भोजनास आमंत्रण देण्यास म्हणून तेथें आले. आणि त्यांस नमस्कार करून आपला मनोदय कळविला. तेव्हां भगवान म्हणाले, 'राजपुत्र हो, नुकतीच अम्बपाली येऊन मला आमंत्रण देऊन गेली.

उदईक मला तिच्या घरी गेलें पाहिजे. सबब तुमची विनंति मान्य करतां येण्यासारखी नाहीं.

'जशी भगवंताची मर्जी' असें म्हणून त्यांना नमस्कार करून ते तेथून निघून गेले.

दुसरे दिवशी पहाटेस अम्बपालीनें आपल्या घरी सुग्रास भोजनाची तयारी चालविली. भोजन तयार झाल्यावर ती वर्दी आपल्या सेवकाकडून भगवंतास पाठविली. त्याप्रमाणें भगवान उठून अंगावर चीवर धारण करून हातांत भिक्षापात्र घेऊन भिक्षुसंघासह अंबपालीच्या घरीं आले.

भगवान दाराजवळ येतांच अम्बपालीनें नमस्कार करून सत्कारपूर्वक त्यांना आंत नेऊन भोजनस्थानी बसविलें व त्या सर्वांना यथेच्छ सुग्रास भोजन घातलें. जेवण संपल्यावर ती भगवंताजवळ येऊन विनयपूर्वक हात जोडून म्हणाली:—भदंत ! या गणिकेची एक विनंती आहे. ती आपण मान्य करून तिला धन्य कराल काय ?

**भगवान** :—ती कोणती ?

**अम्बपाली** :—येथें माझें एक आम्रोद्यान आहे. तें मी आपल्या भिक्षुसंघास दान द्यावें म्हणते. त्याचा भगवंतांनी स्वीकार करावा, हीच ती विनंति.

भगवंतांनी तिच्या विनंतीस आपली मान्यता दिली व त्याप्रमाणें तिनें तें आम्रोद्यान भिक्षुसंघास अर्पण केलें ! नंतर तथागतांनी तिला योग्य उपदेश करून तेथून तळ हालविला व ते परत आपल्या मुक्कामी आले.

हा भगवान बुद्धाचा सहावा विहार होय. पहिला वेळुवन नांवाचा असून तो राजगृहाशेजारीं होता व तो भगवंतांना राजा बिंबसारानें अर्पण केला होता. दुसरा श्रावस्ती येथील जेतवन नांवाचा असून तो अनाथपिंडक श्रेष्ठीनें दिला होता. तिसरा अमरवन नांवाचा विहार

राजगृहाशेजारीच असून तो प्रसिद्ध राजवैद्य जीवक यानें अर्पण केला होता. चौथा कुटागर नांवाचा विहार वैशाली येथील सालवनांत असून तो गोशृंगानें बांधवून दिला होता. पांचवा 'पूर्वाराम' नांवाचा विहार प्रसिद्ध विशाखा उपासिकेनें वैशालीजवळ बांधवून भगवंतास व संघास अर्पण केला होता! व सहावा विहार म्हणजे हा वर नुकताच अम्बपालीनें अर्पण केलेला आम्रोद्यान विहार होय. याप्रमाणें राजगृह, श्रावस्ती व वैशाली येथें सर्व मिळून सहा विहार भिक्षुसंघाच्या मालकीचे झाले होते. नंतर भगवान कांहीं दिवस अम्बपालीच्या या नूतन अमरोद्यानांत येऊन राहिले.

---

## तथागत अक्रियावादी नाहीं

महावग्ग–६–४–८

आम्रपालीच्या आम्रोद्यानांत कांहीं दिवस राहिल्यावर भगवान तेथून निघून महावनांतील कूटागार विहारांत येऊन राहिले. त्या वेळीं कांहीं चांगले चांगले प्रतिष्ठित लिच्छवी गृहस्थ संस्थागारांत बसून गोष्टीवरून गोष्ट काढून भगवंताचे गुण, त्यांचा धर्म व संघ यांची मुक्तकंठानें प्रशंसा करण्यांत रंगले होते. त्या वेळीं तेथें लिच्छवी राष्ट्राचा सेनापति सिंहनाद हाहि उपस्थित होता. तो नीगंठाचा म्हणजे जैनांचा मोठा चाहता व उपासक होता. भगवंताची तेथें चाललेली ती प्रशंसा ऐकून एकदा जाऊन त्यांस भेटण्याची त्यास इच्छा झाली. आणि ती इच्छा त्यानें सरळ जाऊन नाथपुत्राजवळ उघड केली. पण नाथपुत्रानें 'बुद्ध हा अक्रियावादी आहे. सबब तुला तेथें जाणें योग्य नाहीं' असें म्हणून त्यास तिकडे न जाण्याचा सल्ला दिला. या गोष्टीला कांहीं दिवस गेल्यानंतर पुनः सिंह सेनापतीला बुद्धास भेटण्याची इच्छा झाली. या खेपेसहि त्यास त्या जैन गुरूनें तोच सल्ला दिला. पण तेवढ्यानें त्या सेनापतीचें समाधान झालें नाहीं. तेव्हां गुरूला न विचारतांच बुद्धाला

जाऊन भेटण्याचा मनांत निश्चय करून तो एके दिवशीं भगवान होते तेथें गेला. आणि त्यांना अभिवंदन करून बाजूस सरकून बसला.

नंतर तो भगवंताला म्हणाला–भदंत ! मी आपल्याला कांहीं महत्वाचे प्रश्न विचारावे म्हणतो. विचारूं का ?

**भगवानः**—खुशाल विचार.

**सिंहनादः**—भदंत, लोक आपणास अक्रियावादी म्हणत आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें आपण खरोखरच अक्रियावादी आहां काय ? आपला धर्मोपदेश अक्रियावादपर असतो आणि आपण शिष्यांना त्या मार्गावर घेऊन जातां, असा लोकप्रवाद आहे. गोष्ट खरी आहे, कां आपली निंदा करण्यास्तव लोकानी कांहीं तरी गप्प उठविली आहे ? खरें काय आहे हें सांगण्याची भगवंतानी कृपा करावी.

**भगवान** :—तसें म्हणशील तर तथागत अक्रियावादी नाहीं. पण कांही लोकांना मी तसा दिसतो, इतकेंच.

**सिंह** :—म्हणजे ?

**भगवान** :—म्हणजे असें. अहिंसा इत्यादि कायदुश्चरित, असत्यादि वची दुश्चरित, क्रोधलोभादि मनोदुश्चरित आणि त्याचप्रमाणें अनेक दुष्ट व पापकृत्यें हीं करूं नयेत असा मी पदोपदीं उपदेश करीत असतो. आणि या अर्थानें लोक मला अक्रियावादी म्हणतात, हें खरें, पण तेवढ्यावरून मी सर्वस्वी अक्रियावादीच आहे असें कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं.

**सिंह** :—मग आपण क्रियावादी आहां असेंच ना ?

**भगवान** :—होय. मी क्रियावादी आहे. कांहीं लोक मला क्रियावादी म्हणणारेहि आहेत. आणि तेंच खरें आहे.

**सिंह** :—अस्सं. हें नव्हतं मला माहीत.

**भगवान** :—आणि त्या लोकांचं म्हणणंहि तितकंच खरं आहे.

**सिंह** :—तें कसं, भदंत ?

**भगवान** :—दुष्कृत्यें करूं नयेत असं मी जसं ठासून सांगतो, तसंच सत्कृत्यें अवश्य करावींत, हेंहि पण त्याच वेळीं तितक्याच जोरानें खडसून सांगण्यास मी कमी करीत नाहीं. अर्थात् मी क्रियावादी आहे. सत्य बोलावं, गोड बोलावं, प्रेम करावं, परोपकार करावा, दया करावी, दानधर्म करावा, नीतीनं वागावं, अशा प्रकारचा माझा पदोपदीं उपदेश असल्यामुळें मी क्रियावादीहि ठरतोच. मनुष्यानं कुशल कर्म करावं—सत्कर्म करावं—हा माझा मुख्य उपदेश आहे आणि कर्म तसें फल हा माझा धर्मसिद्धांत आहे.

**सिंह** :—खरं, भदंत; आपलं म्हणणं मला पूर्ण पटलं. लोक आपल्याविषयीं भलत्याच अफवा उठवीत आहेत. बरं, आणखी एक. आपण उच्छेदवादी आहां असा लोकप्रवाद आहे. हें खरं कां ?

**भगवान** :—होय. कांहींसा मी तसा दिसतो खरा.

**सिंह** :—म्हणजे ?

**भगवान** :—अकुशल मनोवृत्तीचा—लोभ, द्वेष, मोह यांचा—उच्छेद करण्यासाठीं माझा उपदेश असतो. या दृष्टीनें मला उच्छेदवादी म्हणता येईल. पण वस्तुतः मी कांहीं उच्छेदवादी नाहीं. म्हणजे देहपातानंतर मागें कांहींच राहत नाहीं, या मताचा मी नाहीं.

**सिंह** :—भदंत, आतां माझ्या मनांत चांगला प्रकाश पडला. आपल्या संबंधानें लोकांच्या गोष्टी ऐकून माझा अत्यंत गैरसमज झाला होता. पण आपलें हें स्पष्ट व सरळ भाषण ऐकून तो दूर झाला.

इतकें म्हणून तो क्षणभर गप्प बसला.

---

# आत्मरक्षणार्थ लढाई द्या

( पाल केरस कृत बुद्ध चरित्र )

पुढें इतक्यांत त्यास आणखी कांहीं गोष्टींचा खुलासा करून घ्यावा असें वाटल्यावरून, तो पुन: भगवंतास म्हणाला—भदंत, आणखी कांहीं गोष्टी आपणाला विचारून खुलासा करून घ्यावा असें वाटूं लागलें आहे. योग्य सल्ला देऊन भगवान मला योग्य दिशा दाखवितील अशी मी आशा करतों. विचारूं का मी आणखी कांहीं प्रश्न ?

**भगवान** :—हो. हो. खुशाल विचार.

**सिंह** :—भदंत, मी एक लढाऊ बाण्याचा साधा व सीधा शिपाई-गडी आहे. मला तितकें सूक्ष्म धर्मज्ञान नाहीं. तथापि येथील राजानें देशांत सुव्यवस्था राखण्यास व परशत्रु चालून आला तर त्याबरोबर लढून देशाचें रक्षण करण्यास म्हणून मला आपल्या सेनेचा मुख्याधि-कारी नेमला आहे.

**भगावन** :—फार उत्तम गोष्ट.

**सिंह** :—म्हणून मी भगवंताला दोन महत्वाचे प्रश्न विचारावे म्हणतो. करूं ना तसं ?

**भगवान** :—जरूर. काय आहे तुझा प्रश्न ?

**सिंह** :—माझा पहिला प्रश्न हा कीं, आपण प्राण्यावर दया दाख-विण्यास व करुणा करण्यास सांगतां व शिकवितां म्हणे. म्हणजे आपण कट्टे अहिंसावादी आहां असें लोक म्हणतात. त्यांत किती तथ्य आहे ?

**भगवान** :—होय. तशी माझी शिकवण आहे खरी.

**सिंहनाद** :—मग आतां राजधर्माच्या दृष्टीनें मी असे विचारतो कीं जो दुष्ट व गुन्हे करणारा आहे—चोर व लुटारू आहे—त्याला शिक्षादंड करावा कां नाहीं ? ती हिंसा होते म्हणून कां त्यास तसेंच सोडून

द्यावें? त्याचप्रमाणें माझा दुसरा प्रश्न असा की, शत्रु आमच्या देशावर चालून आला तर त्या वेळीं देश रक्षणार्थ—आमचीं घरेंदारें व बायका-पोरें यांचें रक्षण करण्यासाठीं—अर्थात् आत्मरक्षणासाठीं लढाई द्यावी, कां लढाईंत हिंसा होते—घातपात होतो—म्हणून हात मिटून शत्रूला शरणचिठ्ठी द्यावी? अशा प्रसंगी आम्हीं काय करावें, याविषयीं माझें मन द्विधा झालें आहे. यावर भगवंतानी आपला अभिप्राय सांगून मला निश्चित करावें अशी माझी अपेक्षा आहे. या प्रश्नाचा खुलासा खुद्द भगवंताकडूनच ऐकून घ्यावा, यासाठीं मी इथं आलो आहे.

**भगवान**:—सिंहनादा! तुझे प्रश्न ठीक आहेत. राजपुरुषाला ते शोभण्यासारखे आहेत. या प्रश्नावर तथागताचे मत विचारशील तर तो असें स्पष्ट सांगतो कीं, जो गुन्हा करून शिक्षेस पात्र होईल, त्याला शिक्षाच केली पाहिजे. व जो उपकारास पात्र असेल त्यावर उपकारच केला पाहिजे. तरी तथागताची अशी आग्रहाची शिकवण आहे कीं, कोणत्याहि प्राण्याला आपण होऊन त्रास, इजा, दुःख, कष्ट द्यावयाचें नाहीं. सर्व प्राण्यावर दया व प्रेम दाखविलें पाहिजे. पण असें जरी असलें, तथागत अहिंसेचें व्रत जरी लोकांस उपदेशीत असला, तरी जो मनुष्य दुष्टावा करतो, गुन्हे करतो, जुलूम जबरदस्ती करतो, चोऱ्या खून करतो, त्याचें प्रायश्चित्त त्यास मिळूं नये, असें तो कधींच म्हणणार नाहीं.

**सिंहनाद**:—मग त्याला दंड, शिक्षा, मार, हाण इत्यादि करण्यास हरकत नाहीं, असाच ना भगवंताचा अभिप्राय?

**भगवान**:—होय, सिंहनादा, तथागताचा तसाच अभिप्राय आहे. अशा प्रसंगी हिंसा न्याय्य आहे. अशा प्रसंगीं प्राण्याला दुःख होतें म्हणून हिंसा करूं नये असें तथागत केव्हांही म्हणणार नाहीं. कारण जो दुष्टावा करतो तो आपल्या स्वतःच्या दुष्ट कृतीनेंच तें संकट आपणा-वर ओढून घेतो. त्याला दुसरा कोणी जबाबदार नाहीं. त्याच्या दुष्ट

कृतीचेंच कटु फळ तें आणि तें त्यास भोगलेंच पाहिजे ! कर्मसिद्धांत आहे तसा माझा. करावें तसें भरावें !

**सिंह्नाद** :—मग राष्ट्रांतील कायदे मोडणारास कायद्यानें फर्मावलेली शिक्षा करणें यांत अधर्म नाहीं तर ? ती गोष्ट हिंसेंत मोडत नाहीं मग ?

**भगवान** :—नाहीं. बिलकूल नाहीं. करावें तसें भोगावें, हा कर्मसिद्धांत आहे माझा. खून करणारास सुळाची शिक्षा फरमावण्यांत येते, तेव्हां त्या शिक्षेची जबाबदारी न्यायाधीशावर नसून त्या खुनी माणसाच्या त्या खुनी कृत्यावरच येऊन पडते. त्याच्या दुष्ट कृतीचेंच तें विषारी फळ होय ! हें त्याला समजलें म्हणजे पुन: तो तसलें कृत्य करणार नाहीं. प्रायश्चित्तानें शुद्धीवर येऊन मग तो पुढें आपोआप निवळूं लागतो. म्हणून दुष्टास न्यायानें दंड वा शिक्षा होणें न्याय्य आहे. राजधर्म आहे.

**सिंह्नाद**:—बरें, हें दुष्ट माणसाविषयीं झालें. हा एक माझा प्रश्न सुटला. राज्यांत सुव्यवस्था, सुरक्षितपणा व शांतता राखण्यास हें ठीक झालें. आतां लढाईविषयीं तथागताचें मत काय आहे, हें मला कळूं द्यावें.

**भगवान** :—ऐक. तेंहि सांगतो ऐक. एका माणसानें दुसऱ्यास मारहाण करावी, त्यास शस्त्रानें घायाळ करावे अगर त्याचा प्राण घ्यावा असा जेथें प्रसंग असतो अगर येतो अशी ती लढाई निंद्य व त्याज्य आहे, असें तथागताचें ठाम मत आहे. व तसें तो लोकांस उपदेश करीत असतो हें कांहीं खोटें नाहीं. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, लढाई ही मुळीं देऊंच नये. शांतता संपादनार्थ सर्व सामोपचाराचे प्रयत्न करून जर ते निष्फळ ठरतील व आपला सत्पक्ष आहे अशी मनाची खात्री असेल, तर तशा प्रसंगी आत्मरक्षणार्थ लढाई ही अवश्य दिलीच पाहिजे. तेथें माघार घेऊन चालणार नाहीं. अशा प्रसंगी जो लढाईला कारण होईल तोच त्याला जबाबदार आहे ! सिंहा ! जो बंडखोर व आततताई आहे—मग तो मनुष्य असो वा देव असो—हिंसेला भिऊन

त्यास शरणचिठ्ठी द्यावी असें तथागत मुळींच सांगत नाहीं ! तेथें नेटानें व धैर्यानें लढाई दिलीच पाहिजे ! मात्र असें करतांना आपला सत्पक्ष आहे याबद्दल मनांत पक्की खात्री असली म्हणजे झालें. स्वार्थासाठीं, चुरशीसाठीं, लोभासाठीं, हट्टासाठीं लढाई करावयास तथागत केव्हांहि सांगत नाहीं व सांगणार नाहीं. जो स्वार्थासाठीं, पैशासाठीं, वर्चस्वासाठीं अगर इज्जतीसाठीं शस्त्र उगारून लढाईस तयार होतो--दुसऱ्यास उपद्रव देतो—त्याचें कधीहि कल्याण होणार नाही. व त्याला बक्षीस मिळणार नाहीं . पण जो सत्यासाठीं, सद्धर्मासाठीं लढतो त्याला फार मोठं बक्षीस मिळेल. जरी एक वेळ त्याचा पराभव झाला, तरी त्याचा तो नैतिक विजयच होय ! !

**सिंहनादः**—–लढाईंत मरण आलें तर ?

**भगवानः**—–मेलें पाहिजे ! हें काय ? जो लढाई देण्यास तयार होतो त्याला मरणाला भिऊन कसें चालेल ? सिंहा ! मरणाला भिऊन कसें चालेल ? लढाईत मरणें व मारणें हा वीरांचा धर्मच आहे ! होय. लढाई चालली असतां शत्रूच्या तरवारीस देह अर्पण करण्याचा प्रसंग येणार नाहीं, असें कोण सांगेल ? तसा प्रसंग आला तर शौर्यानें लढून मरणास मिठी मारण्याची तयारी असलीच पाहिजे ! कारण वीरांचा–शूर क्षत्रियांचा–तो पवित्राच आहे ! ! मरणाला भिऊन रणातून पळ काढणारा तो योद्धा कसला ! नाहीं, क्षत्रियानें धैर्यानें लढलें पाहिजे व धैर्यानें मेलें पाहिजे ! !

**सिंहनादः**—–आणि सुदैवानें विजयी होऊन तो जिवंत राहिला तर ?

**भगवानः**—–सोनेंच झालें ! मग आणखी काय पाहिजे ? मात्र एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्या विजयानें हुरळून व ताठून जातां कामा नये. कारण जगांतील सर्व गोष्टी क्षणिक व चंचल आहेत. ही गोष्ट मनुष्यानें–विजयी पक्षानें–केव्हांहि डोळयांआड करूं नये. त्याचा विजय मोठा असेल, पण कालचक्र त्याहूनहि मोठें आहे ! तें केव्हां नि कसें

उलटेल आणि मिळविलेल्या विजयास मागें पुढें पुन: कशी धूळ चारील याचा कुणी काय नेम सांगावा ?

**सिंहनाद**:—मग याला उपाय काय ?

**भगवान**:—आहे, सिंहा, याला उपाय आहे. आणि तो म्हणजे दया, औदार्य, मनाचा मोठेपणा. ज्याचा लढाईत पराभव झाला असेल त्याविषयीं, द्वेष, मत्सर, सूडबुद्धि हीं सर्व टाकून देऊन, त्याला प्रेमानें पुन: जवळ करून 'ये मित्रा ! झालें तें होऊन गेलें. तें आपण आतां विसरून जाऊं ! आपण पुन: एक होऊन बंधुभावानें राहूं !' असें त्याच्याशी प्रेमळ भाषण करून त्याप्रमाणें वर्तन केल्यास तो सर्वांत मोठा व खरा विजय होय !! कारण अशा विजयानेंच लढाईचें खरें फल प्राप्त होऊन जगांत चिरकाल शांति व स्वास्थ्य नांदू लागतें. सिंहा, जो विजयशाली सेनापति आहे तो खरोखर धन्य आहे !! पण ज्यानें आपल्या आत्म्यावर जय मिळविला आहे तो त्याहूनहि धन्य होय !! सद्विद्या ही दुसऱ्याचा प्राण घेण्यास शिकवीत नाहीं. तर प्राण रक्षण करण्यास सांगते ! जो आत्मविजयी, तोच खरा सर्व विजयी होय !! सिंहा ! ज्याचे विचार कुशल आहेत, सरळ आहेत, प्रेमळ आहेत, त्याला अपजय कधी शिवणार नाहीं. त्याचा सर्व काळ जयच होत जाईल ! आणि तो चिरकाल टिकेल. ज्याच्या अंत:करणांत सत्याविषयीं प्रेम व सद्धर्माविषयीं अभिमान आहे, तो केव्हांहि जीवंतच राहील ! मरणार नाहीं ! कारण तो अमृत प्राशन करून अमर झालेला असतो. म्हणून सांगतो, हे रणवीरा ! सद्धर्मार्थ प्रसंग पडल्यास धैर्यानें लढ ! आणि शौर्यानें रणसंग्राम गाजीव !! सद्धर्माचा, सत्पक्षाचा तूं बाणेदार शूर शिपाई हो !! म्हणजे तथागताचा पूर्ण आशीर्वाद तुला मिळेलच मिळेल !!

**सिंहनाद**:—(दोन्ही हात जोडून) धन्य झालो मी, भगवन् ! हा आपला उपदेश ऐकून ! माझा संशय दूर झाला व मनातील मळमळ नष्ट झाली !

निश्चित व निर्मळ झालो आतां मी. भगवंतानीं मला योग्य मार्ग दाखविला. त्याप्रमाणें वागण्यास मी चुकणार नाहीं.

**भगवान:**—सिंहा ! हें सर्व तुला थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हें पुढील वचन लक्षांत ठेव.

असें म्हणून त्यांनी त्यास ही पुढील गाथा म्हणून दाखविली:—

**' यो सहस्स सहस्सेन संगामे मानुसे जिने ।**
**एकं जय्यमत्तानं स वे संगामजुत्तमो ॥ १०३ ॥**
**अत्ता ह वे जितं सेय्यो या चायं इतरा पजा ।**
**अत्तदन्तस्स पोतस्स निच्चं संयतचारिनो ॥ १०४ ॥**
**न देवा न गन्धब्बो न मारो सह ब्रम्हुना ।**
**जितं अपजितं कयिरा तथा रूपस्स जन्तुनो ॥ १०५ ॥**

धम्मपद

**भावार्थ:**—हे वीरोत्तमा ! ऐक. लढाईत हजार वेळां हजार शत्रूस जिंकणाऱ्या वीरापेक्षां जो आत्म्यावर जय मिळवितो तोच संग्रामजेता श्रेष्ठ होय ! लोकजयाहूनहि आत्मजय हा खरोखर मोठा आहे. मनुष्य आपल्या इन्द्रियावर जय मिळवून सतत संयमशील राहील तर त्याचा तो विजय देव, गंधर्व, ब्रह्म अगर मार यांपैकीं कोणीहि हिरावून घेण्यास समर्थ होत नाहीं ! !

वाचकहो ! भगवंताचा हा तेजस्वी उपदेश किती स्फूर्तिदायक आहे बरें ? अहिंसेचा सम्राट जो बुद्धदेव त्याची ही प्रसंगोचित तेजस्वी शिकवण राजकारणी पुरुषास मननीय नाहीं असें कोण म्हणेल ? क्षात्रधर्माची खच्ची झाल्यास राष्ट्रावर केवढी अपत्ति ओढवूं शकते याचें ताजे उदाहरण—त्या दुर्दैवी शाक्य राष्ट्राचें करुणास्पद उदाहरण—अजून त्यांच्या डोळ्यापुढें उभें होतें. तशांत त्या महत्वाकांक्षी अजातशत्रूचे दुष्ट विचार—वज्जीवर अचानक हल्ला करून

त्यांना नेस्तनाबूद करण्याचे कुटिल विचार—अजून त्यांच्या कानांत घुमत होते. या सर्वांचा परिणाम म्हणूनच कीं काय, भगवंतानी तसा बाणेदार उपदेश त्या सिंहनादास दिला. यांत अनुचित असें काय झालें? योगीश्वर याज्ञवल्क्यांनी 'क्षत्रं हि वज्रेण स्पृणोति'—राष्ट्राचे शस्त्रानेंच रक्षण होतें—असें जें शतपथांत म्हटलें आहे त्याचाच अनुवाद भगवंतानी केला, यांत वावगें काय आहे?

---

## भगवंतांचा अखेरचा वर्षावास

महापरिनिब्बाणसुत्त, १६

भगवंताचा वर्षावासाचा तळ या खेपेस वैशालीजवळ असलेल्या बेलुवगाम येथें येऊन पडला. हाच त्यांचा शेवटचा वर्षावास होय. आणि तो संबोधीनंतरचा ४६ वा वर्षावास. पूर्णप्रज्ञ झाल्यावर आपल्या धर्मप्रसाराचें काम नेटाने व उत्साहाने चालविण्यास त्यांना हा जो प्रदीर्घ काल लाभला तसें भाग्य त्यांच्यानंतरच्या कोणत्याहि धर्म संस्थापकाला लाभलें नाहीं. प्रभु येसू ख्रिस्त बाप्तिस्मा झाल्यावर फक्त सत्तावीस महिनेच काय ते आपल्या धर्मप्रसाराचें कार्य करून सनातनी यहुद्यांच्या रोषास व कुटिल कारस्थानास अखेर बळी पडले. हजरत महमद पैगंबर झाले तरी आपल्या वयाच्या ४४ व्या वर्षीं धर्मप्रचाराच्या कार्यास सुरुवात करून वयाच्या ६३ व्या वर्षी इहलोक यात्रा संपविली. या दृष्टीनें विचार केल्यास भगवंताचें भाग्य सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ असें म्हणण्यास हरकत नाहीं. जवळ जवळ दोन पिढ्या त्यांनी अखंड धर्मचर्चेंत व धर्मप्रसारार्थ घालविल्या, हें काय थोडें झालें? वाद खेळणाऱ्यांशी वाद खेळला, उपदेश मागणाऱ्यांना उपदेश दिला. वाट विचारणाऱ्यांना वाट दाखविली. आणि जिज्ञासूंना ज्ञानसंपन्न केलें! जातिभेद ठेविला नाहीं, स्त्री—पुरुष भेद पाहिला नाहीं. लहान व थोर यांत तारतम्य राखलें

नाहीं. इच्छा दर्शवितांच तो कोणी जरी असला तरी त्याला दीक्षा देऊन भिक्षुसंघांत दाखल करून घेण्यांत आलें. व त्याला शाश्वत शांति-सुखाचा सन्मार्ग सरळ व स्पष्ट दाखविण्यांत आला.

संबोधि प्राप्त झाल्यावर भगवंताचा वर्षावास कोणत्या वर्षी कोठें झाला याचा येथें धावता उल्लेख करून, मग पुढील चरित्र भागाकडे वळतो. भगवंतास संबोधि प्राप्त झाली ती वैशाख शुद्ध पौर्णिमेस झाली. पुढें दोन महिन्यांनीच जो वर्षावास आला तो त्यांनी वाराणशी नजीकच्या ऋषिपत्तन येथील मृगदाववनांत काढला. येथेंच त्यांनी प्रथम पंचवर्गीय भिक्षूंस उपदेश करून धर्मचक्रप्रवर्तन केलें. अर्थात् हाच त्यांचा पहिला वर्षावास होय. तो ऋषिपत्तन ( इशिपत्तन ) येथें झाला. नंतर दुसरा, तिसरा व चौथा वर्षावास बिंबसार राजाच्या राजगृहातील वेणुवनांत काढला. पांचवा वैशाली येथें, सहावा मंकुल पर्वतावर, सातवा त्रयस्त्रिंश येथें, आठवा सुंसुमार गिरीवर, नववा कौशांबी येथें, दहावा पारिलेयक येथें, अकरावा नाला येथें, बारावा वैरंजा येथें, तेरावा चालिय पर्वतावर, चौदावा श्रावस्ती येथें, पंधरावा कपिलवस्तूंत, सोळावा आलवी येथें, सतरावा राजगृहांत, अठरावा चालिय पर्वतावर, एकोणवीसावा पुनः चालिय पर्वतावर, वीसावा राजगृहीं वेणुवनांत व पुढील पंचवीस वर्षावास एकट्या श्रावस्ती येथें आणि अखेरचा वैशाली येथें याप्रमाणें सेचाळीस वर्षावास भगवंतानी निरनिराळ्या ठिकाणी राहून काढले. त्यांपैकी जवळ जवळ पंचवीस सव्वीस वर्षावास त्यांचे एकट्या श्रावस्ती येथें झाले. त्याचे खालोखाल म्हणजे राजगृहीं पांच, चालिय पर्वतावर तीन, वैशाली येथें दोन आणि बाकीचे इतर ठिकाणी झाले. अखेरचा वर्षावास त्यांचा वेलुवगाम व वैशाली या दोन्ही ठिकाणीं मिळूनच झाला.

भगवान वैशालीत अंबपालीच्या वनांत कांहीं दिवस राहिल्यावर तेथून निघून वेलुवगामांत येऊन त्यांनी मुक्काम केला. वर्षावास अगदी समीप

आल्यामुळें तो वर्षावास त्यांनी तेथेंच राहून काढण्याचें ठरवून, त्या-प्रमाणें तो तेथेंच राहून काढला. मात्र भिक्षूंना वैशालीच्या आसपास त्यांचे जे आप्तइष्ट, सगे—सोयरे असतील, तेथें जाऊन राहण्यास त्यांनी परवानगी दिली. व त्याचा फायदा कित्येक भिक्षूंनी घेतला.

भगवंताची प्रकृति आतां फार थकली होती. वय जवळ जवळ ८० च्या घरीं आलें असून, शरीर अगदी जर्जर झालें होतें. उत्साह कशाचा राहिला नव्हता. त्यांच्या मर्जीतील व प्रेमातील बहुतेक माणसें या मृत्युलोकींचा संसार आटपून निजधामास गेलीं होतीं. आनंदाशिवाय त्यांना आतां म्हणण्यासारखा जवळचा असा कोणी जिव्हाळ्याचा राहिला नव्हता. थोडक्यांत म्हणजे भगवान आतां फार थकले व भागले होते.

तशांत तो वर्षावास त्यांना सुखाचा गेला नाहीं. त्यांना त्या वर्षा-वासांत फार मोठ्या दुखण्यानें गांठलें. शरीरांत तीक्ष्ण व असह्य वेदना उत्पन्न होऊन प्रकृतिमान एकदम ढासळलें. तें इतकें कीं, त्यांचें जीवि-तच त्यामुळें धोक्यांत येऊन पडलें. अगोदरच म्हातारपण, तशांत मानसिक अस्वास्थ्य आणि तशांतच व्याधीची भयंकर पीडा ! मग थकले भागलेलें जीवित धोक्यांत येणार नाहीं तर काय होईल ? होय, तें गोत्यांत आलें खरें. पण भगवान म्हणूनच त्यांतून निभावले ! दुसरें कोणी असतें तर तेव्हांच राम म्हटलें असतें. महा योगीश्वर ते ! स्मृति जागृत ठेऊन, प्रज्ञा उजळून, विकारवश न होतां, शारीरिक पीडा व मानसिक त्रास यांना दाद न देतां मन शांत व प्रसन्न ठेवून प्राप्त संकटास धैर्यानें तोंड दिलें आणि तो जिवावरचा कठीण प्रसंग टाळला ! लवकरच ती बाधा मागें हटली व प्रकृति निवळूं लागली.

तो प्रसंगच तसा होता कीं, त्या वेळीं ते परिनिर्वाण पावते तर फार मोठा घोटाळा झाला असता. अजून त्यांना निरवानिरव करावयाची होती. संघांतील बरेच भिक्षू बाहेर गांवीं आपल्या आप्तस्वकीयांजवळ

राहावयास गेले होते. त्यांना कांहीं गोष्टी सांगावयाच्या होत्या व त्यांच्याकडून कांहीं ऐकून घ्यावयाच्या होत्या. आणि मग सर्वांस अखेरचा उपदेश व संदेश देऊन नंतर आपली इहलोक यात्रा संपवावयाची होती. तेवढ्याचसाठीं त्यांना कांहीं काळ जगावयाचें होतें आणि तें त्यांनी अपूर्व वीर्य—बलाच्या योगानें केलें. त्यांची त्या व्याधीतून सुटका झाली आणि ते लवकरच पूर्वस्थितीवर आले.

पुढें एके दिवशी विहाराच्या छायेंत पसरिलेल्या आसनावर बसून आनंदास जवळ बोलावून घेऊन त्यास ते म्हणाले—आनंदा! भिक्षुसंघ माझ्यापासून आणखी काय अपेक्षा करीत आहे? आजपर्यंत मी जो धर्मोपदेश तुम्हांस केला, त्यांत आंत बाहेर असा मुळींच भेद केला नाहीं. आचार्यमुष्टि म्हणून जें कांहीं गुपित ठेवण्यांत येतें तें मजजवळ मुळींच नाहीं. माझ्या धर्मोपदेशांत गुप्त व प्रगट असा भेदभाव नाहीं. मला जेवढें सांगायचें होतें व सांगावेंसें वाटलें, तें सर्व मी तुम्हास स्पष्ट समजावून सांगितलें आहे. कांहीं श्रमण ब्राह्मण कांहीं ज्ञान गुप्त ठेवून आपल्या शिष्यांस धर्मोपदेश करीत असतात. त्यांत त्यांचा हेतु असा असतो कीं, आपणच गुरु म्हणून सदैव शिष्य संघाचा नेता होऊन मिरवावें. पण तथागताला तशी इच्छा मुळींच नाहीं. मग काय म्हणून तो सत्यज्ञान शिष्यांपासून लपवून ठेवील? असो. आनंदा, मी आतां म्हातारा झालो आहे. वय ऐशींच्या घरीं आलें आहे. अर्थात् माझें जीवित संपुष्टांत आलें आहे. मी आतां फार दिवस जगेन ही आशा नाहीं. ज्याप्रमाणें जुना गाडा त्याचे मोडके तोडके भाग दोऱ्यांनी बांधून काढल्यामुळें कसाबसा रखडत चालू राहतो त्याप्रमाणें तथागताचें झालें आहे. तेव्हां, आनंदा, तुला सांगावयाचें इतकेंच कीं, तुम्हीच आपले आपणास आधार व्हा. तुम्हीच आपलें आपणास शरण व्हा. दुसऱ्या कोणाचाहि आधार घेऊं नका. धर्माचा आधार घ्या, धर्मासच शरण जा. दुसऱ्या कशासहि शरण जाऊं नका. याप्रमाणें, आनंदा, जे भिक्षु आतां व मी

परिनिर्वाण पावल्यानंतर आपला आपणच आधार होतील, धर्माचा आधार घेतील, इतरास शरण जाणार नाहींत, ते भिक्षूच आनंदा! उच्च प्रतीस—श्रेष्ठ सुखास—जाऊन पोंचतील! मझ्यापासून जें काय शिकावयाचें असेल तर तें हें.

इतकें भाषण केल्यावर त्यांस थकवा आला व म्हणून तेवढ्यावरच त्या भाषणाची समाप्ति झाली.



## बुद्धांचा अखेरचा उपदेश

महापरिनिब्बाणसुत्त १६, भाग ३

भगवान महावनांतील कूटागार विहारांत असतांना,—त्यांना काय वाटलें कोणास ठावूक,—आनंदाला हाक मारून वैशालीच्या आसपास जेवढे म्हणून भिक्षु होते, त्या सर्वांस बोलावून आणण्यास त्यांनी सांगितलें.

त्याप्रमाणें आनंदाने जाऊन सर्व ठिकाणी फिरून शक्य तेवढा भिक्षुसंघ कूटागार शालेंत जमविला आणि ती वर्दी भगवंतांस दिली. तेव्हां ते उपस्थान—शालेंत आले. व आपल्या जागी जाऊन बसले. भिक्षुसंघहि त्यांच्या पुढें अर्धवर्तुळांत येऊन बसला.

सर्वजण व्यवस्थित येऊन बसल्यावर त्यांना उद्देशून भगवान म्हणाले:—भिक्षू हो, जे धर्म मी स्वत: जाणून तुम्हास वेळोवेळीं उपदेशिले आहेत, त्यांचें तुम्ही नीट आकलन करावें. ब्रह्मचर्यव्रतानें राहून चारित्र्य शुद्ध व पवित्र राखावें आणि ते माझे धर्म चिरकाल टिकतील अशी उपाययोजना करावी. त्या धर्माचा जगांत फिरून लोकांना उपदेश करावा. आणि तो वाढवून बहुजनांचें हित व कल्याण साधावें.

भिक्षु :—ते धर्म कोणते, हें पुन: एकदां सांगण्याची कृपा व्हावी.

**भगवान** :—ऐका. सांगतो तर. चार स्मृत्युपस्थानें म्हणजे कायानुदर्शन, वेदनानुदर्शन, चित्तानुदर्शन, व धर्मानुदर्शन हीं तीं चार स्मृत्युपस्थानें होत.

**भिक्षु** :—कायानुदर्शन म्हणजे काय ? भदंत !

**भगवान** :—शरीर हें अपवित्र आहे, ही भावना अखंड तेवत ठेवणें, यास कायानुदर्शन स्मृत्युपस्थान असें नांव आहे.

**भिक्षु** :—वेदनानुदर्शन म्हणजे ?

**भगवान** :—विषय ग्रहण व सेवन हें सर्वथैव दुःखमय आहे अशी भावना करणें, यास वेदनानुदर्शन हें नांव आहे.

**भिक्षु** :—हं, समजलें. आतां चित्तानुदर्शन ?

**भगवान** :—चित्त हें चंचल आहे ही गोष्ट सदैव लक्षांत बाळगणें, हें चित्तानुदर्शन स्मृत्युपस्थान होय. आणि तसेंच चौथें म्हणजे धर्मानुदर्शन. अर्थात् संसारांतील सर्व वस्तु नाशवंत आहेत याची आठवण बुजूं न देणें. अशीं ही चार स्मृत्युपस्थानें आहेत. त्याचप्रमाणें चार सम्यक् प्रधान आहेत.

**भिक्षु** :—त्याचाहि खुलासा करा ना ?

**भगवान** :—(१) जीं पुण्यकर्मे उत्पन्न झालीं नसतील तीं उत्पन्न करणें, (२) उत्पन्न झालेल्या पुण्यकर्माचें संवर्धन व संरक्षण करणें, (३) त्याचप्रमाणें उत्पन्न झालेल्या पापकर्मांचा नाश करणें, व (४) उत्पन्न न झालेल्या पापकर्मांस उत्पन्न होऊं न देणें असे हे चार सम्मप्पधान आहेत. आतां पुनः आणखी, ऋद्धिपाद हेहि चार आहेत.

**भिक्षु** :—ते कोणते ?

**भगवान** :—असामान्य क्षमता प्राप्त करून घेण्याची इच्छा व दृढ संकल्प यास छंद—ऋद्धि नांव आहे. (२) ती क्षामता प्राप्त करून घेण्याचा उद्योग, यास वीर्यवृद्धि म्हणतात. (३) ती क्षामता प्राप्त

करून घेण्याचा उत्साह, यास चित्त–ऋद्धि हें नांव आहे. व (४) चौथी ऋद्धि म्हणजे मीमांसा–ऋद्धि होय. हे चार ऋद्धिपाद होत.

**भिक्षु** :—संपलें ?

**भगवान** :—नाहीं; अजून आहे. ऐका. एकंदर पांच इन्द्रियें म्हणजे बलें आहेत. तीं म्हणजे हीं:–१ श्रद्धा, २ वीर्य, ३ स्मृति, ४ समाधि व ५ प्रज्ञा. अशीं हीं पांच इन्द्रियें आहेत. त्याचप्रमाणें हीं पुढील सात संबोध्यंगें होत.

**भिक्षु** :—तीं कोणतीं ?

**भगवान** :—तीं हीं. १ स्मृति, २ धर्म, ३ वीर्य, ४ प्रीति, ५ प्रश्रब्धि, (प्रशांति ), ६ समाधि व ७ उपेक्षा. अशीं हीं सात संबोध्यंगें होत. समजलें काय सांगितलें तें ?

**भिक्षु** :— ( माना हलवून ) समजलें, भदंत.

**भगवान** :—आतां राहतां राहिला आर्य अष्टांगिक मार्ग. तो तुम्हास ठाऊकच आहे.

**भिक्षु** :—होय.

**भगवान** :—मग सांगा तर तो काय आहे ?

**भिक्षु** :—१ सम्यक् दृष्टि, २ सम्यक् संकल्प, ३ सम्यक् वाचा, ४ सम्यक् कर्मांत, ५ सम्यक् आजीव, ६ सम्यक् व्यायाम, ७ सम्यक् स्मृति व ८ सम्यक् समाधि. हाच ना आर्य अष्टांगिक मार्ग ?

**भगवान** :—होय. आणि याचें स्पष्टीकरण मागें मी केलेंच आहे. पुनः चर्वित चर्वण करण्याचें कारण नाहीं. भिक्षू हो, आतां ऐका. याप्रमाणें वरील सदतीस तत्त्वांचा संग्रह करून, त्यांवर मी माझा धर्म आधारला आहे. तुम्ही लोक या सर्वांचें सम्यक् स्वरूप ओळखून, त्यांचें चिंतन व आलोचन करून, सर्व मानवमात्रांच्या हितार्थ व सुखार्थ त्याचा जगभर हिंडून व फिरून सर्वत्र प्रसार करा ! सावधान चित्तानें माझ्या उपदेशाचें सार ग्रहण करा व तत्त्वचिंतन करून

त्याचा अनुभव घ्या. संसारातील सर्व उत्पन्न झालेल्या वस्तु काल-वश म्हणजे अनित्य आहेत. म्हणून तुम्ही जागृत होऊन व राहून नित्य निर्वाणाचें साधन करा ! आतां लवकरच तथागत परिनिर्वाण पावणार आहे ! आजपासून तिसऱ्या महिन्याच्या शेवटीं तो परिनिर्वाणा-प्रत जाईल ! !

असें म्हणून त्यांनी पुढील गाथा म्हटली:—

**परिपक्को वयो मय्हं, परित्तं मम जीवितं ।**
**पहाय वो गमिस्सामि,कतं मे सरणमत्तनो ॥**
**अप्पमत्ता सतीमन्तो सुसीला होथ भिक्खवो ।**
**सुसमाहित सङ्कप्पा सचित्तम'नुरक्खथ ॥**
**यो इमस्मि धम्मविनये अप्पमत्तो, विहेस्सति ।**
**पहाय जातिसंसारं दुक्खस्स'न्तं करिस्सती'ति**

दीर्घनिकाय १६-३-५१

भावार्थ: —माझें वय आतां परिपक्व झालें असून, माझें जीवित फार थोडें राहिलें आहे. मी तुम्हास आतां सोडून जाईन. पण माझा मीच आधार झालो आहें. भिक्षु हो ! अप्रमत्त, स्मृतिमान, सुशील असे तुम्ही व्हा ! आणि सुसमाहित-संकल्प होऊन स्वचित्ताचें रक्षण करा ! जो या धर्मविनयामध्यें तत्पर राहील, तो जन्ममृत्यूच्या संसारातून मुक्त होऊन, सर्व दु:खाचा अंत करील ! !

ही गाथा म्हणून झाल्यावर भगवान तेथून उठून बाहेर आले. हा बुद्धाचा शेवटचा उपदेश होय.

येथें कूटागारांत कांहीं दिवस राहून पुढें तेथून भंडगाम, हत्थिगाम, अंबगाम, जंबुगाम, भोगनगर याप्रमाणे गांवोगांव मुक्काम करीत करीत अखेर मल्लांच्या पावानगरीस येऊन तेथें चुंद लोहाराच्या अंबवनांत त्यांनी तळ दिला.

---

# चुंदघरीं भिक्षा ग्रहण

महापरिनिब्बाणसुत्त, भाण १६–४

मनुष्याची प्रकृति एकदा ढासळली म्हणजे पुढें कांहीं केलें तरी ती पूर्वपदावर येणें नाहीं. फार तर कांहीं दिवस ती टिकाव धरून राहील. पण पूर्वीची रग व धमक मात्र पुन: तेथें येणें नाहीं. तशांत म्हातारपणांत ती बिघडली तर पुन: निवळण्याची मग आशा फारच कमी. उतार वयांत साहजिकपणेंच शक्तीचा ऱ्हास झालेला असतो. आणि दिसंदीस होत चाललेला असतो. आणि तशांत एखाद्या आजारानें अगर रोगानें गांठलें कीं मग बोलावयासच नको ! पुढील ग्रंथ लवकर आटपलाच म्हणून समजावा. येथें भगवंताची सुद्धां कांहीं अंशी अशीच कथा झाली. ते मागच्या भयंकर आबाधातून बचावले हें खरें आणि प्रकृति सुधारलीशी वाटली, हेंहि कांहीं खोटें नाहीं. पण तो प्रकार फार दिवस टिकला नाहीं. अधून मधून प्रकृतीचें मान घसरत व बिघडत असे. भोगनगराहून पावानगरीस आले तेव्हां त्यांची प्रकृति जरा नरमच होती. तथापि बाहेर तसें त्यांनी दाखविलें नाहीं, इतकेंच.

आपल्या अंबवनांत बुद्ध भगवंतांचा मुक्काम येऊन पडला आहे, ही गोष्ट तेथील मालकास म्हणजे चुंद लोहारास समजतांच त्यास अत्यंत आनंद झाला. 'साधुसंत येती घरा । तोचि दीवाळी दसरा' ही साधूक्ति भारतीयांच्या साधुसंतावरील अलोट श्रद्धेची व भक्तीची निदर्शक आहे. हें भारतीय लोकांचें हाडींमांसीं खिळलेलें एक महनीय वैशिष्ट्य आहे. या वचनास अनसरून त्या चुंद लोहारानें भगवंतांस जाऊन भेटून, त्यांस आदरपूर्वक नमस्कार करून, दुसरे दिवशीं आपल्या घरीं भिक्षुसंघासहित भोजनास येण्यास आमंत्रण दिलें. व भगवंतांनी मौन धारण करून त्याचा स्वीकार केला.

घरीं आल्यावर दुसरे दिवशी भगवंतांच्या भोजनास म्हणून उत्तमोत्तम पदार्थ तयार केले. त्यांतच रानडुकराचें मांस आणून त्याचें 'सूकरमद्दव'

नांवाचें सुंदर पक्वान्न तयार केलें. सुग्रास भोजनाची उत्तम तयारी ठेवून भगवंतांस निरोप पाठविणेंत आला. वर्दी येतांच भगवान वस्त्र परिधान करून, पात्र व चीवर घेऊन भिक्षुसंघासहित चुंदाच्या घरी आले व तेथें त्यांचेसाठी मांडलेल्या आसनावर जाऊन बसले. आणि चुंदास बोलावून म्हणाले, 'चुंदा, तूं जें सूकरमद्दव माझेसाठीं म्हणून तयार केलें आहेस, तें फक्त मला एकट्यालाच वाढ.इतरांना वाढूं नकोस. व जे दुसरे खाद्यभोज्य पदार्थ तयार केले आहेस, ते भिक्षुसंघास वाढ.'

'ठीक, भगवन्' असें भगवंतास उत्तर देऊन त्यानें त्याप्रमाणें केलें. सर्वांचें जेवण झालें व भगवानहि सूकरमद्दव भक्षण करून संतुष्ट झाले. नंतर जेवण आटपल्यावर माजघरांत मांडलेल्या आसनावर बसून चुंदास जवळ घेऊन, त्यास यथोचित उपदेश केला आणि मग भिक्षुसंघासहित ते तेथून उठून मुक्कामाकडे निघाले.

चुंदाच्या घरीं जेवण करून मुक्कामास येऊन पोंचल्यावर पुढें लवकरच भगवंतांच्या पोटांत कळा येऊं लागल्या! त्यांस अतिसाराची बाधा झाल्यासारखी होऊन, पोट मुरडून दोन चार रेच झाले! आणि पोटांत मरणांतिक वेदना होऊं लागल्या! तथापि भगवंतांनीं त्या मोठ्या धैर्यानें सहन करून पुढें त्यांस काय वाटलें कोण जाणे, आनंदास हांक मारून म्हटलें 'चल, आनंदा, आपण आतां येथून हलून कुसिनारास जाऊं.'

त्याप्रमाणें भगवान तेथून मुक्काम हलवून कुसिनाराच्या रोखानें चालूं लागले. आतां येथें हें सांगितलें पाहिजे कीं हें जें त्यांचे चुंदाच्या घरीं भोजन झालें, तेंच त्यांचें अखेरचें भोजन होय.

पुढें प्रवासांत असतां त्यांचा विकार उत्तरोत्तर वाढतच चालला व म्हणून त्यांनी आनंदास जवळ बोलावून घेऊन त्यास म्हटलें की, आनंदा आज रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं कुसिनारा नगरींत उपवत्तनांत मल्लांच्या सालवनांत दोन सालवृक्षांच्या मध्यें तथागताचें परिनिर्वाण होईल!!

---

# अंबवनांत

महापरिनिब्बाणसुत्त १६–४ ( दीघनिकाय )

पुढें भगवान तेथून निघून ककुत्थ नदीवर आले. तेथें आल्यावर नदींत उतरून स्वच्छ स्नान करून व थोडेसें पाणी पिऊन वर आले व नदी ओलांडून पलीकडल्या तीरावर पोंचल्यावर पुढें थोडेसें चालून तेथील अंबवनांत येऊन उतरले.

तेथें आमराई दाट व सुंदर असून वृक्षाची गार छाया सर्वत्र दाट पसरली होती. तेथें येऊन पोंचल्यावर त्यांना थोडासा थकवा वाटूं लागला व पुढें चालवेना. म्हणून चुंदकास हाक मारून म्हणाले:— चुंदका, मला जरासा थकवा आल्यासारखा वाटतो. पुढें जावेसे वाटत नाहीं. तर येथेंच माझी ही संघाटी चौघडी करून पसर. त्यावर जरा अडवा होईन म्हणतो.

चुंदकानें त्याप्रमाणें केलें. नंतर भगवान त्यावर सिंहशय्या करून म्हणजे पायावर पाय ठेवून उजव्या कुशीवर अडवे झाले. थोडा वेळ स्वस्थ पडून विश्रांति घेतल्यावर त्यांस थोडा आराम वाटला व हुषारी आली.

इतक्यांत त्यांस चुंदाची आठवण झाली. तो सूकरमद्दव भक्षण केल्यापासून त्यांच्या प्रकृतीत बराच बिघाड झाला होता. मधून मधून अमांशाचे व रक्ताचे रेच होतच होते. त्यामुळें त्यांची प्रकृति फार नाजूक व हैराण झाली होती.

हा विकार भगवंतास चुंदाच्या भिक्षेमुळें झाला, म्हणून लोक त्याला बोलतील, नांवें ठेवितील, निंदा–निर्भत्सना करतील, हा विचार त्यांच्या मनांत येऊन तसा प्रकार होऊं नये, या उद्देशानें आनंदास हाक मारून ते त्याला म्हणाले:—आनंदा, चुंद लोहाराला कोणी म्हणेल कीं, 'चुंदा, तथागत तूं दिलेलें भिक्षान्न भोजन करून परिनिर्वाण पावला

हें कांहीं ठीक झालें नाहीं. ही गोष्ट फार वाईट झाली. यांत तुला पाप आहे !' असें म्हणून जर कोणी त्याला हिणवील, दुखवील तर तुम्ही त्याचा विषाद याप्रमाणें बोलून घालवावा व त्याचें समाधान करावें.

**आनंद** :—काय बोलावें, भदंत ?

**भगवान** :—त्याला असें म्हणावें कीं, ' चुंदा तूं मोठा भाग्यवान आहेस ! ज्या तुझ्या अन्नाचें सेवन करून तथागत परिनिर्वाण पावला, तें अन्नदान खरोखरच तुला मोठें लाभदायक आहे ! आम्ही तथागताकडून असें ऐकलें आहे कीं, तथागताला मिळालेल्या एकंदर भिक्षांमध्यें फक्त दोनच भिक्षा अधिक फलप्रद व अत्यंत प्रशंसनीय अशा आहेत. त्या म्हणजे, एक जी भिक्षा घेऊन तथागतानें संबोधि मिळविली ती व दुसरी जी भिक्षा घेऊन त्यानें परिनिर्वाण प्राप्त करून घेतलें ती. या दोनच भिक्षा अत्यंत फलदायक आहेत, म्हणून चुंदानें जें केलें तें ठीकच केलें. तें अन्नदान खरोखरच मोठें आयुष्यवर्धक, सुखकारक, व यशस्कर आहे ! आणि तसेंच तें स्वर्गदायक व ऐश्वर्यप्रापकहि पण आहे ! आनंदा असें बोलून तुम्हीं त्याची समजूत करा. नि त्याचा विषाद घालवा ! !' असें म्हणून अखेर भगवंतांनी हें पुढील उदान म्हणून दाखविलें:—

**' ददतो पुञ्ञं पवड्ढति, संयमतो वेरं न चीयति ।**
**' कुसलो च जहाति पापकं, रागदोसमोहक्खया स निब्बुतो'ति ॥**

( उदान ८–५ )

दात्याचें पुण्य वाढतें. संयमनशीलाचें वैर वाढत नाहीं. जो कुशलवृत्तींचा आहे तो पाप टाकून देतो आणि राग द्वेष व मोह यांच्या क्षयानें निर्वाणाप्रत जातो.

---

# सालवृक्षाखालीं

परिनिब्बाणसुत्त ( दीघनिकाय ) १६–५

याप्रमाणें अंबवनांत राहून थोडीशी विश्रांति घेतल्यावर पुढें तेथून हलून हिरञ्ञवती ( हिरण्यवती ) नदीच्या कांठावरच पण कांहीं अंतरावर असलेल्या कुसिनार गांवच्या मल्लांच्या सालवनांत येऊन मुक्काम केला. या वेळीं त्यांच्याबरोबर पांचशे लोकांचा भिक्षुसंघ होता. येथें आल्यावर तर त्यांची प्रकृति फारच थकली. पुढें पाऊल देखील ठेववेना. तेव्हां एक मंचक आणवून तो दोन सालवृक्षांमध्यें ठेववून त्यावर उत्तरेकडे मस्तक करून उजव्या कुशीवर सिंहशय्या करून त्यांनी शयन केलें.

या वेळीं त्या सर्व सालवनांत फक्त दोनच सालांना अकाली फुलांचा मोठा बहर आला होता. भगवान तेथें निजल्यावर तीं झाडावरील फुलें आपोआप टपाटप खालीं त्यांच्या अंगावर व आजूबाजूस गळून पडूं लागलीं ! स्वर्गांतूनहि दिव्य पुष्पांची व परिमळ गंधद्रव्यांची वृष्टि होऊं लागली ! देवतागण आकाशांत जमून सुस्वर गीतें व वाद्यें गाऊं व वाजवूं लागला.

तेव्हां भगवान आनंदाला म्हणाले, 'आनंदा, पाहा. या दोनच सालवृक्षांना पुष्पांचा बहर आला आहे. हा अकालीं आहे. तो तथागताच्या सन्मानार्थच आला आहे ! दुसरें असें कीं आकाशांतूनहि पुष्पवृष्टि होत आहे. व देवगण एकत्र जमून गीत, वाद्य, नृत्य करीत आहेत. हेंहि तथागताच्या पूजा–सन्मानार्थच होय. पण आनंदा, असल्या प्रकारच्या पूजा–सन्मानानें तथागताचा पूजा–सत्कार होऊं शकत नाहीं. पण जो कोणी भिक्षु, भिक्षुणी, उपासक व उपासिका तथागताच्या धर्माप्रमाणे विशुद्ध आचरण करील, तर तो तथागताचा योग्य सत्कार झाल्यासारखा होईल. म्हणून सांगतो, आनंदा, माझ्या धर्माप्रमाणें

विशुद्ध जीवन ठेऊन सदाचरणानें वाग व लोकांसहि तें शिकव व करावयास लाव ! ! म्हणजे माझी खरी पूजा व सन्मान केल्याचें श्रेय लाभेल.' आनंदानें आपली मान हलवून त्यास मूक सम्मति दिली.

---

## चार महातीर्थांची घोषणा

महापरिनिब्बाणसुत्त १६–५

हें झाल्यावर नंतर कांहीं वेळानें आनंद म्हणाला 'भगवन्, आतां आपला परिनिर्वाणकाळ समीप आला. आपण होतां तोपर्यंत महानुभाव भिक्षुलोक पावसाळा संपल्यावर अखेर आपलें दर्शन घेण्यासाठीं म्हणून आपल्याजवळ येत होते व आपल्याजवळ राहणाऱ्या आम्हालाहि त्यांचें दर्शन घडत होतें. आतां आपण निघून गेल्यावर हे महानुभाव येणार नाहींत व आम्हास त्यांची भेट होणार नाहीं. आपल्या पश्चात् भगवानाच्या भिक्षु–शिष्यांची पुनर्भेट होण्याचें भाग्य आतां यापुढें आम्हास लाभणें शक्य नाहीं, हें फार वाईट झालें. भदंत ! शिवाय आपली सेवाहि सुटली व दर्शनहि अंतरलें ! !

आनंदाची ही दुःखित वाणी श्रवण करून भगवान उत्तरले 'आनंदा, असें समजण्याचें कारण नाहीं. मी तुमच्यातून गेलो तरी माझीं मुख्य चार स्थानें मागें राहतीलच.'

आनंद :—तीं कोणती, भदंत ?

**भगवान** :—तथागत जेथें जन्मला ती कपिलवस्तु हें एक स्थान. त्यास सम्यक् संबोधि जेथें प्राप्त झाली तें एक स्थान. म्हणजे बुद्धगया. तिसरें स्थान म्हणजे जेथें तथागतानें धर्मचक्र प्रवर्तन केलें तें वाराणशी येथील मृगवन व चौथें म्हणजे तथागत जेथें परिनिर्वाण पावतो तें स्थान म्हणजे कुशीनार.

**आनंद** :—हीं चार स्थानें आपल्या पश्चात् दर्शनीय म्हणावयाचीं तर.

**भगवान** :—होय, आनंदा, हीं स्थानें पवित्र असून दर्शनीय आहेत. श्रद्धाळु भिक्षु–भिक्षुणी, उपासक–उपासिका येथें येऊन त्यांचें दर्शन घ्यावें व त्या त्या स्थानीं म्हणावें कीं, येथें तथागत जन्मला, येथें त्यास संबोधि प्राप्त झाली, येथें त्यानें धर्मचक्र प्रवर्तन केलें व येथें त्यानें परि-निर्वाण प्राप्त करून घेतलें.' असें झाल्यानें तुझा प्रश्न सुटेल व भिक्षूंची व उपासकांची वरचेवर एकमेकांस गांठ पडत जाईल. आनंदा जे चैत्याचें प्रसन्न मनानें दर्शन घेत हिंडत फिरत मरण पावतील, ते मरणोत्तर स्वर्गास जातील !

'फार सुंदर गोष्ट झाली!' असें आनंद मोठ्या आनंदानें उद्गारला !!

---

# आनंदाचें शोकसांत्वन

महापरिनिब्बाणसुत्त १६–५ ( दीघनिकाय )

भगवान आतां लवकरच आपणाला सोडून परिनिर्वाण पावणार—काय-मचे अंतरणार—हा विचार आनंदाला अत्यंत तीव्रतेनें जाणवूं लागला. आणि तें वास्तविकहि होतें. भगवंताचें आनंदावर फार म्हणजे फार प्रेम, अत्यंत मर्जी, आतोनात विश्वास !! क्षणभर आनंद दृष्टीआड झाला कीं लगेच ते आनंदाचें नांव घेत असत. तो जवळ असला कीं खूष आणि दृष्टीआड झाला कीं लगेच बेचैन !

खरोखर आनंद होताच तसा गुणी व गोड ! तसाच स्वामिनिष्ठ व प्रेमळ सेवक ! ! भगवंताची सेवा त्यानें अहोरात्र दक्ष राहून परोपरीनें केली. तो रूपानें सुंदर, स्वभावानें प्रेमळ, वचनानें गोड, वर्तनानें सरळ व्यवहारानें प्रामाणिक, कर्तव्यांत निरलस व विनयांत तत्पर, असा मोठा गोड व प्रेमळ शिष्य होता. तो आनंद ! फार काय, सावली जशी मनुष्याला सोडीत नाहीं तद्वत तो भगवंताला बिलकूल विसंबत नसे ! मोठा विश्वासू व प्रामाणिक ! !

तेव्हां अशा प्रेमळ शिष्याला परमदयाळु गुरुमाउली लवकरच कायमची टाकून जाणार, ही अत्यंत विषादकर कटु कल्पना आनंदाच्या कोमल अंतःकरणास झोंबल्याशिवाय—बोंचल्याशिवाय—कशी राहील ? त्याचें मन कळवळलें ! तळमळलें ! तडफडलें ! भगवंताकडे त्याची दृष्टि गेली तों त्याला भडभडून आलें ! तो तेथून हळूच निघून विहारांत जाऊन दाराच्या चौकटीला डोकें टेंकून, मुळुमुळूं रडूं लागला ! ! डोळ्याला अश्रूंची धार लागली, पोटांत कालवाकालव सुरू झाली ! ! याप्रमाणें एकटाच एकांतांत जाऊन तो दुःख व शोक करूं लागला.

आनंद गेला पण लवकर आला नाहीं हें पाहून भगवंतानी जवळच्या भिक्षूंस हाक मारून म्हटलें कीं, आनंद कोठें आहे ? 'तो विहारांत जाऊन रडत आहे, भदंत !' असें त्या भिक्षूंनीं उत्तर दिलें.

'मग जा, आणा त्याला कोणी बोलवून' असें भगवंतानी म्हटल्यावर एक भिक्षु जाऊन आनंदाला घेऊन आला. त्याला पाहून भगवान म्हणाले—आनंदा ! कसला शोक करतोस ! कसला विलाप करतोस ! बाबा ! हें सर्व टाकून दे ! मी तुला मागें अनेक वेळां सांगितलें आहे कीं, सर्व प्रिय व सुंदर वस्तूशी आमचा एक दिवस संबंध सुटून जाणार म्हणून ! जी वस्तू उत्पन्न झाली ती मागेपुढें केव्हां तरी नाश पावणार ! अशी जर वस्तुस्थिति आहे तर जन्मलेलें शरीर नष्ट होऊं नये हें कसें शक्य व संभवनीय आहे ? तथागताचें शरीर झालें म्हणून काय झालें ? जसें जन्मलें तसें तें केव्हां तरी पडणारच, नि पडलेंच पाहिजे ! ही गोष्ट अन्यथा होणें नाहीं. म्हणून म्हणतो, तूं शोक आवर नि दुःख करूं नकोस !

आनंद :—भदंत ! अजून मला पुष्कळ शिकावयाचें आहे. माझें शिक्षण अद्याप पुरें झालें नाहीं. भगवान माझ्यावर फार दयाप्रेम करीत होते. ते आतां परिनिर्वाण पावणार ! मग माझें कसें होईल ? मी काय करूं नि कोठें जाऊं ?

**भगवान** :—आनंदा ! असा दु:खीकष्टी होऊं नकोस ! ऐक, माझें ऐक. तूं दीर्घकालपर्यंत तथागताची उत्कृष्ठ व एकनिष्ठ सेवा करीत आला आहेस. तूं आपलें शरीर झिजवून माझें बहुत हित केलें आहेस. मला बहुत सुख दिलें आहेस. माझी अमित सेवा केली आहेस. काया वाचा मनें तूं माझी निःसीम सेवा चाकरी करून अपार पुण्य जोडलें आहेस. यानंतर तूं सावध राहून धर्मसाधन कर म्हणजे लवकरच सर्व बंधनांतून व दोषांतून मुक्त होशील ! ! तथागताचा हा तुला आशीर्वाद आहे ! !

नंतर भगवान भिक्षुसंघाकडे वळून त्यांना उद्देशून पुढीलप्रमाणें बोलले:–भिक्षु हो ! भूतकाळीं जितके म्हणून सम्यक् संबुद्ध होऊन गेले, त्या सर्वांजवळ आनंदासारखा एक एक आज्ञाधारक शिष्य होता. व पुढें होणाऱ्या बुद्धाजवळहि तसा असेल. भिक्षुहो, हा आनंद मोठा पंडित व मेधावी आहे. तसाच मोठा समयज्ञहि आहे. भिक्षूंना तथागताला भेटविण्याची योग्य वेळ कोणती, भिक्षुणींना कोणती, उपासकांना कोणती, राजे व दरबारी लोकांना कोणती, इतरे लोकांना कोणती, हें सर्व त्यास फार उत्तम समजतें आहे. सारांश माणसाची व वेळेची त्यास योग्य पारख आहे हें सांगण्याचा माझा उद्देश. तसाच त्याच्यांत आणखी एक अद्भुत गुण आहे. तो म्हणजे त्याचा शांत व प्रसन्न चेहरा. जे कोणी त्याच्या भेटीला येतात ते सर्व जण त्याचें दर्शन घेऊन बेहद्द प्रीत व प्रसन्न होतात. आणि त्याचें भाषण ऐकून तुष्ट व आनंदित होतात ! भिक्षुहो, असा अद्भुत गुण फक्त चक्रवर्ति राजामध्यें मात्र पाहावयास मिळतो ! इतरत्र नाहीं. अशा राजाच्या दर्शनास कोणी श्रमण, ब्राह्मण अगर इतर गृहस्थ मंडळी आली तर त्याचें दर्शन घेऊन ते लोक खुष होतात व त्याचें भाषण ऐकून आनंदित होतात. आनंदहि तसाच आहे !

याप्रमाणें, भिक्षु हो, आनंदाजवळ हे असे कांहीं अद्भुत व आकर्षक गुण आहेत. ते कोणते हें मी आतांच वर सांगितलें आहे. त्याचा थोडक्यांत अनुवाद करावयाचा तर त्याच्या दर्शनानें आनंदित होणें, भाषणानें संतुष्ट होणें आणि त्याचें दर्शन व भाषण संपलें कीं मनांत खिन्न होणें. असो.

असें म्हणून तो विषय तितक्यावरच संपविला.

---

## भगवानाचा अखेरचा संदेश

महापरिनिब्बाणसुत्त १६-६ ( दीघनिकाय )

हें झाल्यावर भगवंतांनीं सुभद्र नामक परिव्राजकास दीक्षा व उपसंपदा दिली. तोच त्यांचा शेवटचा शिष्य होय. नंतर भगवान आनंदाला व तेथें जमलेल्या सर्व भिक्षूंना उद्देशून म्हणाले:—आनंदा, आतां हें माझें शेवटचें भाषण आहे. तें लक्ष देऊन ऐका. मी तुमच्यातून निघून गेल्यावर तुम्हास असें वाटेल की, आमच्या धर्माचा प्रवर्तक निघून गेला. आतां आमचा शास्ता कोणी राहिला नाहीं. पण आनंदा, असें समजूं नका. मी तुम्हास जो धर्म व विनय सांगितला आहे, शिकविला आहे, तोच माझ्या पश्चात तुमचा शास्ता होईल. तोच तुमचा मार्गदर्शक !

शिवाय दुसरी गोष्ट तुम्हास सांगावयाची म्हणजे ही कीं हल्लीं जसे भिक्षु तुम्ही एकमेकांस 'मित्रा' म्हणून हाक मारतां तसें माझ्या परिनिर्वाणानंतर करावयाचें नाहीं.

**आनंद** :—काय करावयाचें मग ?

**भगवान** :—असें करावयाचें. तुमच्यांत जो मोठा भिक्षु असेल त्याने नव्या भिक्षूस नांवाने अगर गोत्राने किंवा 'मित्रा' अशी हाक मारावयाची.

धर्म, संघ अथवा प्रतिपदा याविषयी कसलाच संशय नाहीं. आनंदा, या पांचशे भिक्षूंमध्यें जो अगदी शेवटचा असेल तो सोतापन्न होईल! म्हणजे तो निर्वाणाच्या प्रवाहांत पडेल! त्यास मरणोत्तर वाईट गति प्राप्त होणार नाहीं. आणि संबोधि प्राप्त होऊन तो शेवटी सद्गतीस जाईल. (भिक्षूंस उद्देशून) भिक्षूहो, आतां माझं तुम्हांला शेवटचं सांगणं इतकंच की, संस्कार हे व्ययधर्मी आहेत. म्हणजे या जगातील सर्व संयोग–वियोग व उत्पत्ति–नाश या गोष्टी अपरिहार्य आहेत. म्हणून तुम्ही जागतिक जंजालांत न गुरफटतां जागृत राहून आपलें श्रेय साधन करा!'

भगवंताचे हे शेवटचेच उद्गार. इतकें बोलून ते पुढें स्तब्ध झाले.

---

## महापरिनिब्बाण

महापरिनिब्बाणसुत्त (१६–६)

झालें. इतकें बोले तो पर्यंत भगवानाला पुष्कळ आयास झाले. तोंड सुकलें. जिव्हा थकली व डोळ्यापुढें अंधेरी आली! वय ऐंशी वर्षांचें. आणि तशांत हा जोराचा अतिसाराचा विकार! मग शरीर थकून जमीन धरणार नाहीं तर काय करील?

'आनंदा' भगवान म्हणाले, 'आतां माझ्यानें फार बोलवत नाहीं. माझ्या परिनिर्वाणाची वेळ अगदी समीप आली! आतां मी ध्यानस्थ होतो!!' असें म्हणून त्यांनी डोळे मिटले व समाधींत मग्न झाले ते कायमच!! वैशाख शुद्ध पौर्णिमेची रात्र होती ती! मंगळवार! विशाखा नक्षत्र!

प्रथम त्यांनी पहिल्या ध्यानांत प्रवेश केला. नंतर त्यांतून उतरून दुसऱ्या ध्यनांत, त्यांतून उतरून तिसऱ्यांत, तिसऱ्यातून चौथ्यांत, पुढे

चौथ्यातून आकाशानंत्यायतनांत, पुढें तेथून विज्ञानंतायतनात, आणि मग तेथून अंकिंचन्यायतनांत, तेथून पुन: नैवसंज्ञानासंज्ञायतनांत आणि अखेर संज्ञावेदयितृ–निरोधांत प्रवेश केला !! रात्रीचा पश्चिमयाम होता तो !!

आणि मग पुनः उतरत उतरत पहिल्या ध्यानाप्रत येऊन पोचले. नंतर मग पुन: ती समाधि हळु हळू पायरी पायरीनें चढूं लागली. पहिल्या ध्यानातून दुसऱ्यांत, दुसऱ्यातून तिसऱ्यांत व तिसऱ्यातून चतुर्थ ध्यानांत प्रवेश केला आणि मग सर्व कांहीं संपलें !!!

अनिरुद्ध म्हणाला 'आनंदा ! भगवान परिनिर्वाण पावते झाले !!! जगाचा धर्म–भास्कर इहलोकांतून अंतर्धान पावला !!! उच्च नीतीचा श्रेष्ठ प्रवक्ता, शांतीचा महासागर, त्यागाचा गौरीशंकर, धैर्याचा महामेरु, दयेचा पूर्णेंदु, आणि ज्ञानाचा महाप्रदीप असा तो त्रैलोक्यवंद्य बुद्ध भगवान अखेर आनंदा ! परमानंदाच्या अपार नि अगाध महासागरांत–शाश्वतनिर्वाणसुखांत–जाऊन विलीन झाला !!!

पुढे पहाट झाल्यावर अनिरुद्धानें ही खबर कुशीनारच्या मल्लांस जाऊन जाहीर करण्यास सांगितल्यावरून, आनंद हा शहरांत जाऊन त्याप्रमाणें त्यानें ती लोकांस विदित केली. ती बातमी ऐकून गांवातील सर्व लोकांना अत्यंत दु:ख झालें. ते रडले, ओरडले नि हळहळले ! पुष्कळ शोक नि आकांत केला !!

त्यांत जे विचारी व वडील होते ते आपला दु:ख–शोक आवरून, मनाचा विवेक करून, धैर्य धरून गंधमाला, परिमळ द्रव्यें, नवीन वस्त्र, अंत्येष्टीचें इतर सामान व वाद्यें वगैरे घेऊन जेथें भगवान परिनिर्वाण पावले होते, तेथें आले.

तेथें आल्यावर त्यांच्या शवाचें भक्तिभावपूर्वक गंधमालादिकांनी पूजन करून, मंगळ वाद्यें वाजवीत व नृत्यगीत करीत तो सबंध दिवस

त्यांनी मोठ्या उत्सवांत काढला. याप्रमाणेच पुढें सहा दिवसपर्यंत सतत तेथें पूजन--वंदन, गायन--वादन, नाच--रंग, उत्सव--समारंभ चालू ठेविला. त्यांत कुशिनारच्या सर्व स्त्री--पुरुषांनी, लहान--थोरांनी, गरीब--श्रीमंतांनी भाग घेतला होता.

सातव्या दिवशीं भगवंताचें शव गांवातून मिरवीत मिरवीत पूर्वद्वारानें गांवाच्या बाहेर पूर्वेस असलेल्या मल्लांच्या 'मुकुट बंधन' नामक मंदिराजवळ आणून ठेवण्यांत आलें. तेथें ठेविल्यावर धर्मचक्रवर्ति सम्राटाचें जसें शव--दहन करावें, तसेंच भगवंताचें शवहि दहन करण्यांत आलें. म्हणजे गंधाच्या लाकडांची व इतर सुवासिक द्रव्यांची मिळून चिता रचण्यांत आली. शवाला नूतन वस्त्रानें व कापसाच्या रुईनें सात वेळां गुंडाळण्यांत येऊन तें तेलांत भिजवून चितेवर ठेवण्यांत आलें.

आतां अग्नि पेटविणार तों इतक्यांत महा काश्यप पांचशे शिष्य बरोबर घेऊन तेथें आला. त्यानें व त्याच्या शिष्यांनी मिळून दोन्ही हात जोडून भगवंताच्या पादाला वंदन केलें. तों इतक्यांत चितेनें आपोआप पेट घेतला ! ! झालें ! भगवान अग्निनारायण हां हां म्हणतां प्रदीप्त झाला ! ! व त्यानें भगवंताच्या शवाभोंवतीं आपल्या लाल व तेजस्वी ज्वाला समूहाचा प्रचंड व प्रखर वेढा दिला !! आणि भगवंताचें पार्थिव शरीर--पंचस्कंधात्मक नामरूप--त्या अग्निनारायणाच्या प्रखर-ज्वालेंत लवकरच समरस होऊन, अखेर त्यांतच विलीन झालें ! ! याप्रमाणें भगवान बुद्धाची पार्थिव मूर्ति या नश्वर मर्त्य लोकांतून निसर्ग नियमाप्रमाणें कालवश होऊन अंतर्धान पावली ! ! असें जरी असलें तरी त्यांची पुण्य स्मृति जगातील धर्मचक्रवर्ति म्हणून आज तागायत जिवंत असून पुढें यावच्चंद्र--दिवाकरौ केव्हांहि ती तशीच अमर व अभंग राहील !! या विषयीं भविष्य कथन करण्यास, वाचकहो ! होरा भूषणच कशाला हवा ? अस्तु.

---

# परिसमाप्ति

महापरिनिब्बाणसुत्त १६-६-२४

नंतर तिसऱ्या दिवशीं अस्थिसंचयन होऊन तीं एका कुंभांत भरून, तो कुंभ वाजत गाजत सन्मानपूर्वक मिरवीत आणून, मंत्रणा सभागृहांत स्थापन करण्यांत आला व पुढें सात दिवसपर्यंत त्याची पूजाअर्चा करण्यांत आली.

या अवधींत भगवान परिनिर्वाण पावल्याची खबर सर्व देशभर पसरली व ठिकठिकाणचे भगवंताचे उपासक तेथें जमा झाले. त्यांत मगधाधीश अजातशत्रु, वैशालीचे लिच्छवी राजपुत्र, कपिलवस्तूचे शाक्यश्रेष्ठ, देवदहचे कोळीय राजे, पावाचे व कुसीनारचे मल्ल वगैरे उपस्थित होते.

त्यांनी भगवंताच्या अस्थींत आपणासहि कांहीं भाग मिळावा असा कुसीनारच्या मल्लाजवळ मागणी केली. पण ते मल्ल त्यांच्या मागणीस मान्यता देण्यास कबूल होईनात. शेवटीं हें प्रकरण इतक्या थरास जाऊन पोंचलें कीं, तेथें लढाईचा प्रसंग येऊन ठेपला!

त्या वेळीं तेथें द्रोण नांवाचा एक ब्राह्मण पंडित होता. तो मध्यें पडून त्या सर्वांना उद्देशून पुढीलप्रमाणें म्हणाला—

**'सुणन्तु भोन्तो मम एक वाक्यं अम्हाकं बुद्धो अहु खन्तिवादो।**
**न हि साधुयं उत्तम पुगलस्स सरीर भंगे सिय सम्पहारो॥ १॥**
**सब्बे'व भोन्तो सहिता समग्गा सम्मोदमाना करोमट्ठभागे।**
**वित्थारिका होन्तु दिसासु थूपा बहुज्जनो चक्खुमत्तो पसन्नो'ति॥२॥**

**भावार्थ:**—हे क्षत्रिय बांधव हो! आपण माझे भाषण ऐका. भगवान बुद्ध हे शांतीचे प्रत्यक्ष अवतारच होते. तुम्ही त्यांचे शिष्य व उपासक म्हणविता. मग हें तुम्हास उचित नाहीं कीं भगवान आपल्यातून निघून

गेल्यावर तुम्ही त्यांच्या अस्थींसाठीं वर्दळीस येऊन लढाईस व लठ्ठा-लठ्ठीस उद्युक्त व्हावें. विचार करा. शांत व्हा. भगवंतांच्या अस्थि सर्वांनीं गुण्यागोविंदानें वाटून घेऊन, त्यावर तुम्ही आपल्या देशांत जाऊन त्या महापुरुषाच्या संस्मरणार्थ एकेक स्तूप उभारून, त्या महात्म्याची पुण्य-स्मृति चिरकाल राहील, असें करा. म्हणजे भावी पिढी त्या मंगल स्तूपाचें पवित्र दर्शन घेऊन भगवंताचें पुण्य स्मरण करून आपणास धन्य व कृतकृत्य मानील ! !

हें द्रोणाचार्यांचें भाषण सर्वांस रुचलें व पटलें व त्याप्रमाणें त्या अस्थीचे एकवीसाव्या दिवशीं एकंदर आठ भाग करण्यांत येऊन, प्रत्येकाला एकेक भाग देण्यांत आला. मगध देशाधिपति सम्राट् अजातशत्रूनें आपला भाग घेऊन जाऊन, राजगृहांत त्या अवशेषावर एक स्तूप उभारला. त्याच-प्रमाणें लिच्छवी लोकांनी वैशाली मध्यें, शाक्यांनीं कपिलवस्तुमध्यें, बुलींनी अल्लकल्पामध्यें, वेठद्वीपाच्या ब्राह्मणानी वेठद्वीपांत, कोळीय लोकांनीं रामग्रामांत, पावाच्या मल्लांनी पावा येथें व कुसीनारच्या मल्लांनी कुसीनार येथें, आपापल्या हिश्शास आलेल्या भगवंतांच्या अस्थि घेऊन जाऊन त्यावर एकेक स्तूप निर्माण केला.

त्याचप्रमाणें पिप्पलवतीच्या मौर्यांनी भगवानाच्या चितेचा अंगार नेऊन त्यावर व द्रोणाचार्यानें भगवंताच्या अस्थि ज्या कुंभांत भरून ठेविल्या होत्या, तो कुंभ घेऊन त्यावर एकेक स्तूप निर्माण केला. याप्रमाणें भगवंताच्या पुण्य स्मरणार्थ दहा ठिकाणी दहा स्तूप निर्माण करण्यांत येऊन, पुढें त्या दहाहि स्थळांना पुण्य क्षेत्राचें पूज्य व मंगल स्थान प्राप्त झालें ! !

द्रोणाचार्यांनी त्या युयुत्सु क्षत्रिय श्रेष्ठांना आपल्या सदुपदेशानें शांत करून त्यांना यथाभाग अस्थि वांटून दिल्यावर, ते सर्व राजे लोक शांत व हृष्ट होऊन प्रसन्न चित्तानें हात जोडून एक स्वरांत ही पुढील गाथा म्हटली.



क्यांडी येथील भगवान बुध्दाच्या दंतावशेषावर बांधलेलें
**बौध्दमंदीर** ( सिलोन )

( पृष्ठ ३४२ अ )

PREMIER ART PRINTING WORKS FORT, BOMBAY

'देविन्द-नागिन्द-नरिन्द-पूजितो,
मनुस्स सेट्ठेहि तथैव पूजितो।
तं वन्दथ पञ्जलिका भवित्वा,
बुद्धो हवे कप्पसतेहि दुल्लभो'ति ॥

दीघनिकाय १६-६-२८

अर्थ :—देवराज, नागराज, मानवराज, व श्रेष्ठ जन यांनी पूजित अशा भगवान बुद्ध देवास आम्ही सर्वजन कृतांजलिपूर्वक नमस्कार करतो! शेकडो कल्पानंतरहि अशा प्रकारच्या भगवान तथागत बुद्धाचा जन्म होणें दुर्लभ आहे!!

याप्रमाणे प्रिय वाचक हो! हें भगवान गोतम बुद्धाचें सुंदर व सुमंगल चरित्र येथें समाप्त झालें. तें आज सर्व विचारी भाविक जगाला आदरणीय व अनुकरणीय नाहीं असें कोण म्हणेल? जगांत अखंड शांतता नांदून सर्व मानव जात दुःखमुक्त होऊन बंधुभवानें सुखांत व समाधानांत नांदावयाची, तर भगवंताच्या सदुपदेशाचें प्रभावी रसायन स्वार्थी व लोभी अंतःकरणास पाजून, त्याला निःस्वार्थी व निर्लोभी केल्याशिवाय तरणोपाय नाहीं, अशी आमची बालंबाल समजूत आहे. असो.

या परम पूज्य भारत मातेच्या पवित्र उदरी जन्मलेल्या, भारतभूमींत वाढलेल्या, जागतिक धर्मवटींत अढळ व अग्रस्थान पावलेल्या या परमथोर धर्मसम्राटाचा सानंद, साभिमान, सादर जयजयकार करणें हें प्रत्येक भारत पुत्राचें आद्य व पवित्र कर्तव्य नव्हे काय? होय. आणि म्हणून आम्ही ही पुढील गाथा म्हणून लेखणीला विश्रांति देतों.

ब्रम्हिन्द-देविन्द-नरिन्द-राजं
बोधि-सुबोधि करुणा-गुणग्गं ।
पञ्ञापदीप-ज्वलितं जलन्तं
वन्दामि बुद्धं भवपारतिण्णं ॥

**भावार्थ :**—जो ब्रह्माधिपति, देवाधिपति, नरेंद्राधिपति आहे आणि जगांत उत्तम ज्ञान लाभ करून देण्यांत व करुणा गुणांत सर्वश्रेष्ठ आहे अशा प्रज्ञारूपी प्रदीपानें प्रकाशणारा, जाज्वल्यमान, भवसागरपा[illegible] अशा भगवान बुद्धदेवास मी वंदन करतों ! !



